मुंबई इलाखा व मध्यप्रांतांतील शिक्षणखात्यांची
मंजुरी मिळालेली

इंग्रजीशाळांतील खालच्या वर्गांसाठीं

मॅक्मिलनचीं

# मराठी वाचन पुस्तकें

## पुस्तक चौथें

मॅक्मिलन आणि कंपनी, लिमिटेड
मुंबई

१९३४

# अनुक्रमणिका

या पुस्तकांत घेतलेले उतारे छापण्यास परवानगी दिल्याबद्दल प्रकाशक पुढील सद्गृहस्थांचे ऋणी आहेतः—

विद्यार्थ्यांप्रत व सिंहावलोकन—श्री. प. चिं. दामले, राहुरी; महंमद पैगंबर व त्याचा उपदेश—प्रो. रा. प. सबनीस, पुणें; ऐतिहासिक पोवाडे, देशी भाषांचें पुनरुज्जीवन व बुद्धजयन्ती—श्री. न. चिं. केळकर, पुणें; रसिकांप्रत—श्री. भा. रा. तांबे, ग्वालेर; दक्षिण आफ्रिकेची सफर—व्यवस्थापक, चित्रशाळा प्रेस, पुणें; गोपाळ कृष्ण गोखले—श्री. शं. के. कानेटकर, फलटण; गोविंदरावांचें आपल्या मुलांस पत्र व चोरावर मोर—व्यवस्थापक, आर्यभूषण छापखाना, पुणें; आमुची मायबोली—प्रो. मा. त्रिं. पटवर्धन, कोल्हापूर; माझ्या जन्मभूमीचें नांव—श्री. दे. ना. टिळक, नाशिक; यापुढें—श्री. एन्. व्ही. करंदीकर, धुळें; गोपाळ गणेश आगरकर—श्रीमती डॉ. भागीरथीबाई पटवर्धन, पुणें; कर्तव्याचा आनंद—श्री. एस्. एम्. गोळे, नागपूर; कालमहिमा—श्री. ए. रा. महाजनी, अकोला; प्रौढ शिक्षण—श्री. श्री. रु. कोल्हटकर, खामगांव; ताईचा मृत्यु—कु. वेणूताई पानसे, पुणें; सहाव्या यत्तेची परीक्षा—श्री. धों. के. कर्वे, पुणें; शास्त्रांचा अभ्यास—प्रो. श्री. ना. बनहट्टी, नागपूर; भास—प्रो. वा. गो. मायदेव, पुणें; कारकून—श्री. ग. गो. दिवाकर आणि बंधु, पुणें; रघूजींची बंगालवर स्वारी—श्री. गो. ब. जोशी, पुणें; राजहंस माझा निजला—श्री. शं. ग. गडकरी, पुणें; प्राचीन इतिहासाचीं साधनें—श्री. म. वि. काथवटे, वाई; निज नीज माझ्या बाळा—श्री. वि. द. घाटे, अहमदाबाद; ग्रहणें—श्री. म. बा. गोडबोले, पुणें; आनंदवनभुवन—श्री. वि. स. वाकसकर, बडोदा; प्रवर्तितो दीप इव प्रदीपात्—श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, नागपूर; संताजीची घोडदौड—श्री. दु. आ. तिवारी, जळगांव; पंढरीची वारी—श्री. वा. ना. देशपांडे, सातारा.

# विद्यार्थ्यांप्रत

महत्त्व भारी आहे या पृथ्वीचें,
त्याहुनि अतिशय या सगळया विश्वाचें;
परि तुजमध्यें महतीचें जें बीज
त्याहुनि कांहीं मोठी नाहीं चीज—
ठसव मनीं हें साचें
बापा ! वच हें बहु मोलाचें. १

अग्नि असे हा तेजस्वी रे फार,
त्याहुनि भारी सूर्य नभींचा थोर;
परि किरण जो तुजमध्यें सत्याचा
प्रकाश सर्वोत्तम तो आहे त्याचा—
घोक सदा हें वाचें
बाबा ! हें वच बहु मोलाचें. २

पृथ्वीमध्यें रत्नें बहु आहेत,
आकाशीं तर असंख्य दिसताहेत;
परि एक रत्न तुजमध्यें जें सच्छील
कोणाला नच सर त्याची येईल—
स्मरण असूं दे याचें
बाबा ! हें वच बहु मोलाचें. ३

स्नायूंमध्यें पुष्कळ आहे शक्ति,
नृपवक्त्रीं तर फारच आहे म्हणती;
परि एक एक जो नवा शब्द तूं शिकसी
शक्ति तयाची उलथिल सर्व जगासीं—
पठण तर करीं याचें
बाबा ! जग हें बदलायाचें. ४

## २. महंमद पैगंबर व त्याचा उपदेश

परंपरेनें चालत आलेल्या वर्णनावरून असें दिसतें कीं, महंमद पैगंबर याचें सुंदर रूप मनांत भरण्यासारखें होतें. त्याचा वर्ण साधारण अरब लोकांत आढळत नाहीं इतका गोरा होता. तो मध्यम बांध्याचा व भरदार अंगाचा पुरुष असून त्याचे हातपाय मोठे होते. तारुण्यांत तो विलक्षण शक्तिमान् होता; उतारवयांत त्याच्या अंगांत थोडासा वात शिरला. त्याच्या हास्यांत विलक्षण मोहनी होती. उत्साहाच्या किंवा उसळलेल्या मनोवृत्तींच्या भरांत त्याच्या मुद्रेवर एक प्रकारचें दैवी तेज चमकत असे.

या परमेश्वरी देणग्यांचा उपयोग महंमदाला समाजापुढें धर्माचा उपदेश करितांना व संभाषणाच्या वेळीं फार होत असे. तो बोलावयाला उभा रहाण्याचा अवकाश कीं, श्रोत्यांचीं मनें प्रेमभरांत मग्न होऊन जात. त्याची भव्य मूर्ति, त्याचें तेजःपुंज शरीर, त्याचे भेदक नेत्र, मनें प्रसन्न करणारें त्याचें हास्य, त्याची उडती दाढी, प्रत्येक मनोभावना बरोबर उमटविणारी त्याची मुद्रा, व ओंठाबाहेर पडणाऱ्या प्रत्येक वाक्याचा जोर द्विगुणित करणारे त्याचे हातवारे, यांचें कौतुक ते करूं लागत. त्याचें संभाषण गंभीर व सुभाषितमय असे. कधींकधीं त्याच्या चित्तवृत्ति खळबळून जात, आणि त्याच्या वक्तृत्वाला कर्णमधुर व रागदार आवाजानें रंग चढे.

शरिराच्या स्वच्छतेला महंमद पराकाष्ठेचा जपे, पण डामडौलाचा त्याला तिटकारा होता. क्षुद्र मनाच्या लोकांना उंचीउंची पोषाख घालून मिरवण्याची हौस असते ती त्याला कधींहि वाटली नाहीं. हा पोषाखाचा साधेपणाहि ओढून ताणून आणिलेला असा नव्हता, तर असल्या क्षुल्लक गोष्टीमुळें मान मिळावा या इच्छेचा संपर्कहि त्याच्या मनाला झाला नव्हता. त्याचे कपडे कधीं कधीं लोकरीचे तर कधीं कधीं कापसाचे पस्यापस्याचे व पुष्कळ वेळां ठिगळें लाविलेले असे असत. त्याचें पागोटें

एका बाजूला कललेलें असे. त्याच्या बोटांत ‘ महंमद, ईश्वराचा प्रेषित ’ अशीं अक्षरें कोरलेली रुप्याची अंगठी असे.

तो कधींकधीं विनोद करी तरी त्याची नेहमींची चालचलणूक प्रौढ व गंभीर असे. आपल्या देशाच्या भारदस्त व सभ्य चालीरीतींचें उल्लंघन त्यानें कधीं केलें नाहीं. तो श्रीमंतांचा योग्य मानमरातब ठेवी तर मक्केंतील गरिबांत गरीब अशा नागरिकांबरोबर प्रेमळ धन्यासारखा वागे. त्याचा मनमोकळेपणा तत्काळ पटण्यासारखा असे.

त्याच्या बुद्धीचें सामर्थ्य अलौलिक होतें यांत शंका नाहीं. त्याची ग्राहकशक्ति तीक्ष्ण, त्याची स्मरणशक्ति संग्राहक, त्याची कल्पनाशक्ति जळजळीत, व त्याची प्रतिभा निर्मायक होती. जगाचें सूक्ष्म निरीक्षण करून त्यानें आपलें मन सुसंस्कृत केलें होतें व परंपरेनें चालत आलेल्या व त्याच्या काळीं चालू असलेल्या धर्मपंथांचें ज्ञान त्यांत सांठवून ठेविलें होतें. पंडितांच्या पुस्तकांना जरी तो पारखा होता, तरी सृष्टीचें व मानवी स्वभावाचें पुस्तक त्याच्यापुढें उघडून ठेविलेलें होतें. जगांतील अनेक राष्ट्रांची व धर्मांची त्यानें तुलना केली, इराणच्या व रोमच्या साम्राज्याचे दोष ओळखिले, भोंवतालची अवनति पाहून अनुकंपा व क्रोध व्यक्त केला, एका परमेश्वराच्या व राजाच्या छत्राखालीं साधेभोळे पण अजिंक्य धैर्याचे व सद्गुणी अरब गोळा करण्याचें कार्य निश्चयानें हातीं घेऊन पार पाडिलें.

इस्लाम धर्माची उभारणी ‘ ईश्वर एक आहे ’ या सनातन व ‘ महंमद हा ईश्वराचा प्रेषित होय ’ या केवळ श्रद्धाळु लोकांना पटणाऱ्या तत्त्वावर झाली आहे. सश्रद्ध लोकांना स्वर्गांत लाभणाऱ्या सुखांचीं व अश्रद्ध लोकांना नरकांत भोगाव्या लागणाऱ्या यातनांचीं वर्णनें कुराणांत जागोजाग आलीं आहेत, त्यांच्याशीं आपल्याला विशेष कर्तव्य नाहीं. साधीं नीतितत्त्वें मात्र सर्वांना समजतील इतक्या सोप्या रीतीनें महंमदानें समजावून दिलीं आहेत असें खालील उताऱ्यांवरून दिसून येईल. ते त्याच्या संभाषणांतून घेतलेले आहेत.

## ईश्वराचे भक्त

ईश्वर म्हणतो:—जो एक सत्कृत्य करील त्याला दहा बक्षिसें मिळ-तील व मला वाटेल त्याला मी जास्तहि देईन; आणि जो दुष्कृत्य करील त्याला मी योग्य असें शासन करीन, नाहीं तर क्षमा करीन; आणि जो माझ्याकडे एक सूतभर येण्याची इच्छा धरील त्याच्याकडे मी दोन कोस जाण्याची इच्छा धरीन; आणि जो माझ्याकडे चालत येतो त्याच्याकडे मी धांवेन; आणि जो पृथ्वीएवढी मोठी पातकांची रास माझ्याकडे घेऊन येईल, पण जो माझी एकांतिक भक्ति करील त्याच्या-पुढें तेवढीच मोठी क्षमा घेऊन मी प्रगट होईन.

ज्या दिवशीं दुसरी कोणतीहि छाया दिसणार नाहीं त्या दिवशीं ईश्वर आपल्या छायेंत सात प्रकारच्या लोकांना घेईल:—१. न्यायी राजा; २. तरुणपणापासून जो ईश्वराची भक्ति करीत राहिला असेल तो; ३. परत येईपर्यंत मशीदीवर जो आपलें हृदय गुंतलेलें ठेवितो; ४ मिळून किंवा आपापल्या परीनें ईश्वराला प्रसन्न करण्यासाठीं मैत्री करितात अशा मनुष्यांची जोडी; ५. जो एकांतांत असतांना ईश्वराला आळ-वितो व रडतो; ६. जो श्रीमंती व सौंदर्य यांच्या मोहाला बळी न पडतां म्हणतो, ‘ईश्वराला मी भितों;’ ७. उजव्या हाताची गोष्ट डाव्या हाताला कळूं नये अशा गुप्त रीतीनें जो दान करितो.

सर्व सत्कृत्यांत मोठें कोणतें तर ईश्वरासाठीं कोणत्याहि माणसाशीं मैत्री करणें व जो कोणी ईश्वराचा शत्रु त्याच्याशीं वैर करणें.

### दान

जेव्हां ईश्वरानें पृथ्वी निर्माण केली तेव्हां ती डळमळूं लागली; तेव्हां ईश्वरानें डोंगर निर्माण केले आणि पृथ्वीवर बसविले तेव्हां ती स्थिर झाली; डोंगर किती कठिण असें पाहून देवदूतांना आश्चर्य वाटलें व ते म्हणाले, ‘हे ईश्वरा, तुझ्या सृष्टींत डोंगराहून कठिण असें कांहीं आहे काय ?’ ईश्वरानें उत्तर दिलें, ‘होय, पाणी डोंगराहून कठिण आहे,

कारण पाण्यानें डोंगर विरतात.' तेव्हां देवदूत म्हणाले, 'हे ईश्वरा, तुझ्या सृष्टींत पाण्याहून कठिण असें कांहीं आहे काय ?' ईश्वरानें उत्तर दिलें, 'होय, वारा पाण्याला जिंकितो, तो पाणी खळबळून टाकतो.' ते म्हणाले, 'हे परमेश्वरा, तुझ्या सृष्टींत वाऱ्यापेक्षां कठिण असें कांहीं आहे काय ?' तो म्हणाला, 'होय, दान करणारीं मनुष्यें; जे उजव्या हातानें देतात व ही गोष्ट डाव्या हातापासून लपवून ठेवितात ते सर्व जिंकितात.'

सर्व यथास्थित असतांना एक रुप्याचें नाणें माणसानें दान केलें तर तें मरावयाच्या घटकेला शंभर नाणीं दान करण्यापेक्षां चांगलें.

कोणत्याहि सत्कृत्याचा तिरस्कार करणें बरोबर नाहीं हें लक्षांत ठेव, हंसतमुखानें व प्रसन्नमनानें तुझ्या मनुष्यबांधवांपैकीं कोणी तुझ्याकडे आला तर त्याचें सुद्धा महत्त्व आहे.

सूर्य उगवतो त्या प्रत्येक दिवशीं करण्यासारखीं अनेक दानें आहेत; दोन माणसांचा न्याय तोडणें हें दान होय; वाहनावर चढतांना हात देणें किंवा सामान उचलावयास लागणें हें दान होय; ज्यासाठीं बक्षीस मिळतें असे रसाळ शब्द म्हणजे दान होय; सभ्यपणानें विचारणाराला उत्तर देणें हें दान होय; प्रार्थनेला जातांना पुढें टाकिलेलें प्रत्येक पाऊल हें दान होय; दगड, काटे वगैरे माणसांना त्रास देणाऱ्या वस्तु रस्त्यांतून काढून टाकणें हें दान होय.

पैगंबराच्या घरांतील मंडळींनीं एक बकरा मारिला तेव्हां त्यानें विचारिलें 'त्यांपैकीं काय शिल्लक आहे ?' ते म्हणाले, 'फक्त खांदा; बाकीचा भाग आम्हीं गोरगरीब व शेजारीपाजारी यांकडे पाठवून दिला आहे.' पैगंबर म्हणाला, 'नाहीं, नाहीं, खांद्याशिवाय बाकीचा भाग शिल्लक आहे असें म्हणा; जें दान केलें तें अक्षय, जें घरांत ठेविलें तें क्षणिक.'

भुकेल्यांना अन्न द्या, रोगांनीं गांजलेल्यांची शुश्रूषा करा. अन्यायानें कैदेंत पडलेल्यांची सुटका करा.

## मुकीं जनावरें

जनावरांच्या बाबतींत ईश्वराचें भय धरा; तीं धडधाकट असतील तेव्हां त्यांच्यावर बसा; तीं दमलीं म्हणजे उतरा.

एकदां एक मनुष्य गालिचा घेऊन पैगंबराकडे आला व म्हणाला, ‘ पैगंबरमहाराज, मीं रानांतून जात असतां पक्ष्यांच्या पिल्लांचा आवाज ऐकिला; मीं त्यांना पकडिलें व या माझ्या गालिच्यांत घातलें; त्यांची आई फडफड करीत माझ्या भोंवतीं उडूं लागली तेव्हां मीं गालिचा उलगडला व ती त्यांच्याजवळ पडली; मग मीं त्यांना गालिच्यांत गुंडाळिलें; हीं पहा तीं पिलें. ’ पैगंबर म्हणाला, ‘ त्यांना खालीं ठेव. ’ त्याबरोबर त्यांची आई त्यांना येऊन मिळाली. पैगंबर म्हणाला, ‘ आईची ही पिलांवरील माया पाहून तुम्हांला आश्चर्य वाटतें काय? ज्यानें मला पाठविलें त्याची शपथ घेऊन मी तुम्हांला सांगतों कीं, आई पिलांवर करिते त्यापेक्षां ईश्वर आपल्या भक्तांवर जास्त प्रेम करितो. ज्या ठिकाणाहून हीं पिलें घेऊन आलास तेथें तीं पुन्हां नेऊन ठेव व त्यांची आई त्यांना भेटूं दे. ’

खरोखर मुक्या जनावरांवर जो दया करील व त्यांना प्यावयास पाणी देईल त्याला पुण्य लागेल. एका दुराचारणी स्त्रीनें विहिरीजवळ एका कुत्र्याला पाणी दिलें म्हणून ती पापापासून मुक्त झाली. तहानेनें अगदीं मरावयास टेंकलेला तो कुत्रा जीभ बाहेर काढून पडला होता. त्या बाईनें आपला जोडा काढिला, तो आपल्या वस्त्राच्या टोंकाला बांधिला, त्यांतून कुत्र्यासाठीं पाणी काढिलें व तें त्याला दिलें. या कृत्याबद्दल ईश्वरानें तिला पापमुक्त केलें.

## मरण

मरावयाची इच्छा कोणीं धरूं नये; सत्कृत्यें करणारानें ती धरूं नये; कारण कीं, कदाचित् आयुष्य वाढतें तशीं त्याचीं सत्कृत्यें वाढतील;

दुराचारी माणसानें ती धरूं नये; कारण कीं पश्चात्तापाच्या योगानें ईश्वराकडून त्याला क्षमा होईल.

एक प्रेतयात्रा चालली होती, तेव्हां पैगंबर उभा राहिला. भोंवतालचे लोक म्हणाले, 'पैगंबरमहाराज, ही प्रेतयात्रा एका यहुदी बाईची आहे, आपण तिला मान देतां उपयोगी नाहीं.' तेव्हां पैगंबर म्हणाला, 'मरण हें भयंकर आहे; म्हणून जेव्हां जेव्हां प्रेतयात्रा जातांना तुम्हांला दिसेल तेव्हां तेव्हां उभे रहा.'

मृताविषयीं वाईट शब्द काढूं नका; जें त्यांनीं पुढें पाठविलें तें पोंचलेल्या ठिकाणापर्यंत ते जाऊन पोंचले; त्यांना आपल्या कर्माचें फळ मिळालें आहे; तें चांगलें असलें तर तुम्हीं त्यांना पापी असें म्हणतां कामा नये; तें वाईट असलें तर कदाचित् त्यांना क्षमा होईल; पण जर क्षमा झाली नाहीं तर त्यांचा वाईटपणा तुम्हीं काढल्याचा कांहींच उपयोग नाहीं.

मदिना शहरांत थडग्यांजवळून जातांना पैगंबर त्यांच्याकडे तोंड वळवून म्हणाला, 'तुमच्या आत्म्यांस शांति असो! आम्हांस व तुम्हांस ईश्वर क्षमा करो! तुम्ही आमच्यापुढें गेलां, आम्ही तुमच्या मागून येत आहों!'

## मार्गदर्शक फक्त एक

'मी खरोखर धार्मिक आहे कीं नाहीं हें ओळखण्याची खूण काय?' असें एका मनुष्यानें पैगंबराला विचारिलें. पैगंबर म्हणाला, 'जीं सत्कृत्यें केलीं असशील त्यांपासून तुला सुख झालें व जीं पापकृत्यें केलीं असशील त्यांबद्दल पश्चात्ताप झाला तर तूं खरा धार्मिक.' त्या मनुष्यानें विचारिलें, 'पाप म्हणजे खरोखर काय?' पैगंबरानें सांगितलें, 'जेव्हां एकादी गोष्ट विवेकबुद्धीला टोंचीत राहील असें तुला वाटेल तेव्हां ती सोडून दे.'

# ३. मराठीचा अभिमान

[ आतां ] वंदूं प्राकृत कवीश्वर । निवृत्तिप्रमुख ज्ञानेश्वर ॥
नामदेव चांगदेव वटेश्वर । ज्यांचें भाग्य थोर गुरुकृपा ॥ १ ॥

जयांचे ग्रन्थ पाहतां । ज्ञान होय प्राकृतां ॥
तयांचे चरणीं माथा । निजात्मता निजभावें ॥ २ ॥

संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवी । मा प्राकृतीं काय उणीवी ॥
नवीं जुनीं म्हणावीं । कैसेनि केवीं सुवर्णसुमनें ॥ ३ ॥

कपिलेचें म्हणावें क्षिर । मा इतरांचें तें काय नीर ॥
वर्णस्वादें एकचि मधुर । दिसे साचार सारिखें ॥ ४ ॥

जें पाविजे संस्कृत अर्थें । तेंचि लाभे प्राकृतें ॥
तरि न मनावया येथें । विषमचि तें कायी ? ॥ ५ ॥

कां निरंजनीं बसला रावो । तरी तोचि सेवकां पावन ठावो ॥
तेथें सेवेसि न वचतां पाहो । दंडी रावो निजभृत्यां ॥ ६ ॥

कां दुबळी आणि समर्थ । दोहींस रायें घातले हात ॥
तरी दोघींसिही तेथ । सहज होत समसाम्य ॥ ७ ॥

देशभाषावैभवें । प्रपंचपदार्थीं पालटलीं नांवें ॥
परी रामकृष्णादिनामां नव्हे । भाषावैभवें पालटू ॥ ८ ॥

संस्कृतवाणी देवें केली । तरी प्राकृत काय चोरापासोनि झाली ?
असोतु या अभिमानभुली । वृथा बोलीं काय काज ॥ ९ ॥

आतां संस्कृता किंवा प्राकृता । भाषा जाली जे हरिकथा ॥
ते पावनचि तत्त्वतां । सत्य सर्वथा मानली ॥ १० ॥

सद्गुरुकृपा समर्थ । तेणें कृपें श्रीभागवत ॥
वाखाणिलें जी प्राकृत । शुद्ध मथितार्थ सोलीव ॥ ११ ॥

जनार्दनकृपादृष्टि । माझ्या मराठ्या आरिखा गोष्टी ॥
रिघाल्या एकादशाचे पोटीं । स्वानंदतुष्टीं निजबोधें ॥ १२ ॥

संस्कृतप्राकृतपरवडी । सज्ञान सेविती स्वानंदगोडी ॥
गाय काळी आणि तांबडी । परी दुधीं वांकुडी चवी नाहीं ॥ १३ ॥

तेवीं संस्कृतप्राकृतभाखा । ब्रह्मासी पालट नाहीं देखा ॥
अभय अभेदें वदला एका । साह्य निजसखा जनार्दन ॥ १४ ॥

# ४. बुद्धजयंती

बरोबर पंचवीसशें वर्षें झालीं. वैशाख शुद्ध पौर्णिमेस शाक्यकुळांतील अत्यंत श्रेष्ठ असा पुरुष जो सिद्धार्थ–गौतम तो 'बुद्ध' झाला; व तेव्हांपासून जगांतील श्रेष्ठ अशा धर्मांपैकीं एकाची म्हणजे बौद्धधर्माची स्थापना झाली. वास्तविक सिद्धार्थ गौतम या व्यक्तीच्या जन्मास २५०० हून अधिक वर्षें झालीं आहेत. तथापि, ज्या दिवशीं त्याला खरा आत्मसाक्षात्कार झाला, अनेक वर्षेंपर्यंत तीव्र चिकित्सापूर्ण अशा मनानें हुडकीत असलेली भवचक्राची गुरुकिल्ली ज्या दिवशीं त्याच्या हस्तगत झाली तोच दिवस बुद्धावतारजयंतीचा मानण्यांत येतो. तत्पूर्वीचा गौतमबुद्ध हा आमच्याप्रमाणें केवळ एक संसारी पुरुष होता. ख्रिस्त, महंमद वगैरेप्रमाणेंच बुद्ध हीहि एक खरी खरी ऐतिहासिक व्यक्ति होऊन गेली, व तिच्याविषयीं साधार अशी माहिती ग्रंथांतून मिळते. बुद्धाचा बाप शुद्धोदन–शाक्य हा वास्तविक राजा असा नव्हता. कारण शाक्यजातींच्या लोकांत त्या वेळीं एक प्रकारची प्रजासत्ताक राज्यपद्धति असून समाजाचा सर्व कारभार प्रातिनिधिक पद्धतीनें चालत असे. शुद्धोदनास प्रत्यक्ष राज्यपद असें नसलें तरी तो घरचा श्रीमान् व सुखी होता आणि आपला प्रिय पुत्र सिद्धार्थ याला त्यानें एखाद्या राजपुत्राप्रमाणें चैनींत व ऐषआरामांत लोळतां येईल अशा स्थितींत ठेवलें होतें. सांसारिक दुःख म्हणून कसें असतें तें आपल्या मुलाच्या दृष्टीसही पडूं नये, अशी त्यानें विशेष खबरदारी घेतली होती. यशोधरा नांवाच्या सुंदर स्त्रीशीं सिद्धार्थाचें लग्न लहानपणींच लागलेलें असून राहुल नांवाचा एक अत्यंत सुंदर असा पुत्रही त्याला होता. पण सिद्धार्थाचें लक्ष ऐहिक ऐषआरामांत गुरफटलेलें नसून जगाच्या स्थितीकडे लागलेलें होतें. प्रेमळ बापानें केलेल्या कडेकोट बंदोबस्तांतूनही मानवी दुःखाचा थोडाबहुत मासला त्याच्या नजरेस मधून मधून पडल्याशिवाय राहत नसे; व



बुद्धाचे आयुष्यांतील एक प्रसंग

प्रत्येक वेळीं हा मासला पाहतांच या दुःखाचें मूळ कशांत आहे, दुःखनिवारणार्थ चाललेला जगाचा प्रयत्न योग्य मार्गानें होत आहे किंवा भलत्याच मार्गाचें वळण त्याला लागलें आहे, अशी त्याची चिकित्सा वाढत जाई. संसारांतील त्याचें मन निघाल्यामुळें प्रतिक्षणीं संसारोपाधींचा जाच त्याला अधिकाधिक दुःसह वाटूं लागला. संसार-पाश तोडल्याशिवाय आपल्या शंकांस समाधानकारक उत्तर मिळणार नाहीं, असा कायमचा निश्चय झाला; व राहुलाच्या जन्मोत्सवासंबंधानें कपिलवस्तु नगरीच्या पौरजनांनीं केलेल्या एका विशेष समारंभाच्या ऐन दिवशींच गौतमबुद्धानें आपल्या अलौकिक अशा वैराग्याचा मासला जगास दाखविला.

जगांत सामन्यतः वैराग्याला कारण दुःख हेंच असतें. आर्तभक्तांचीं उदाहरणें पुष्कळ. सुखांत लोळणाऱ्याला वैराग्य क्वचितच आठवतें. पण गौतमबुद्धाच्या वैराग्याला जगांत दुसरें उदाहरण मिळणें बहुधा कठिणच. समर्थ रामदासस्वामी विवाहाकरितां पाटावर उभे असतां, 'सावधान' या सूचक शब्दाचा इशारा तरी त्यांच्या कानीं पडला होता. पण गौतमबुद्धाला जी वैराग्यजागृति मिळाली ती केवळ आत्म-प्रेरणेनें. बुद्धाच्या 'महाभिनिष्क्रमणा' सारखा काव्यमय व उदात्त प्रसंग दुसरा मिळणार नाहीं. रामचंद्राला ऐन राज्यारोहणप्रसंगीं राज्य सोडून जावें लागलें खरें, पण त्याला मूळ कारण परेच्छा; स्वतः राम-चंद्राची इच्छा नव्हे. रामचंद्राचा वनवास हें पितृभक्तीचें उदाहरण होय; वैराग्याचें नव्हे. गौतमानें सर्व संसारसुखाचा त्याग केला, तो केवळ स्वतःच्या परमार्थ-ज्ञानाच्या सात्त्विक इच्छेनें. उत्सवप्रिय मनुष्यांनीं वाडा गजबजून गेला आहे, नाचरंग चालला आहे, मंगलवाद्यें वाजत आहेत, सर्वत्र रोषनाई केलेली आहे, अशा दिवशीं गौतमबुद्धाचें मन मात्र ठिकाणावर नव्हतें! व्यग्रचित्तानें सर्व दिवस घालविला व ऐन मध्यरात्रीं यशोधरा ही पुष्पशय्येवर राहुलाला कुशींत घेऊन गाढ

निद्रिस्त असतां तिला जागें न करतां तो निघाला. आपल्या प्रिय पत्नीला विरहदुःख कांहीं दिवस सोसावें लागणार; पण मनांत जी विचिकित्सा उत्पन्न झालेली आहे तिचें समाधान झाल्यानंतर परत येऊन तिला भेटून आपल्यास झालेल्या सम्यक् ज्ञानाचा गुरूपदेश तिलाही करूं, अशा सहृदय भावनेनें गौतमबुद्ध त्या उभयतांस तेथेंच सोडून देऊन फक्त एका सारथ्याला घेऊन राजोद्यानांतून बाहेर पडला ! रात्रभर प्रवास करून सकाळीं एका पवित्र नदीच्या तीरावर येतांच आपल्या तलवारीनें त्यानें आपले लांब, सडक, सुगंधी तेल लावून तुळतुळीत केलेले केंस कापले, अंगावरील सर्व अलंकार उतरले आणि ते सर्व सारथ्याबरोबर कपिलवस्तूस परत पाठविले. नंतर मगध देशाची राजधानी जें राजगृह शहर तेथें जाऊन अलार व उद्रक या दोन पंडितांपासून हिंदुतत्त्वज्ञानाची माहिती त्यानें करून घेतली. अर्थात् शुष्क तत्त्वज्ञानानें त्याचें समाधान झालें नाहीं तेव्हां योगसाधनानें तरी चित्तांत सम्यक् ज्ञानाचा प्रकाश पडेल या भरंवशानें, विंध्यपर्वतांतील उरुवेलच्या निबिड अरण्यांत सहा वर्षेपर्यंत त्यानें इतकें देहदंडन केलें कीं, शेवटीं उभें राहण्याची देखील शक्ति त्याच्या अंगीं राहिली नाहीं. हठयोगानें समाधान होईना, तेव्हां त्यानें तोही सोडून दिला. अखेर असाच विचार करीत करीत भटकत असतां व निरंजन नदीच्या तीरीं महावृक्षाखालीं बसला असतां एक दिवस त्याच्या मनांत ‘खऱ्या परमार्थज्ञानाचें तेज’ प्रकाशमान झालें; ती सर्व रात्र त्यानें मनःसमाधीच्या ऐकांतिक सुखांत घालविली. दुसरे दिवसापासून आपल्यास मिळालेलें ज्ञान दुसऱ्यास शिकविण्यास त्यानें सुरवात केली. वैराग्य, आत्मयज्ञ, उपास, तप इत्यादिकांनीं त्याच्या ठिकाणीं जें तेज उत्पन्न झालें होतें तें सम्यक् ज्ञानाच्या आनंदानें दुणावलें, आणि सर्व जग शहाणें करून सोडण्याच्या त्याच्या सात्त्विक निश्चयानें जगद्गुरूची पदवी नसली तरी पात्रता त्याच्या अंगीं आपोआप त्रिनटली. येथपासून पुढें आपल्या अवतारसमाप्तीपर्यंत, सुमारें चाळीस वर्षेपर्यंत,

त्यानें उपदेशाचें पवित्र काम केलें. शेंकडों लोकांशीं युक्तिवाद केला. शेंकडों लोकांस कळकळीनें आळविलें. शेंकडों संघ स्थापिले व जवळ जवळ सर्व देशभर शिष्यमंडळ बनविलें. कोणत्याही नवीन मताची शिष्यपरंपरा हिंदुस्तानांत कशी फैलावत जाते याचा ज्याला अनुभव आहे त्याला गौतमबुद्धानें केवळ आपल्या निम्या हयातींत प्रचंड धर्मक्रांति कशी घडवून आणली असेल याची कल्पना येईल. यास्तव, गौतमगुरूचा दिग्विजय प्रथम केवळ पांच शिष्य-सैनिकांसह कसा सुरूं झाला; पहिल्याच यशाची प्राप्ति वाराणसीसारख्या सनातन-प्रिय अशा वैदिकधर्माच्या क्षेत्रीं कशी झाली; त्याच्या अपूर्व धर्मोप-देशाच्या लाटेंत संशयग्रस्त संसारी जनचसे काय, पण पूर्वपरंपरेनें पढलेले विद्वान् व बुद्धिमान् असे वैदिक, पंडित व पराक्रमी राजे कसे गडप झाले; चोर, पतित, चांडाल वगैरे सर्व प्रकारचे मूढ व दुराचारी जनही त्याच्या प्रसादतीर्थानें अंतर्बाह्य पुनीत होऊन सद्गुणी कसे बनले; वगैरे तपशील सांगत बसण्याचें कारण नाहीं. तसेंच या नव्या धर्मावतारानें निस्तेज जाहलेल्या असूयाग्रस्त अशा लोकांनीं गौतम बुद्धाचा पाडाव करण्याकरितां निंदा, अत्याचार वगैरे सर्व तामसी विद्या व पैशून्यकला खर्चीं घातल्या तरी गौतमबुद्धाच्या यशाची यत्किंचित्‌ही हानि न होतां अखेरपर्यंत त्याची कीर्ति वाढतच गेली, हा कथाभागही सांगत बसण्याचें कारण नाहीं. जगांत कोठेंही जा, सख्ख्या भावंडांचा तोंडावळा जसा सारखा असतो, तसेंच विभूतिमात्राचें चरित्रही पुष्कळ अंशीं सारखें असतें.

अशा रीतीनें आपलें आयुष्य सत्कार्यीं खर्चून व आपलें नांव अजरामर करून गौतमबुद्धानें आपल्या वयाच्या ऐंशीव्या वर्षीं देह ठेविला. बुद्धानें प्रथम पांच शिष्यांस उपदेश करून आपल्या कामास सुरवात केल्याचें वर सांगितलें आहे. लवकरच या पांचांचे साठ झाले व साठांचे हजारों झाले; व आजमितीस बुद्धाच्या धर्माचे अनुयायी असे पन्नास कोट लोक

पृथ्वीच्या पाठीवर आहेत! खुद्द बुद्धाच्या हयातींत कित्येक राजेलोकांनीं बौद्धधर्माची दीक्षा घेतली होतीच, तथापि खिस्ती शकापूर्वीं सुमारें तिसऱ्या शतकाच्या सुमारास अशोक नामक जो हिंदी सम्राट् होऊन गेला त्यानें बौद्धधर्माचा स्वीकार करून चहूंकडे त्याचा प्रसार होण्याची अतोनात खटपट केली. खुद्द अशोकाचा पुत्र मिलिंद व त्याची मुलगी हीं दोघेंही संन्यास स्वीकारून धर्मोपदेश करण्यास बाहेर पडलीं. त्यामुळें बौद्धधर्माच्या प्रसारास अत्यंत मदत झाली. पीतवस्त्र परिधान करणारे भिक्षु व धर्मोपदेशाच्या सात्त्विक आवेशांत संसारसुखाचा विसर पडलेल्या भिक्षुणी यांनीं थोड्याच काळांत चारी दिशा व नवखंड पृथ्वी व्यापिली. पूर्वेस ब्रह्मदेश, सयाम, चीन, जपान; उत्तरेस अफगाणिस्तान, तिबेट व हिमालयापलीकडील प्रदेश; दक्षिणेस सीलोन, जावा; व पश्चिमेस खोतान, तुर्कस्तान, मध्यआशिया वगैरे ठिकाणीं बौद्धसंघ व विहार यांची स्थापना झाली. तथापि कर्मधर्मसंयोगानें बौद्ध धर्माची जन्मभूमि जें हिंदुस्तान त्यांतूनच उत्पत्तीपासून एक हजार वर्षांच्या आंत त्याचें उच्चाटन झालें! बौद्धधर्माची वाढ जलद झाली व विस्तार फार वाढला, यामुळें लवकरच त्यामध्यें अनेक पंथ व मतांतरें उत्पन्न झालीं. या सर्वांचा मेळ घालण्याचा प्रयत्न प्रथम वजनदार बौद्धधर्मानुयायी राजेलोकांनीं केला. एकवाक्यता करण्याचा प्रयत्न करणारी पहिली परिषद् बुद्धाच्या मरणानंतर लवकरच म्हणजे इ. स. पूर्वीं ५४३ व्या वर्षीं मगध देशाचा अजातशत्रु याच्या कारकीर्दींत राजगृह येथें, बुद्धाचा ब्राह्मण पट्टशिष्य महाकाश्यप याच्या अध्यक्षतेखालीं, भरली होती. दुसरी परिषद् प्रसिद्ध सम्राट् अशोक याच्या कारकीर्दींत इ. स. पूर्वीं २५० व्या वर्षीं पाटणा शहरीं भरली; व चौथी परिषद् राजा कनिष्क यानें इ. स. ४० या सालीं भरविली. या सर्व परिषदांचा हेतु बौद्धधर्माच्या ग्रंथांत सुव्यवस्था व विल्हेवारी लावणें व मतांतरांची एकवाक्यता करणें हा होता. तथापि ती गोष्ट शक्य नसल्यामुळें उत्तरेकडची व दक्षिणेकडची अशा बौद्धधर्माच्या वेगवेगळ्या परंपरा निर्माण झाल्या.

कालांतरानें उत्तरबौद्ध व दक्षिणबौद्ध यांची, हजारों कोसांचें व हजारों वर्षांचें अंतर पडल्यामुळें, परस्पर ओळखही नाहींशी होऊन प्रत्येक परंपरेची विस्तार-परिणति स्थानिक स्थितीप्रमाणें वेगवेगळ्या दिशांनीं होत गेली. सुदैवानें बौद्धधर्माच्या पुनर्जीवनाचा काल हल्लीं आलेला दिसतो. या पुनर्जीवनप्रसंगीं पूर्वीप्रमाणें एखादा धर्मदिग्विजयी अवतारी पुरुष निर्माण होणार किंवा कसें, तें कोण सांगणार? तथापि, एवढी गोष्ट खरी कीं, एकंदर जगावर जी एक नव्या विचारक्रांतीची छाया हल्लीं पडत आहे, तिच्या अनुषंगानें बौद्धधर्माविषयीं तन्मतानुयायांची दृष्टि नवीन होऊन निरनिराळ्या बौद्धधर्मी देशांत पूर्वीहून परस्पर अधिक दळणवळण वाढेल, जुन्या बौद्ध वाङ्मयावर पडलेली राख फुंकली जाऊन त्यांतील ग्राह्यांश सतेज होऊन लोकनिदर्शनास येईल, आणि बुद्धाच्या जन्मभूमींतही पूर्वकालीन विरोध विसरला जाऊन बौद्धधर्म हा कांहींही झालें तरी भारतीय धर्मांपैकींच एक पंथ आहे व या दृष्टीनें हिंदुलोकांचेंही ममत्व त्याचे ठिकाणीं असलें पाहिजे, ही भावना अधिकाधिक जागृत होईल, यांत शंका नाहीं.

## ५. रसिकांप्रत

कुस्करूं नका हीं सुमनें !
जरि वास
नसे तिळ यांस
तरी तुम्हांस
अर्पिलीं सुमनें
कुस्करूं नका हीं सुमनें ! १
मधु जरी
नसे तिळभरी
अंतरीं तरी
करीं हीं धरणें
कुस्करूं नका हीं सुमनें ! २
यां वर्ण
नसे सौवर्ण
जों न हीं शीर्ण
तोंवरी धरणें
कुस्करूं नका हीं सुमनें ! ३
घ्या करीं
क्षणाभीतरीं
वाळतिल तरी
तयांना जपणें
कुस्करूं नका हीं सुमनें ! ४
हीं वन्य
फुलें मधुशून्य
तुम्हांकरिं धन्य
मानातिल सजणें
कुस्करूं नका हीं सुमनें ! ५

घरिं मुलें
तशीं हीं फुलें
हूड वत्सलें
लोचनें बघणें
कुस्करूं नका हीं सुमनें ! ६

अंगुली
कठिण लागली
तरी संपली
हळुच यां शिवणें
कुस्करूं नका हीं सुमनें ! ७

हृद्वनीं
फुलें कोठुनी ?
जशीं उपवनीं
विलसती नयनें
कुस्करूं नका हीं सुमनें ! ८

मालती
बकुळ, जुइ, जाति,
हीं जरी हातिं,
हींहि असुं देणें
कुस्करूं नका हीं सुमनें ! ९

अंजली
धरुनि अर्पिलीं
भक्तिनें दिलीं
म्हणुनि तरि घेणें
कुस्करूं नका हीं सुमनें ! १०

## ६. गोखल्यांची दक्षिण आफ्रिकेची सफर

हिंदी मजुरांनीं भरलेलें एक जहाज १६ नोव्हेंबर १८६० रोजीं आफ्रिकेच्या किनाऱ्याला लागलें. तेव्हांपासून ब्रिटिश साम्राज्यांतील राजकारणांत एका नवीन प्रश्नाची भर पडली. हिंदुस्थानांतून मुद्दतबंदीनें पाठविलेल्या मजूर लोकांची स्थिति गुलामाप्रमाणें होत असे. हिंदी मजुरांच्या मेहनतीचीं फळें तेवढीं अत्यंत थोडा मोबदला देऊन आपल्याला कशीं मिळतील इकडे युरोपियन वसाहतवाल्यांचें लक्ष असे. त्याकरितां त्यांनीं पक्षपाती कायदे केले; हिंदी लोकांना मत देण्याचा अधिकार नाकारण्यांत आला. ट्रॅम अथवा रेल्वे गाडीमधून प्रवास करितांना सुद्धां हिंदी लोकांना अपमान सोसावे लागत. नाताळ व ट्रान्सवाल वगैरे वसाहतींतील शहरांतल्या सार्वजनिक हॉटेलमध्यें हिंदी प्रवाशांना उतरण्याची मनाई होऊं लागली. हिंदी लोकांकडून वाटेल तसे कर चोपून घेण्यांत येत असूनहि शहर-म्युनिसिपॅलिट्यांसारख्या स्थानिक संस्था हिंदी लोकांच्या सुखसोयींकडे पूर्ण दुर्लक्ष करीत. आफ्रिकेंतील हिंदी लोक प्रथम कांहींएक कुरकुर न करितां मुकाट्यानें सर्व कांहीं सहन करीत होते; परंतु सहनशक्तीच्या मर्यादेची परमावधि झाली आणि हिंदी लोक आपल्या निसर्गसिद्ध हक्कांकरितां चळवळ करूं लागले. सुदैवानें हिंदी लोकांना योग्य नेता भेटला. हिंदी लोकांची स्थिति पाहून मोहनदास गांधींचें अंतःकरण द्रवलें व आपल्या देशबांधवांची स्थिति सुधारण्याचा त्यांनीं निश्चय केला. गांधींनीं पुढारीपण अंगीकारल्यावर आफ्रिकेंतील हिंदी लोकांमध्यें एक प्रकारचें चैतन्य उत्पन्न झालें. चळवळीला व्यवस्थित स्वरूप येण्याकरितां १८९४ सालीं गांधींनीं इतर पुढाऱ्यांच्या मदतीनें "नाताळ इंडिअन कॉंग्रेस" ही संस्था काढिली व आपण स्वतः तिचे सेक्रेटरी झाले.

आफ्रिकेमध्यें चळवळीला कांहींसें स्थायिक स्वरूप दिल्यानंतर गांधी हिंदुस्थानांत आले आणि हिंदी लोकांपुढें आफ्रिकेंतील स्थिति

खुलासेवार मांडून त्या प्रश्नाकडे त्यांनीं हिंदी जनतेचें लक्ष वेधलें. गांधी आणि गोखले यांचा प्रथम परिचय या वेळेला झाला. तेव्हांपासून तों अखेरपयत गोखल्यांनीं गांधींना आफ्रिकेच्या प्रश्नासंबंधीं अत्यंत सहाय्य केलें. १८९६ सालच्या प्रथम भेटींची हकीकत गांधींनीं स्वतः एके ठिकाणीं दिली आहे. ते लिहितात, “त्या वेळीं ( १८९६ सालीं ) हिंदुस्थानांतील प्रमुख पुढाऱ्यांना प्रणिपात करण्याचा सुप्रसंग मला मिळाला. पण जी शीतलता मला गोखले यांचे भेटींत लाभली ती मी इतरांपासून मिळवूं शकलों नाहीं. सर्वांनींच माझ्यावर प्रेमाचा वर्षाव केला हें खरें ! परंतु गोखल्यांनीं मला प्रेमानें बद्ध करून टाकलें.” गोखल्यांनाहि गांधींच्याबद्दल अत्यंत प्रेम व आदर वाटत असे. १९०९ सालच्या कॉंग्रेसमध्यें आफ्रिकन प्रश्नावर बोलतांना गोखल्यांनीं खालील उद्गार काढले, “Gentlemen, it is one of the privileges of my life that I know Mr. Gandhi intimately and I can tell you that a purer, a nobler, a braver and a more exalted spirit has never moved on this earth.—” गांधींवरील या प्रेमाधिक्यामुळें तर आफ्रिकन प्रश्नाकडे गोखल्यांचें लक्ष फारच वेधलें. १८९७ सालीं गोखले इंग्लंडला गेले त्या वेळीं “आफ्रिकेंतील हिंदी लोक” या विषयावर इंडिआ पत्रांत त्यांनीं एक लेख लिहिला होता.

१८९९ सालीं बोअर युद्ध सुरू झालें. हें युद्ध सुरू करतांना “बोअर सरकार ब्रिटिश इंडिअनांना चांगलें वागवीत नाहीं” हें एक कारण लॉर्ड लॅन्सडौन व मि. जोसेफ चेंबरलेन यांच्यासारख्या वजनदार मुत्सद्दी लोकांकडून सांगण्यांत आलें होतें. साहजिकच लढाई संपल्यानंतर आपल्याला सुखानें राहतां येईल अशी हिंदी लोकांची समजूत झाली, आणि याच आशेवर विसंबून आफ्रिकेंतील व हिंदुस्थानांतील लोकांनीं साम्राज्य सरकारला सर्वतोपरी मदत केली. परंतु ती समजूत चुकीची ठरली, अनुभव विरुद्ध आला व बोअर सरकार बरें म्हणण्याची पाळी आली. बोअर सरकारच्या अमदानींत हिंदी लोकांवर फारसे

निर्बंध नव्हते. नवीन होणाऱ्या राज्यव्यवस्थेंत हे निर्बंध दृढतर करण्यांत आले. वसाहतींमध्यें हिंदी लोकांची संख्या बेसुमार वाढत आहे अशी विनाकारण हाकाटी पिटण्यांत आली. वास्तविक पाहतां ट्रान्सवालमध्यें हिंदी लोकांची संख्या पांच हजारांनीं कमी झाली होती. १९०७ सालीं वसाहत सरकारनें Asiatic Law Amendment Act पास केला. हा कायदा पास करण्यांत दोन हेतु होते. नवीन एशियाटिक लोकांना वसाहतींत येण्यापासून परावृत्त करणें व युद्धाच्या पूर्वी असलेल्या लोकांना सक्तीनें नोंद करण्यास लावणें. गांधींच्या प्रमुखत्वाखालीं हिंदी लोकांनीं या कायद्याचा तीव्र निषेध केला. इंग्लंडला शिष्टमंडळें धाडिलीं; परंतु कांहींएक उपयोग होईना. तेव्हां वाटेल तितके हाल सोसूं पण असला जुलमी कायदा मान्य करणार नाहीं असा निर्धार हिंदी जनतेनें केला. आठ हजार हिंदी लोकांपैकीं फक्त पांचशें लोकांनींच आपलीं नांवें रजिस्टर केलीं. गांधींना पकडण्यांत आलें. इतर पुष्कळ पुढाऱ्यांना तुरुंगवास घडला. परंतु लौकरच गांधी व जनरल स्मट्स यांच्यामध्यें तडजोड ठरली. ह्या तडजोडी-प्रमाणें तीन महिने झाल्यानंतर रजिस्ट्रेशनचा कायदा परत घ्यावयाचा व तोंपर्यंत हिंदी लोकांनीं आपखुषीनें आपलीं नांवें नोंदावीं असें ठरलें. तडजोडीच्या या अटी गांधींनीं पाळल्या. त्यांनीं सर्वांच्या अगोदर आपलें नांव नोंदलें व दुसऱ्यांना नोंदावयाला लाविलें. लोकांनीं अटी पाळल्या. परंतु अधिकारी आपल्या वचनाला जागले नाहींत. यामुळें लोक संतापले. सुमारें अडीच हजार लोकांनीं रजिस्ट्रेशन सर्टीफिकिटें जाळून टाकिलीं व सत्याग्रहाच्या चळवळीला पुनः सुरवात केली.

अशा आणीबाणीच्या वेळीं गांधींना गोखल्यांची फार मदत झाली. सत्याग्रहांत भाग घेतल्यामुळें तुरुंगांत गेलेल्या लोकांपैकीं बहुतेक सर्व-जण कुटुंबाचे पोशिंदे असल्यामुळें त्यांच्या पाठीमागें त्यांच्या बायका-मुलांची उपासमार होऊं लागली. व्यापारी लोकांचा व्यापार बसला व जवळ जवळ एक हजार कुटुंबें निराश्रित झालीं. या अनाथ

कुटुंबांना हिंदुस्थानांतून मदत पाठविण्याचें कार्य गोखल्यांनीं आपल्या शिरावर घेतलें. मदत मागण्याकरितां आफ्रिकेंतून हिंदुस्थानांत आलेले गांधींचे एक युरोपियन अनुयायी मि. पोलाक यांना बरोबर घेऊन हिंदुस्थानांतील प्रमुख प्रमुख शहरीं गोखले हिंडले. मि. पोलाक यांच्या तोंडून दक्षिण आफ्रिकेंतील आपल्या देशबांधवांची हृदय-द्रावक कहाणी ऐकूनच हिंदी लोकमत प्रक्षुब्ध झालें होतें आणि प्रत्येकाला सहानुभूति वाटत होतीच. शिवाय गोखल्यांच्या रस-वंतीनें मोहित न होणारा धनिक विरळाच! गोखल्यांनीं हां हां म्हणतां जरूर तितकी रक्कम जमविली आणि गांधींच्या करितां पाठवून दिली. इतकें करून गोखले थांबले नाहींत. नाताळांत मुदत-बंदीच्या ठरावानें मजूर पाठविण्याच्या पद्धतीला निर्बंध घालण्यांत यावा अशा अर्थाचा ठराव गोखल्यांनीं कौन्सिलमध्यें आणिला. या ठरावावर बरींच अनुकूल भाषणें झालीं आणि त्यांत गोखल्यांच्या विधानांस पुष्टीच मिळाली. सरकारनें हा ठराव मान्य केला म्हणून मतें घेण्याचें कारण पडलें नाहीं. परंतु मतें घेण्याचा प्रसंग येता तरी हिंदी-युरोपि-अन, सरकारी-बिनसरकारी या सर्व सभासदांनीं गोखल्यांच्या सारखेंच मत दिलें असतें यांत शंका नाहीं. हा ठराव जरी नाताळमधील मुदत-बंदीच्या मजुरांसंबंधीं होता तरी ब्रिटिश साम्राज्यांत हिंदुस्थानचा दर्जा काय राहणार या प्रश्नाशीं तो निगडित झालेला होता. हिंदी लोकांचा—विशेषत: मजूर वर्गाचा—छळ एकट्या नाताळांतच होत होता असें नाहीं. दक्षिण आफ्रिकेंतील सर्वच वसाहतींमध्यें हिंदी लोकांना अपमानास्पद रीतीनें वागविण्यांत येत होतें. सुशिक्षित असो वा नसो, समाजांतील निकृष्ट वर्गांतील असो अथवा पिढीजाद घरंदाज असो, त्याला 'कुली' (हमाल) 'सॅमी' (स्वामी शब्दाचा अपभ्रंश) अशा तुच्छतादर्शक शब्दांनीं संबोधण्यांत येई. हिंदी लोकांना साम्राज्यांत अस्पृश्यांप्रमाणें वागविण्यांत येत होतें, ही गोष्ट कौन्सिलच्या नजरेस गोखल्यांनीं आणिली. नाताळची भरभराट हिंदी मजुरांवर अवलंबून आहे व हिंदी मजुरांचा

पुरवठा नाताळला होऊं नये अशी तजवीज हिंदुस्थान सरकारनें केली तर वसाहतवाल्यांचे डोळे उघडतील व हिंदी लोकांवरील जुलमी कायदे ते रद्द करतील अशा कांहींशा प्रतिकारबुद्धीनें गोखल्यांनीं वरील ठराव मांडला होता. हिंदुस्थान सरकारनें तो मान्यहि केला.

इकडे आफ्रिकेमध्यें निरनिराळ्या वसाहती एकत्र करून त्यांचें एक संयुक्त सरकार बनविण्याचें ब्रिटिश प्रधान मंडळानें ठरविलें. या एकीकरणाच्या वेळीं विलायतेंतील सरकारानें फिरून एकवार हिंदी लोकांच्या गाऱ्हाण्यांकडे लक्ष देऊन ज्या कायद्यांच्या योगानें अत्यंत असंतुष्टता माजत आहे ते सर्व कायदे रद्द करावेत अशी युनियन सरकाराला सूचना केली. त्याप्रमाणें रजिस्ट्रेशन कायदा रद्द करण्याचें युनिअन सरकारनें ठरविलें, पण एक निराळाच कायदा निर्माण करून हिंदी लोकांचे जन्मसिद्ध हक्क हिरावून घेतले. फिरून एकदां हिंदी लोकांचा स्वाभिमान कसास लावण्याचा प्रसंग आला व प्रचंड चळवळ होण्याचा संभव दिसूं लागला.

या वेळीं गोखले इंग्लंडमध्यें होते. इंग्लंडमध्यें असतांना गोखल्यांनीं हारकोर्ट, लॉर्ड ग्लॅडस्टन वगैरे मंडळींच्या भेटी घेऊन दोन्ही पक्षास मान्य होतील अशा प्रकारच्या तडजोडीच्या अटींचा विचार चालविला. पण तत्पूर्वी आफ्रिकेंतील परिस्थिति प्रत्यक्ष पाहण्याचा त्यांनीं निश्चय केला; कारण तडजोडीच्या अटी मान्य करणें न करणें हें आफ्रिकेंतील युरोपिअन लोकांवरच अवलंबून होतें. त्यांच्या कित्येक स्नेह्यांनीं आफ्रिकेला जाऊं नये असा सल्ला दिला. हिंदी मनुष्य कितीही सुशिक्षित असो, त्याचा दर्जा कितीही मोठा असो त्यास बोटीवर व आफ्रिकेमध्यें अत्यंत अपमानास्पद रीतीनें वागविण्यांत येत असे. इंग्लंडहून दक्षिण आफ्रिकेंत जाणाऱ्या बोटीवर एशियाटिक मनुष्याला मज्जाव असे. एखाद्याला घेतलेंच तर अस्पृश्याप्रमाणें वागविण्यांत येई. बोटीवरून उतरल्यावर आंगठा उठवून देण्याची सक्ति होती व इंग्रजी भाषेची परीक्षा उतारूला द्यावी लागे. या सर्व प्रतिकूल परिस्थितीचा अनुभव गांधीसारख्यांना पूर्वी

आलाच होता. अशा तऱ्हेची मानहानि सहन करण्याची पाळी गोखल्यांच्यावर येऊं नये अशा सद्धेतूनेंच आफ्रिकेंत जाण्याच्या विरुद्ध सल्ला कित्येकांनीं दिला. आगबोटीचें तिकिट मिळण्यास गोखल्यांना थोडीबहुत अडचण भासलीच परंतु त्यांचा पुढील सर्व प्रवास सुखकर झाला व त्यांच्या स्नेह्यांना वाटलेली भीति निराधार ठरली.

ता. २२ आक्टोबर १९१२ रोजीं गोखल्यांची बोट आफ्रिकेच्या किनाऱ्याला लागली. गोखले दक्षिण आफ्रिकेमध्यें असेतोंपर्यंत त्यांची सर्व व्यवस्था करण्याकरितां युनिअन सरकारकडून इमिग्रेशन खात्यांतील मि. रन्सिमन यांची योजना झाली होती. आफ्रिकेंतील हिंदी लोकांनीं गोखल्यांचा सत्कार केलाच पण या सत्कारांत युनिअन सरकार व युरोपियन लोक यांनींहि आनंदानें भाग घेतल्यामुळें एकाद्या राजाचाहि जो सन्मान होणें नाहीं तो भारतसेवक गोखले यांचा झाला. गोखल्यांनीं आपल्या भाषणांनीं युरोपियन लोकांचींहि मनें मोहून टाकलीं आणि त्यांच्या आगमनानें आफ्रिकेंतील वातावरण पवित्र बनलें आहे असें सर्वांना वाटूं लागलें. गोखल्यांचीं ठिकठिकाणीं व्याख्यानें होत व तीं ऐकण्यास युरोपियन व हिंदी लोक पूर्वीचा द्वेषभाव विसरून जाऊन एकाच रांगेंत बसत. गोखल्यांचा सन्मान करण्यांत त्यांच्यामध्यें अहमहमिका लागलेली दिसून येई. केपटौन, किंबर्ले, जोहान्सबर्ग, दरबान, प्रिटोरिआ, वगैरे प्रमुख शहरांना त्यांनीं भेट दिली व प्रत्येक ठिकाणीं त्यांचें हिंदी व युरोपियन समाजांकडून अश्रुतपूर्व स्वागत झालें. दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांची स्थिति प्रत्यक्ष अवलोकन करावी व सर्वांना मान्य होईलशी तडजोड सुचवावी हा तेथें जाण्यांत गोखल्यांचा हेतु होता; आणि तेवढ्याकरितां त्यांनीं अश्रांत परिश्रम करून मिळाली ती माहिती गोळा केली. दक्षिण आफ्रिकेची राजधानी प्रिटोरिया येथें जनरल बोथा व जनरल स्मट्स यांची गोखल्यांनीं भेट घेतली. तीबद्दल गांधी लिहितात—"भेटीच्या आदल्या दिवशीं त्यांनीं मि. कॅलनबॅक ( गांधींचे जर्मन अनुयायी ) यांची व माझी परीक्षा घेतली. स्वतः पहाटेस

तीन वाजतां उठले. आम्हा दोघांनाहि उठविलें. त्यांना दिलेलें सर्व साहित्य त्यांनीं वाचून ठेविलेंच होतें. पण माझी उलट तपासणी करून त्यावरून स्वतःची तयारी पूर्ण झाली आहे किंवा नाहीं हें त्यांना ठरवावयाचें होतें......त्यांच्या उलटतपासणीचें वर्णन मी काय करूं ? त्या कामांत त्यांनीं घेतलेल्या काळजीची प्रशंसा किती करूं ? ”

गोखल्यांचें दक्षिण आफ्रिकेंतील कार्य अत्यंत अवघड होतें. स्वकीय आणि परकीय या दोघांनाहि त्यांना संतुष्ट करावयाचें होतें. हिंदी लोकांचे नैसर्गिक हक्क रक्षण करतांना दुसऱ्यांच्या हक्कांवर त्यांना घाला घालावयाचा नव्हता. स्वदेशबांधवांचें अपमानशल्य दूर करितांना परकीयांच्या मनोवृत्तीही लक्षांत घ्यावयाच्या होत्या. स्वदेशाची प्रतिष्ठा वाढवावयाची होती परंतु अन्य देशाचा अपमान करण्याची त्यांची इच्छा नव्हती. आफ्रिकेंतील झगडा वर्णविशिष्ट असल्यामुळें तत्संबंधीं प्रश्नांचा निर्विकार चित्तानें सांगोपांग विचार होणें जरूर होतें. ब्रिटिश साम्राज्याचे प्रजाजन असलेले हिंदी लोक त्यांच साम्राज्याच्या एका विभागांत अपेक्षाप्रमाणें वागण्यास तयार होणें शक्य नाहीं आणि त्यांच्यावर लादलेले अनैसर्गिक व अन्याय्य निर्बंध दूर झालेच पाहिजेत असें गोखल्यांनीं युरोपिअनांना बजाविलें. परंतु त्याच वेळीं त्यांनीं आपल्या देशबांधवांस हेंहि सांगण्यास कमी केलें नाहीं कीं, तात्त्विकदृष्ट्या ब्रिटिश साम्राज्यांतील प्रजाजन या नात्यानें साम्राज्यांत कोठेंहि जाण्यास निर्बंध नसला तरी समतेच्या या तत्त्वाचा व्यवहारांत उपयोग योग्य मर्यादेंतच केला जातो. युरोपिअन लोकांची मुख्य तक्रार अशी होती कीं, आफ्रिकेमध्यें येण्याचा हिंदी लोकांचा क्रम आणखी कांहीं दिवस अनिरुद्ध चालू राहिला तर त्यांचें संख्याधिक्य होईल आणि आमची संस्कृति व आमच्या संस्था यांना धक्का पोहोंचेल. युरोपिअन लोकांची ही भीति निराधार होती. मुदतबंदीनें मजूर पाठविण्याची पद्धत बंद झाल्यामुळें हिंदी लोकांची संख्या वाढण्याची भीति उरली नव्हती आणि तशी भीति वाटत असलीच तर

तडजोड म्हणून युरोपिअन लोकांना पाहिजे असलेलें आश्वासन हिंदी लोकांतर्फे देण्यास गोखले तयार होते. परंतु जे हिंदी लोक आफ्रिकेमध्यें स्थायिक झाले होते त्यांना योग्य रीतीनें वागविण्याचें युनिअन सरकारनें आश्वासन दिलें पाहिजे असा गोखल्यांचा आग्रह होता. आफ्रिकेंतील हिंदी लोकांपैकीं बहुतेक मुदतबंदीच्या ठरावानें आलेल्या मजुरांचे वंशज आहेत. हे हिंदी लोक आपखुषीनें गेले नसून युरोपिअन वसाहतवाल्यांच्या हिताकरितांच त्यांना तेथें जावें लागलें. हिंदी मजुरांनीं आफ्रिकेंतच वस्ती करून राहावें अशी वसाहतवाल्यांची इच्छा पूर्वीं दिसून येत होती. पण आतां हिंदी मजुरांनीं मुदत संपल्याबरोबर स्वदेशास परत जावें म्हणून त्यांच्यावर तीन पौंडांचा कर लादण्यांत आला होता. तीन पौंडांची डोईपट्टी मुदतबंदी मजुरांना—पुरुष, स्त्रिया, सोळा वर्षांच्या वरील मुलगा आणि तेरा वर्षांवरील मुलगी यांचा यांत समावेश होतो—त्यांची मुदतबंदी संपल्यावर दर वर्षीं द्यावी लागत असे. इतका जबर व अन्यायाचा कर पृथ्वीच्या पाठीवर इतरत्र आढळून येईल कीं नाहीं याची शंकाच आहे. माणुसकीला कमीपणा आणणारा हा कर बंद करण्याबद्दल युनिअन सरकारला गोखल्यांनीं विनविलें. युनिअन सरकारनेंहि ‘ मजुरांवरचा हा कर काढून टाकूं ’ असें अभिवचन गोखल्यांना दिलें.

अशा तऱ्हेची कामगिरी करून गोखले १९ नोव्हेंबर १९१२ रोजीं मातृभूमीस परत आले. आतां आफ्रिकेंत शांतता झाली असें त्यांना वाटलें, परंतु वर्णद्वेषांत मुरलेल्या युरोपिअन लोकांच्या दुराग्रहामुळें त्यांची अपेक्षा समूळ फसली. तीन पौंडांची डोईपट्टी फक्त स्त्रीवर्गाकडून न घेण्याचा ठराव युनिअन सरकारनें केला. गोखल्यांच्या अभिवचनांवर विश्वासून हा कायदा आतां रद्द होणार असें हिंदी लोक समजत होते, परंतु त्यांची तीव्र निराशा झाली. शिवाय आगींत तेल ओतावें त्याप्रमाणें हिंदु अथवा मुसलमानी पद्धतीनें झालेले विवाह बेकायदेशीर ठरविणारा हिडिस व अपमानकारक असा आणखी एक कायदा

पास करण्यांत आला. आफ्रिकेंतील पुढाऱ्यांनीं गोखल्यांना तार करून विचारलें कीं, तीन पौंडांच्या डोईपट्टीचा कायदा स्त्रियांपुरताच बंद होणार होता कीं काय ? हा कायदा अजिबात बंद करण्याचें वचन प्रधानमंडळानें आपणांला दिलें होतें असें गोखल्यांनीं कळविलें. गांधींनीं आपलें सत्याग्रहाचें व्रत फिरून चालू केलें. मागील खेपप्रमाणें याहि खेपेस जरूर तें द्रव्यसाहाय्य करण्याचे प्रयत्न गोखल्यांनीं केले. पब्लिक सर्व्हिसेस कमिशनकरतां या सालीं त्यांना हिंदुस्थानांतील प्रमुख शहरीं हिंडावें लागत होतेंच, त्याचा फायदा घेऊन कमिशनच्या कामाबरोबर वर्गणी गोळा करण्याचें कामही गोखले करीत. आणि अशा रीतीनें त्यांनीं सुमारें पांच लक्ष रुपये गांधींच्या मदतीकरिता पाठविले.

दक्षिण आफ्रिकेच्या प्रश्नासंबंधीं हिंदुस्थानांत जागृति व सहानुभूति उत्पन्न करण्याचें सर्व श्रेय गोखल्यांनाच दिलें पाहिजे. दक्षिण आफ्रिकेचा प्रश्न समाधानकारक कसा सुटेल याची अहोरात्र चिंता त्यांना लागली होती. महात्मा गांधी म्हणतात, “शेवटपर्यंत विश्रांति घेण्याचें त्यांनीं नाकारिलें. दक्षिण आफ्रिकेहून येणाऱ्या पत्रासारख्या लांबलचक तारा मध्यरात्रीं आल्या तरी त्याच क्षणीं वाचाव्या, जबाब त्याच क्षणीं तयार करावा, ताबडतोब लॉर्ड हार्डिंजना तारा कराव्यात, वर्तमानपत्रांत पाठविण्याच्या मजकुराचा मसुदा करावा आणि या सर्व कामाच्या गर्दींत खाण्याचेंहि राहून जावें, निजण्याचेंही बाजूस राहावें.” अशा अनन्यसाधारण परिश्रमानें नेटास लावलेला दक्षिण आफ्रिकेचा प्रश्न गोखल्यांच्या हयातींतच अंशतः तरी सुटला ही त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट होय. तीन पौंडांची डोईपट्टी उठली, लग्नासंबंधीं कायदा रद्द झाला व आफ्रिकेमध्यें जाण्याची मुभा हिंदी लोकांना मिळाली.

# ७. गोपाळ कृष्ण गोखले

धीरोदात्त तुझी अजून हसरी मूर्ती पुढें खेळते
तें बुद्धिप्रभ लोचनांतिल दिसे औदार्य आकर्षक
ती गम्भीर सहिष्णुता, वदनिंची शान्ती मनोदर्शक
तो मञ्जुध्वनि वाक्प्रवाह, पुढती सारें उभें राहतें !

त्वन्मानव्य अगाध ! नित्य रमलें देशैकभावें मन
राष्ट्रांच्या प्रगतींत पाउल पुढें केव्हां पडे हिन्दवी
या चिन्तेंत जळून, दूर करण्या दुःखें तशी यादवी
सोशी घाव अघोर ऐरणिवरी, घ्यायास तेजःकण

होतें व्याकुळ चित्त ! बान्धव तुझ्या दारीं तदा पातले
अश्रूंनीं हसरें कलेवर तुझें तें न्हाणुनी वन्दिती
कार्यामाजि तुझ्या अलौकिक असें देवत्व ते पाहती
तें हृन्मन्दिरिं साठवून, सुमनीं त्यांनीं तुला पूजिलें

दृश्यादृश्य कणांत हें प्रगतिचें चैतन्य आलोकितों
अन् मी भारतसेवका, तुज मनोभावें नमस्कारितों.

## ८. गोविंदरावांचें आपल्या मुलास पत्र

मुला, एके दिवशीं संध्याकाळीं मी कचेरींतून घरीं आलों आणि आंगरखा पागोटें काढीत होतों, तों पलीकडच्या खोलींतून असे शब्द माझ्या कानीं पडलेः “छे, छे, बाबा, गतवर्षींचा तो गणिताचा कागद हातीं पडला, एकदा दोनदा वाचला आणखी कांहीं सुचेना, तेव्हां असें वाटलें कीं, जाऊन कुठें तरी जीव द्यावा. परीक्षा पास होईना तर पुनः तोंड दाखवायला तरी यायचं कशाला? असे एकसारखे विचार माझ्या डोक्यांत घोळत होते. ते तीन तास मीं कसे काढले असतील, तें माझें मलाच ठाऊक!” मुला, हे शब्द कोणीं कोणाजवळ उच्चारले होते हें मीं तुला सांगावयाला नको. हे शब्द माझ्या कानीं पडले, तेव्हां एखाद्याच्या हृदयाला डागणीनें चरका द्यावा त्याप्रमाणें माझ्या काळ-जास त्या शब्दांनीं चरका बसला. बरें तर बरें, ते शब्द ऐकण्यास तुझी आई जवळ नव्हती. नाहींतर तिनें आकांतच केला असता. ते शब्द तूं आपल्या स्नेह्याजवळ उच्चारलेले कानीं आल्यापासून आणि त्यांत त्या स्नेह्यानें तुझ्या म्हणण्यावर “जीवबीव देण्यांत कांहीं अर्थ नाहीं, पण असं नापास झालं, म्हणजे कुठें तरी निघून जावंस मात्र वाटतं; आणखी यंदा जर आपण पास झालों नाहीं तर तिकडच्या तिकडेच जाणार निघून कुठें तरी” असे उद्गार काढले, तेव्हां तर माझ्या मनाची जी स्थिति झाली ती कांहीं सांगतांच येत नाहीं. त्या दिवशीं तुझ्या आईनें मला चारदा विचारलें कीं, असे उदास कां? पण मी उत्तर काय देणार? कांहीं तरी टाळाटाळीचें उत्तर देऊन तिचें समाधान केलें झालें; आणि हें पत्र लिहून तूं परीक्षेला जाण्यास निघा-लास म्हणजे तुझ्या हातीं देऊन ‘परीक्षेला सुरवात होण्याच्या अगो-दर केव्हां तरी जरूर वाच’ असें सांगावें असा बेत केला. त्याप्रमाणें दुसरेच दिवशीं पत्र लिहूनही टाकलें व आज हें तुझ्या हातांत देतों आहें. प्रत्यक्ष तुला जवळ बसवून घेऊन उपदेश करीत बसण्यापेक्षां हाच मार्ग मला बरा दिसला

मुला, परीक्षा आणखी जीव यांचा खरा खरा संबंध काय आहे, याचा कधीं तूं विचार केला आहेस काय? युनिव्हर्सिटीनें घातलेले गणिताचे चार प्रश्न तुला सोडवितां आले नाहींत म्हणजे सगळ्या जीविताचा तिरस्कार करून त्याच्यावर पाणी सोडावयाचें आणि आपल्या इष्टमित्रांस विनाकारण दुःखांत पाडावयाचें याचा हेतु काय बाबा? हें जीवित योग्य मार्गानें चालवून जगांत राहण्यास जीं अनेक साधनें आहेत त्यांपैकींच परीक्षा पास होणें हें एक साधन आहे. हें एक साधन आपल्या हस्तगत होत नाहीं, म्हणजे जें काय साधावयाचें तेंच नष्ट करून टाकावयाचें हा मार्ग कुठला? परीक्षा पास होणें हेंच जन्माचें सार्थक; परीक्षा पास झाल्या नाहींत तर जन्म व्यर्थ; नव्हे त्या जन्मांत अगदीं तात्पर्य नाहीं, मग जगूं सुद्धां नये असें तुझ्या मनांत आलें तरी कसें? मुला, परीक्षा पास होणें हें कांहीं मुख्य साध्य नव्हे तर परीक्षा देणें म्हणजे उत्तम तऱ्हेनें आयुष्य घालविण्यासाठीं एक साधन करून ठेवणें होय. परंतु तें साधलें नाहीं कीं, सर्व जन्माची इतिश्री करावयाची हा न्याय कुठला? परीक्षा, परीक्षा ती काय! नाहीं झाली तर नाहीं. तिच्यावांचून आयुष्यक्रम उत्तम प्रकारानें घालविण्यास आणखी हवीं तेवढीं साधनें आहेत. एक साधेना तर दुसऱ्यासाठीं यत्न करून पाहिला. मनुष्य आहे, मनापासून श्रम करतो आहे, हातीं घेतलेल्या कामांत यश यावें अशी मनापासून कळकळ वाटून उद्योग चालू ठेवला आहे, तर त्याचें फळ तावडतोब जरी नाहीं, तरी कांहीं काळानें तरी येणार खास. युनिव्हर्सिटीची परीक्षा म्हणजे जीवितसर्वस्व नाहीं. ती ज्यांना साधेल, तेवढ्यांनींच जगांत रहावें, इतरांनीं राहूं नये असें कांहीं नाहीं. तशा परीक्षा ज्यांच्या झाल्या असतील त्यांना तें साधन लवकर प्राप्त झालें याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें, परंतु इतरांना तें प्राप्त झालें नाहीं म्हणून त्यांनीं जगांतून काळें करावें हें मूर्खाखेरीज कोणासही योग्य वाटणार नाहीं. एका मार्गानें जाऊन आपलें नेमलेलें ठिकाण सांपडत नाहीं तर तो

मार्ग सोडावा एवढेंच, परंतु पुनः कोणच्याच मार्गाचें नांव घ्यावयाचें नाहीं असा बंदोबस्त करून टाकणें अगदीं मूर्खपणा नव्हे काय ?

मुला, आयुष्याचा हेतु निराळाच आहे. परीक्षा देणें हा हेतु नव्हे तर अमेरिकन कवि लॉंगफेलो यानें म्हटल्याप्रमाणें,

अफाट ऐशा विश्वरणांगणिं चकमक संसाराचि असे ।
तींत लढोनी बहु धीरानें नांव गाजवा शूर असें ॥
मुकीं बिचारीं कुणिहि हांका । अशीं मेंढरें बनूं नका ॥

हा कवीचा उपदेश सदोदित ध्यानांत ठेवला पाहिजे.

या चकमकींत अमक्याच हत्यारानें लढा आणि अमक्या हत्यारानें लढूं नका असें कोणीं आपल्याला नेमून दिलें नाहीं. ज्या वेळीं ज्या हत्याराची जरूर लागेल, किंवा जें हत्यार आपल्याला चांगल्या प्रकारानें पेलतां येईल, तें हत्यार घेऊन कायावाचामनानें लढलें पाहिजे इतकेंच काय तें. आपण जन्माला आलों आहों तें आपल्या हातानेंच आपला प्राण घेण्यासाठीं काय ? आणि तेंही कां तर ज्या हत्याराच्या प्राप्तीसाठीं आपण झटत होतों तें हत्यार आपल्या हातीं आलें नाहीं किंवा येण्याची आशा नष्ट झाली म्हणून ! बाबारे, त्याच हत्यारानें विश्वरणांगणांत चाललेल्या संसाराच्या चकमकींत लढलें पाहिजे असें कोणीं सांगितलें आहे ? तुला जंबियानें लढतां येत नाहीं तर तरवार घे; तरवारीनें येईना, तर भाला घे; भाल्यानें येईना तर बंदूक घे; पण निराश होऊन रणांगण टाकून जाऊं नकोस. पळून जाणें म्हणजे केवळ भित्रेपणा आहे. हातचें हत्यार मोडलें किंवा गळलें म्हणून दुसरें न घेतां रणांगणांतून पळून जाणें शूराचें काम नव्हे.

युनिव्हर्सिटीच्या परीक्षांस आपल्या जिवापेक्षांही महत्त्व द्यावयाचें हा वेडा विचार कुठला ? मला वाटतें या मनुष्यजन्मांत येऊन मुख्यतः आपल्या हातून काय झालें पाहिजे या प्रश्नाच्या उत्तरासंबंधानें पुरी कल्पना तुम्हां वेड्यांना नाहीं. म्हणूनच अशा तऱ्हेनें जिवावर

उद्गार होण्याचें, पळून जाण्याचें किंवा अशाच प्रकारानें पूर्ण निराश होऊन तसलेंच दुसरें कांहीं करण्याचे अगर स्वस्थ हात जोडून बसण्याचे विचार तुमच्या डोक्यांत घोळूं लागतात. ज्याला आपला शेवटला साध्य हेतु काय हें समजत नाहीं त्याचे हे विचार. तुला हे हेतु समजत असतील, असा माझा आजपर्यंत समज होता. परंतु तो समज केवळ वृथा असावा असें मला त्या दिवशींच्या तुझ्या व तुझ्या स्नेह्याच्या विलक्षण उद्गारांनींच वाटविलें आहे.

दुसऱ्याचें नुकसान न होतां स्वार्थ साधून आपल्या जगण्यानें जगाला किंवा आपल्या सभोंवतालच्या लोकांना कांहीं ना कांहीं तरी जो सुख देईल त्यानें जन्माचें सार्थक केलें. नुसत्या युनिव्हर्सिटीच्या परीक्षा दिल्या आणि त्याच्या त्या विद्वत्तेपासून त्याला स्वतःला किंवा त्याच्या संबंधी-जनांला किंवा सभोंवतालच्या लोकांना जर कांहींच फायदा झाला नाहीं तर त्याचा उपयोग काय ? सरळपणानें राहणें; दुसऱ्याच्या उपयोगी पडणें; कोणाशीं द्वेष न करणें; उणें उत्तर बोलून कोणाचें मन न दुखविणें; कोठेंही गेलास तरी कोणाच्या डोळ्यांत न खुपणें; कोठेंही गेलें तरी कोणी ‘ या ’ असें ह्मणेल असेंच वर्तन ठेवणें; इत्यादि गोष्टी जोंपर्यंत तूं आपल्या अंगीं राहूं देशील, तोंपर्यंत तूं एकदाच काय, परंतु अनेकदा जरी परीक्षेंत नापास झालास, तरी त्याबद्दल मला खरें ह्मणशील तर, काडीमात्र सुद्धा दुःख होणार नाहीं. तुझ्या परीक्षा होऊन तूं विद्वान् व्हावेस, तुझ्या विद्वत्तेबद्दल तुझी लोकांत चहा व्हावी आणि या जगांत कीर्तीसाठीं काय, पोटासाठीं काय, किंवा निरपेक्षपणें परहितासाठीं काय, जी झटपट चालली आहे, त्या झटपटींत तुला चांगलें यश येण्यास परीक्षा हें एक चांगलें साधन आहे तें तुझ्या स्वाधीन व्हावें, असें मला वाटतें हें स्वाभाविकच आहे. परंतु तसें वाटतें याचा अर्थ ‘ परीक्षा ’ म्हणजे मी मनुष्यजीवितांचें सर्वस्व समजतों, असें नव्हे. जीवितांचें सर्वस्व ‘ सरळपणा ’ व ‘ परहितबुद्धि ’ या दोन गोष्टी होत.

या दोन गोष्टी नाहींत, आणि सतरा परीक्षा झाल्या तरी मला एक लव-मात्र आनंद होणार नाहीं. उलट अत्यंत खेद होईल. इतकेंच नव्हे, तर तूं जन्मला नसतास तर बरें झालें असतें असें मला वाटेल. मात्र जोंपर्यंत 'सरलता' व 'सत्कार्यबुद्धि' हे दोन गुण तुझ्या अंगीं आहेत तोंपर्यंत इतर सर्व व्यवसायांत जरी तुला अप्रसिद्धि आली तरी मी डगमगणार नाहीं. कारण बाबारे ! "जय हा अनेक अपजयांच्या सांखळीचा शेवटला दुवा आहे." प्रत्येक गोष्टीला हात घातल्याबरोबर जय मिळविणारे थोडेच असतात. म्हणून काय तुझ्या मतें साऱ्या अप-जय पावलेल्यांनीं पळून जावें किंवा आपल्या जिवाचा शेवट करावा ? याचसंबंधानें मला तुला किती तरी ल्याहावयाचें आहे. परंतु लिहिलें एवढेंच फार झालें आहे. शिवाय तुझी परीक्षेची गर्दी आहे. अधिक वाचण्यासही फुरसत नाहीं. आज लिहिलें आहे एवढें मन लावून वाच आणि वेडा विचार कांहींही करूं नको, एवढें तुला पुनः सांगून व तुला यंदा परीक्षेंत यश येवो असा आशीर्वाद देऊन हें पत्र मी पुरें करतों.

# ९. आमुची मायबोली

मराठी असे आमुची मायबोली, जरी आज ती राजभाषा नसे
नसो आज ऐश्वर्य या माउलीला, यशाची पुढें दिव्य आशा असे
जरी पंचखण्डांतही मान्यता घे स्वसत्ताबळें श्रीमती इंग्रजी
भिकारीण आई जहाली तरी ही कुशीचा तिच्या तीस केवीं त्यजी १

जरी मान्यता आज हिंदीस देई उदेलें नवें राष्ट्र हें हिंदवी
दिलाचे मराठे मराठीस ध्याती हिची जाणुनी योग्यता थोरवी
असूं दूर पेशावरीं उत्तरीं वा असूं दाक्षिणीं दूर तंजावरीं
मराठी असे आमुची मायबोली, अहो ज्ञानदेवीच देखा खरी २

मराठी असे आमुची मायबोली जरी भिन्नधर्मानुयायी असूं
पुरी बाणली बंधुता अंतरंगीं, हिच्या एक ताटांत आम्ही बसूं
हिचे पुत्र आम्ही हिचे पांग फेडूं, वसे आमुच्या मात्र हृन्मंदिरीं
जगन्मान्यता हीस अर्पूं प्रतापें, हिला बैसवूं वैभवाच्या शिरीं ३

हिच्या लक्तरांची असे लाज आम्हां, नका फक्त पाहूं हिच्या लक्तरां
हिचें रूप, लावण्य चापल्य देखा, जयांचा रसज्ञांमधें अस्करा
न घालूं जरी वाङ्मयांतील उंची हिरेमोतियांचे हिला दागिने
मराठी असे आमुची मायबोली, बढाई वृथा ही सुकार्याविणें ४

करंटी दरिद्री नसे जन्मतां ही, बुडेनाच सर्वस्व कालोदरीं
नव्या विक्रमें मन्थिता सिंधु येई नवी सम्पदा धौत लक्ष्मीपरी
कशाला हवें कर्ज ? देतील भाषा जगाच्या हिला वाढती खंडणी
मराठी असे आपुली मायबोली, झिजूं नित्य आम्ही हिच्या कारणीं ५

---

१ प्रसिद्धी.

# १०. चोरावर मोर

माझा जन्म पुण्याजवळील एका खेडयांतील लहानशा झोंपडींत झाला. गांवाबाहेर निरनिराळे फुटणारे रस्ते दाखविण्याकरितां जी पाटी लाविली आहे, तिच्या जवळील तिवाठ्यावरच हें झोपडें उभें आहे. आम्ही दोन गांवांच्या अगदीं शिवेवर रहात असल्यामुळें आम्ही कोणच्याच गांवांत कसल्याही वर्गण्या देत नव्हतों, तरी पंचाइतींच्या वेळीं माझे बाबा दोन्ही गांवांत आपला हक्क बजावण्याचें कधींही सोडीत नसत. ह्यावरूनच माझे बाबांच्या कुशाग्रबुद्धीबद्दल वाचकांची खात्री होईल व पुढील हकीकत वाचल्यावर आपलें मत फिरविण्याचें त्यांस कारण पडणार नाहीं.

आमच्या गांवांत कोणी इनामदार किंवा जहागीरदार मुळींच नव्हते, परंतु तिमाजीराव नांवाचे एक चिक्कू व साठीचे घराला आलेले सावकार हेच तेथील मोठें धेंड. ह्यांच्या दोघां चिरंजिवांचीं नांवें अनुक्रमें उमाजी व खंडूजी असून, बाप मेल्यावर त्याची इस्टेट कोणीं घ्यावी ह्याबद्दल त्यांच्या नेहमीं खडाजंग्या होत. वडील बंधु उमाजीनें खंडूचें नुकसान करण्याचा प्रयत्न करावा आणि खंडोबानें कांहींतरी करून उम्याचें उसनें तावडतोब फेडून टाकावें, असा क्रम चालतां चालतां उमाजी ह्या भांडणाला अगदीं कंटाळला व एक दिवस बापाला विचारून निघाला आणि पुण्यास येऊन त्यानें पलटणींत आपलें नांव दाखल केलें.

लवकरच सरहद्दीवरील मोहिमेस जें लष्कर पाठविलें त्याबरोबर त्यालाही रावळपिंडीकडे जावें लागलें; व तें ऐकिल्यापासून त्या म्हाताऱ्यानें जें अंथरूण धरलें तें धरलेंच.

तरी तो कांहीं एकाएकींच मेला असें नाहीं. खंडूजीनें रोज त्याला आपल्या कुटुंबाच्या दुर्लौकिक करणाऱ्या उमाजीवर सूड घेऊन त्याची मालकी काढण्यास सांगावें, पण तिमाजीनें त्याचें कधींही ऐकिलें नाहीं.

'जें असेल तें मी सारखें वांटून देईन,' हाच मंत्र त्या म्हाताऱ्यानें ठेविला होता.

हे तंटे साऱ्या गांवाला माहीत होते. रात्रीच्या वेळेला तिमाजीच्या घरावरून गेलें म्हणजे म्हाताऱ्याचा पिंजक्या बोरूप्रमाणें चिरलेला व खंडूजीचा कर्कश रागीट आवाज चांगला ऐकूं येत असे. सरते शेवटीं एका रविवारीं रात्रीं अकरा वाजण्याचे सुमारास त्या घरांत एकाएकीं सामसूम झाली. म्हातारा गडबडला तर नाहींना हा प्रश्न प्रत्येकाच्या मुद्रेवर दिसूं लागला.

ह्याच सुमारास आमच्या झोंपडीच्या दारावर कोणी ठोठावल्याचा मला भास झाला. आम्ही एकटयानीं पडवींतच पथारी ताणून दिली होती, म्हणून मला तें प्रथम ऐकूं आलें. परंतु आमची स्वारी विशेष धैर्यवान् असल्यामुळें मुकाटयानें तोंडावर पांघरूण घेऊन मी मोठमोठ्यानें घोरूं लागलों.

पुनः एकदा दार ठोठावून कोणीशी गुंडोपंत म्हणून हलकेच हांक मारली. तो खंडूजीचाच आवाज असें मीं पक्कें ओळखलें. इतक्यांत आमच्या बाबांनीं दरवाजा उघडला व विचारलें, " खंडू, काय खबर, म्हाताऱ्याचें कांहीं जास्त तर नाहींना ? "

" छे ! " खंडू म्हणाला, " आतां जास्त होण्याची भीतीच नाहीं. कारण तो मेल्याला चांगला अर्धा तास झाला. "

" सोनें झालें बिचाऱ्याचें ! किती, अर्धा तास झाला म्हणतोस ? "

" होय, अर्धा तास, " खंडू म्हणाला, " पण म्हातारा असला खमंग कीं मरतांना मृत्युपत्र सुद्धा केलें नाहीं ! "

आमचे बाबा म्हणाले, " अरेरे ! वाईट झालें. " लोकांना कसें खुलवावें ही विद्या आमच्या बाबांना चांगलीच अवगत होती.

" वाईट तर खरेंच, पण ह्याला कांहीं तरी उपाय काढला पाहिजे. हें पहा गुंडोपंत, हें आतां तुमच्या मदतीवांचन होणार नाहीं. मी

सांगेन तें करण्यास तुम्हीं कबूल असाल तर हे पन्नास रुपये तुमचे. तुम्ही आणि तिमाजीराव हे एकाच वयाचे असून तुमच्या चेहऱ्यांतही बरेंच साम्य होतें नाहीं बरें ? ”

खंडूजीच्या बेताची त्यांना थोडीशी कल्पना होऊन आमचे बाबा भीत भीत म्हणाले, “ बरें पुढें ? ”

थोडक्यांत सांगायाचें म्हणचे माझ्याबरोबर घरीं चला आणि बाबांच्या बिछान्यावर निजून रहा. ”

“ काय ? प्रेताशेजारीं ! ”

“ छे हो, तुम्हीं एकटेच. तुम्हीं बाबांचें सोंग घेऊन मृत्युपत्र करावयाचें. मी सर्वांना बोलावणें पाठवितों व तुम्ही काका कुळकर्ण्याला लिहिण्यास सांगून सर्व मळे माझ्या नांवानें करून द्या म्हणजे झालें. समजलें ? तुम्हांला पाहून किंवा तुमचा आवाज ऐकून कोणालाही शंका येणार नाहीं. ”

“ पण खोलींत अंधार पाहिजे. ”

“ अर्थात्, पण तुम्हीं कांहीं भिऊं नका. बिछान्याजवळ कोणास येऊं देणार नाहीं म्हणजे झालें. हं चला आटपा. आतां वेळ नाहीं. उजाडण्यापूर्वीं सगळें संपलें पाहिजे. ”

बाबांनींही कांहीं वेळ लाविला नाहीं. उपरणें खांद्यावर टाकून बाबा खंडूजीच्या पाठोपाठ निघाले व त्यांची चाहूल पडतांच मी सुद्धां लगबगीनें उठलों व तसाच त्यांच्या पाठोपाठ कशी गम्मत उडते ती बघण्यास निघालों. मी जाऊन पोंचतों तो प्रयोगाला प्रारंभ झाला होता.

आतां ह्या घटकेला तो सगळा देखावा माझ्यापुढें दिसतो आहे. तो मी कधींही विसरणार नाहीं. मी गेलों तों एका फुटक्या तावदानाच्या खिडकींत बसलों. तेथून मी कोणाला न दिसतां मला सर्व दिसत होतें.

एका मोठ्या खोलींत कोपऱ्यांत एक बिछाना ठेवला होता. शेजारींच

एका कमानींत कांहीं कुप्या, सहाण, वाटी, मात्रांचा बटवा वगैरे जिनसा पडल्या होत्या. थोड्या अंतरावर एका तक्क्याजवळ काका कुळकर्णी मांडीवर कागद व हातांत लेखणी घेऊन मोठ्या थाटांत बसले होते, आणि तेथून सुमारें पांच सात हातांवर सर्व लोक, दोन दोन तीन तीन असा घोळका करून, काय होतें तें मोठ्या आतुरतेनें बघत होते, आणि खंडूजी अगदीं रडवें तोंड करून त्या बिछान्या-जवळच बसला होता.

जरी तें सर्व कपट मला माहीत होतें तरी सुद्धां तो देखावा पाहून मला कसेसेंच झालें. तो खोलींतला काळोख, ती भयप्रद शांतता, खंडूजींचे लहान लहान हुंदके व काका कुळकर्ण्यांनीं चालविलेली तिमाजींची प्रशंसा, ह्या सर्व गोष्टी इतक्या खऱ्या भासत होत्या कीं, मी बहुतेक भीतीनें घाबरून गेलों.

इतक्यांत कोपऱ्यांतून खोकण्याचा आवाज ऐकूं आला आणि आंत ओढलेल्या अशा आवाजानें बाबा म्हणाले, "खंडू, काका आला कारे, मला एकदा मृत्युपत्र करूं दे. अरे तो. दिवा लाव बघूं, वात फार मोठी सारूं नको हो."

"होय बाबा," खंडू समई लावीत असतांना म्हणाला.

"खंडू," बाबा म्हणाले, "तो काकाच्या जवळच ठेव. मज-जवळ नको."

खंडूनें तसें केल्यावर आमचे बाबा पुन: म्हणाले, "काका, मी काय सांगतों तें झटकन् लिहून घे. मी कांहीं आतां फार वेळ जगत नाहीं."

"होय तिमाजीराव," काका म्हणाले.

तेव्हां बाबांनीं बोलण्यास आरंभ केला, "माझें ह्या गांवांत कोणाशींही भांडण नाहीं. सर्व मिळकत माझी स्वत:ची आहे. माझे मारुतीच्या देवळाजवळचे दोन मळे व त्या शेजारींच विहिरीभोंवता-लचीं आंब्यांचीं झाडेंसुद्धां मी खंडूजीच्या नांवानें करून देतों. खरोखर,

खंडूसारखा मुलगा मिळणार नाहीं; माझ्या दुखण्यांत माझी चाकरी त्यानें फार चांगली केली.

" त्याप्रमाणें डोंगराजवळची दीड बिघा जमीन व शेजारचा माळही त्यानेंच घ्यावा. तो त्याचा चांगला उपयोग करील. पण इकडे माझ्या तोंडाला कोरड पडली; थोडें औषध द्या बरें. "

म्हातान्यानें औषधाचा एक भाग घेतल्यावर त्याला जरा बरें वाटलेंसें दिसलें. " काका, आपण कोठवर आलों होतों हो ? हं आठवलें, तो शेजारचा माळ नाहीं का ? होय तो खंडूजीनें घ्यावा. त्याचप्रमाणें नानाजीच्या विहिरीपासचें बटाट्याचें शेतही त्यालाच देतों. त्या शेताला दुष्काळ कसा तो ठाऊक नाहीं. "

बाबांच्या बोलण्याची खंडूजीला भीति वाटून तो म्हणाला, " बाबा, तुम्हांला थकवा आला आहे नाहीं का ? " बाटलींतलें मुद्दाम तयार केलेलें सरबत प्याल्यामुळें खरोखरच त्यांचें तोंड जरा जास्त सुटलें होतें.

" खरेंच खंडू, मी बराच थकलों आहें. मला पुन्हा एकदां तें औषध दे बघूं. मला वाटतें तूं त्यांत पाणी जास्त घातलेंस. "

" नाहीं बाबा; तुमच्या तोंडाची चवच नाहींशी झाली आहे. "

" बरें असो. माझेंही सांगणें आटपलें आहे. आतां फक्त बजाबांच्या शेताजवळचीच एक जमीन राहिली आहे, आणि खंडू, ती मी तुझ्या-वरच सोंपवितों. तूं आतां जसा चांगला आहेस, तसाच पुढें रहा आणि माझे हे शेवटचे शब्द विसरूं नको. ऐकतोसना, काका, तूं लिहितो आहेसना ? "

" होय, तिमाजीराव, " सर्वजण म्हणाले.

" बरें आहे तर, थोडें पाणी द्या बरें. हे माझे शेवटचे शब्द आहेत आणि बाकीच्या कलमांप्रमाणेंच हें शेवटचें कलम तितक्याच महत्त्वाचें आहे. तिवाठ्याजवळची जी माझी तीन बिघ्यांची वाडी आहे ती मी त्या बिचाऱ्या गुंडोपंत बुणग्याला देतों. त्याची स्थिति फार वाईट आहे,

तरीहि त्याच्यासारखा प्रामाणिक मनुष्य मला कोणी भेटला नाहीं. खंडू त्याला कधींहि विसरूं नको. त्याला कधीं जरूर पडली तर ह्या माझ्या शेवटच्या शब्दांची आठवण ठेव. काका, मीं सांगितलेलें सर्व लिहिलेंना ? तिवाठ्याजवळची जमीन गुंडोपंत बुणगे व त्यांचे वंशज यांजकडे अबाधित चालावी. बरें असो, आतां मी सुखानें मरेन. मी सर्वांची कायमची रजा घेतों. म्हाताऱ्या तिमाजीची आठवण... ”

तो आणखी काय काय म्हणाला असता कोण जाणें ! त्या आजारी मनुष्याच्या तोंडावर जो भयप्रद उल्हास दिसूं लागला होता त्यानें खंडूजी फार घाबरून गेला व मरतांना गोंगाट होऊं नये म्हणून त्यानें सर्व लोक खोलीबाहेर काढले.

सर्व लोक निघून गेल्यावर खंडूजी बाबांकडे येऊन म्हणाला, “ गुंडोपंत, प्रयोग फार छान वठला. तुम्हीं आपलें काम फार सफाईनें केलें; परंतु तिवाठ्यावरच्या वाडीची थट्टाच ना ? ”

“ थट्टाच तर काय ! सगळी थट्टा. उद्यां शेजाऱ्यापाजाऱ्यांना ही सर्व मजा सांगितल्यावर काय गांवांत हंशा उडून राहील. ”

“ काय ” खंडूजी भिऊन म्हणाला, “ काय, तुम्ही माझें गुपित बाहेर फोडणार ? ”

“ आणि तूं तरी आपल्या बापाच्या शेवटच्या इच्छेच्याविरुद्ध जाणार ? आणि त्यानें इतक्या काकुळतीनें बजावल्यावर ! ” बाबा संतापून जोरानें म्हणाले.

“ नाहीं, नाहीं. ” खंडूजी मऊ येऊन म्हणाला, “ नाहीं, सवदा तो सवदा. पण तुम्ही मोठे खमंग आहां येवढें खरें ! ”

येणेंप्रमाणें बाबांचें काम आटोपल्यावर वाडी मिळाल्याच्या आनंदांत ते पहाटेच्या धुक्यांतून कोणाला न दिसतां घरीं पोंहोंचले.

आम्हीं ती तीन बिघ्यांची वाडी कशी मिळविली त्याची ही हकीकत.

ही वाडी ‘ गुंडोपंत बुणग्यांची वाडी ’ म्हणून अजून प्रसिद्ध आहे.

# ११. माझ्या जन्मभूमीचें नांव

सृष्टी तुला वाहुनी धन्य ! माते, अशी रूपसंपन्न तूं निस्तुला
तूं कामधेनू ! खरी कल्पवल्ली ! सदा लोभला लोक सारा तुला
या वैभवाला तुझ्या पाहुनीयां मला स्फूर्ति नृत्यार्थ होते जरी
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी, तसें पाहिलें मी न कोठें तरी ! १

माते ! महात्मे तुझे, तत्त्ववेत्ते, तुझे शूर योद्धे, तुझे सत्कवी,
श्रेणी ययांची सदा माझिया गे मना पूजनीं आपुल्या वांकवी !
यांचीं यशें ज्या नव्या सद्गुणांना मला अर्पिती, ध्येय ते गे जरी,
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी, तसें पाहिलें मी न कोठें तरी २

तूझ्या महोदार सारस्वताच्या महासागरींचा जरी मीन मी
झालों, तरी गे तृषा मन्मनाची कधींही कधींही न होणें कमी !
आई ! गुरुस्थान अंतीं जगाचें तुझें यांत शंका न कांहीं जरी
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी, तसें पाहिलें मी न कोठें तरी ३

वारा तुझ्या स्पर्शनें शुद्ध झाला मला लाधला भाग्य हें केवढें !
माते ! स्वयें देशि जें अन्नपाणी सुधा बापुडी कायशी त्यापुढें !
तूं बाळगीशी मला स्कंधिं अंकीं सुखाची खरी हीच सीमा पुरी !
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी, तसें पाहिलें मी न कोठें तरी ! ४

सामर्थ्य नामीं तुझ्या हें मला जें दिसे प्रेमयोगें अगे हिंद्‌भू,
तें पूर्णतेला झणीं प्राप्त व्हावें म्हणोनी करी योजना ही प्रभू;
रोंवी तुला आंग्लभूपालकाच्या किरीटामध्यें कीं तुझी उन्नति
व्हावी खरी तूं जगत्कारणाची पुरी ओळखी प्रेमयुक्ता मति. ५

# १२. ऐतिहासिक पोवाडे

" आपुली आपण करी स्तुति, तो एक मूर्ख " असें एक मूर्खलक्षण रामदासांनीं लिहून ठेविलें आहे. पण हें लक्षण 'स्वतःची' स्तुति करणाऱ्या व्यक्तीला लागतें; स्वतःच्या 'राष्ट्राची' किंवा 'समाजाची' स्तुति करणाऱ्या व्यक्तीला लागत नाहीं. फार काय, पण खुद्द रामदासांच्या पुढें हा प्रश्न असता, तर त्यांनींहि असें लिहून ठेविलें असतें कीं, "आपल्या राष्ट्राची न करी स्तुति, तो एक शतमूर्ख." स्वतःच्या स्तुतीबरोबर 'वडिलांची कीर्ति' सांगणें हीहि एक निषिद्ध गोष्ट म्हणून रामदासांनीं सांगितली आहे खरी. पण तिचा अर्थ मात्र उघड दिसतो तसा नाहीं. वडिलांची स्तुति करणें किंवा कीर्ति गाणें यांतहि दोन प्रकार असतात. एक प्रकार म्हटला म्हणजे नादान बढाईखोरपणाचा; ज्याला निव्वळ वडिलांच्या कीर्तीच्या भांडवलावरच सर्व व्यापार भागविण्याचा प्रसंग असतो असला मनुष्य वेळीं अवेळीं वाडवडिलांच्या नांवाशिवाय बोलावयाचाच नाहीं. त्याला कांहींही विचारा किंवा तो तुम्हांस कांहींहि सांगो, त्यांत त्याच्या बापदादाची साक्ष किंवा जामीनकी असावयाचीच. त्यांच्या आयत्या पिठावर याच्या रेघा; त्यांच्या कर्तबगारीवर हा आपल्या मिशीला पीळ भरणार ! आणि निव्वळ खानदानी, कीर्तिमान् पूर्वजांच्या पोटीं जन्मास येणें—हीच काय ती याची अवघी लायकी. हेंच याचें सारें शील. समर्थांच्या उक्तीचा कटाक्ष असल्या बढाईखोर स्तुतिपाठकावरच आहे. पण मूर्खपणा पदरीं बांधून न घेतांहि 'वाडिलांची कीर्ति' गातां येणें शक्य असतें. या दुसऱ्या प्रकारच्या स्तुतिपाठकांना आपल्या पूर्वजांच्या लायकीचा अभिमान असतो; पण त्याबरोबर त्यांना स्वतःच्या नालायकीची जाणीव असून, परमेश्वरा, तशी लायकी आपल्याहि अंगीं येईल काय अशी आर्त व कळकळीची प्रार्थना त्यांच्या अंतःकरणांतून निघत असते. प्रत्येक मूर्तिपूजकाला आपली देवाची मूर्ति उज्ज्वल असावी अशी इच्छा असते; व यामुळें

तो ती मूर्ति शक्य तितक्या मौल्यवान् पदार्थांनीं शृंगारतो; पण "माझ्या देवाच्या अंगावर मीं हजारों रुपयांचें जवाहीर घातलें आहे, हज़ारों रुपयांच्या किंमतीची रामाची मूर्ति आज माझ्या मिळकतीच्या यादींत आहे," असें म्हणणाऱ्या उपासकाची जी भक्ति ती भक्ति कसली? तेंच "हजारों रुपयांच्या जवाहिराचें तेज एकवटलें तरी, परमेश्वरा, तुझ्या तेजाच्या एका किरणांशाइतकी तरी शोभा याला येणार आहे काय? पण हा त्या तेजाची कल्पना मनांत आणण्याचा केवळ एक अल्प मानवी प्रयत्न आहे" असें म्हणणाऱ्या सगुण रूपाच्या उपासकाची भक्ति ही मात्र भक्ति खरी. या दोघांच्याहि मूर्तीवर जवाहीर आहे खरें; पण एकाची दृष्टि आपल्या बडेजावीची, दुसऱ्याची दृष्टि पूज्याची पूजा करण्याची. हेंच त्यांतलें अंतर.

आपल्या पूर्वजांचे पोवाडे गाण्यांतहि, इष्ट व निषिद्ध, असे हे दोन प्रकार आहेत. महाराष्ट्राच्या हल्लींच्या स्थितींत दोन्ही प्रकार संभवतात. मोडकळीस आलेल्या खानदानीच्या घराण्यांतील विद्यमान वंशजांच्या तोंडीं निषिद्ध प्रकारचे म्हणजे केवळ शाब्दिक बढाईचे पूर्वजांचे कीर्तिपाठ आढळून येतात. पण उच्च शिक्षणानें, प्रेमळ भावनेनें आणि प्रेरणेनें, जेथें जेथें महाराष्ट्राच्या जुन्या पिढीची कीर्ति गाइलेली आढळते, तेथें तेथें मात्र ती इष्टच होय यांत शंका नाहीं. मोठ्या राष्ट्रीय दृष्टीनें पाहिलें म्हणजे मग गोत्र, कुळ, जात, हे सारे क्षुद्र भेद लय पावतात; व जेथें ब्राह्मणाचा अभिमान मराठा धरितो व मराठ्याचे गुण ब्राह्मण घेतो, तेथें राष्ट्रीय भावना खरीच उदित झाली असें समजून चालण्यास हरकत नाहीं.

कोणत्याहि देशांतील पोवाड्यांत महानुभाव विभूतींचीं चरित्रें व राष्ट्रीय अभिमान जागृत करणारे उदात्त प्रसंग यांचेंच वर्णन असतें. वीररस हा पोवाड्यांतील मुख्य रस कोठेंहि असणारच; पण एखाद्या वीराचा पोवाडा होण्यास तो वीर यशस्वीच झालेला असला पाहिजे, असें मात्र नाहीं. पानपतास भाऊसाहेब पडले व मराठे लढाई हरले;

उलटपक्षीं उद्गीरची लढाई भाऊसाहेबांनीं जिंकली व त्यांनीं दिल्लीचें तख्त फोडलें; असे तीन प्रसंग असतां पानपतच्या लढाईचा पोवाडा झाला व उद्गीरच्या लढाईचा झाला नाहीं–निदान झाला असला तरी पानपतच्या पोवाड्याइतका लोकप्रिय होऊन टिकला नाहीं–हें पोवाडे करणाऱ्या शाहीरांच्या आणि ते पोवाडे प्रेमानें गाणाऱ्या मराठे लोकांच्या प्रामाणिकपणाचेंच लक्षण आहे. विभूतिमत्त्व केवळ अंगीकृत कार्याच्या यशःसिद्धीवरच अवलंबून नसतें. निदान हें तरी खरें कीं, चारित्र्याची यशःसिद्धि हीच खरी सिद्धि. केवळ कार्याची सिद्धि ही खरी सिद्धि नव्हे. भारत व रामायण यांतील नायकांचा विजय झाला आहे पण ग्रीक आद्य कवि होमर याच्या 'ईलियड' नामक महाकाव्यांतील खरा नायक हेक्टर हाच असून तो युद्धांत पडला व मारला गेला; किंबहुना, त्याच्या प्रेतास शत्रूनें आपल्या रथाला बांधून फरफटत फिरविलें व त्याची दुर्दशा केली. तथापि, 'ईलियड' ला 'हेक्टरचा पोवाडा' म्हटलें तरी त्यांत फारशी चूक होणार नाहीं.

पोवाड्यांसंबंधानें दुसरीहि एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, त्यांतील नायक यशस्वी झालेला असलाच पाहिजे हा निर्बंध जसा नाहीं, तसेंच तो तत्कालीन सनदशीर रीतीनें भांडणाराच असला पाहिजे असेंहि नाहीं. इंग्रजी वाङ्मयांत राजे लोकांप्रमाणें राजबहिष्कृत दरोडेखोरांचेहि पोवाडे झाले आहेत, यावरून ही गोष्ट उघड सिद्ध होते. रॉबिनहुड हा इंग्रजी भाषेंतील पोवाड्यांचा एक अत्यंत लोकप्रिय नायक आहे; पण तो फांशीची शिक्षा झालेला दरोडेखोर होता! याच्या अंगीं माणुसकीचे उच्च गुण सर्व कांहीं होते. सुष्टांचा कैवारी, दुष्टांचा शत्रु, न्यायी, शूर, उदार, प्रणयी–अशा गुणांनीं युक्त असलेल्या रॉबिनहूडचें व त्याच्या वेळच्या अधिकाऱ्यांचें भांडण होतें; तो त्यांच्या हातीं लागता, तर त्यांनीं त्यास फांसावर चढविण्यास कांहीं कमी केलें नसतें; त्याच्या समकालीन पिढीला त्याची स्तुति उघडपणें करणें कठीण गेलें

असतें, व कित्येकांना तर तो कोणी मोठा मनुष्य आहे असेंहि कदा-चित् मनांतून वाटलें नसतें. पण पुढील पिढ्यांना त्याच्या चारित्र्याचें खरें मर्म कळल्यामुळें त्यांना रॉबिनच्या बेकायदेशीर वर्तनाचें कांहींच वाटलें नाहीं, व त्यांनीं त्याला उमदा नायक बनवून त्यावर पोवाडे केले. आपल्या इकडे इंग्रजी अंमलांत झालेल्या उमाजी नाईक वगैरेंचीहि तीच गोष्ट आहे. उमाजी दरोडेखोर तर खराच, व अखेर फांशींहि गेला. पण, त्याच्या दरोडेखोरींत शौर्य, धैर्य, प्रसंगावधान, औदार्य, महत्त्वा-कांक्षा, माणुसकी वगैरे अनेक उत्कृष्ट गुणांचें मिश्रण झालेलें असल्यानें, पीनल कोडाप्रमाणें शिक्षा झालेल्या या अलौकिक व्यक्तीचे पोवाडे शाहीरांनीं केले; ते गाणारे भिकारी अजूनहि या दरोडेखोराच्या नांवा-वर आपलें पोट भरतात व सरकारलाही त्या पोवाड्यांपासून दरोडे घालण्यास उत्तेजन मिळेल अशी भीति वाटत नसल्यानें, तें ते पोवाडे गाण्यास प्रतिबंध करीत नाहीं.

तात्पर्य, मनुष्याचे पोवाडे होऊन लोकांनीं ते गाण्यास, त्याच्या अंगीं कांहीं लोकोत्तर गुण असावे लागतात. मग तो शिवाजी महा-राजांसारखा अफझुलखानास मारण्याचें धाडस करणारा पूर्ण यशस्वी वीर असो, तानाजी मालुसऱ्यासारखा सिंहगड घेऊन प्राणास मुकलेला अर्धयशस्वी सरदार असो; सदाशिवरावभाऊसारखा पानिपतची लढाई हरून स्वपक्षांची कीर्ति व स्वतःचे प्राण गमावणारा सर्वस्वी अयशस्वी असा सेनानायक असो; अहिल्याबाईसारखी उदारचरित व पुण्यशील पापभीरू साध्वी असो; किंवा उमाजी नायकासारखा बेकायदा वागणारा व प्रसंगविशेषीं प्राणहानीकडे न पाहणारा मिश्रगुणविशिष्ट दरोडेखोर असो !

# १२. पानिपतचा पोवाडा

भाऊ नाना तलवार धरून । गेले गिलच्यावर चढाई करून ॥ ध्रु० ॥

सवाई बाजीराव पेशवे पुण्यवान प्रधान । नाना भाऊ गादीवर शूर जन्मले जैसे अर्जुन ॥ शहर पुणें वसविलें मोहरा पुतळ्यांला नाहीं कांहीं उणें । चमके नंगी तलवार सैन्य हें सारें लष्कर पाहून ॥ गर्व कोंदला फार जैसा लंकापती रावण । होणारासारखें अक्षर कैसें लिहिलें ब्रह्मत्यानें ॥ ( चाल ) नामांकित सरदार थोर । नामें ऐका तपशीलवार ॥ बोलावून अवघे वजीर । सजवूनियां सभा सदर ॥ मग कैसा केला विचार । पत्रें लिहिलीं एकच तार ॥ अष्टप्रधान मानकरी सार । जरीपटका ऐंशी-हजार ॥ गाईकवाड सेनापती भार । भाला ऐंशी हजार होळकर ॥ बारा हजार बाणांची कतार । चाळीस हजार भोंसले नागपुरकर ॥ वीस हजार अरब सुमार । तीस हजार हपशी बरोबर ॥ आले मल्हारराव होळकर । फौजेमध्यें कुलअकत्यार ॥ अठरापगड लोक सार । आपल्याला मिसलीवर । ( चाल ) चाळीस हजार पठाण नित्य तेथें चमकती । अर्बुज जात ही खंदी फिरे भोंवती ॥ सिंध जाट रोहिला नाहीं त्याला गणती । घोरपडे नाईक निंबाळकर नौबद वाजती ॥ घाटगे मोहिते माने पाटणकर झुकती । ढालेशीं ढाल भिडे जरीपटक्याचे हत्ती ॥ हे मानकरी भाऊचे ऐसें दुनया बोलती । एक एकाबरोबर ऐसे पतके किती ॥ चाळीस हजार सडक करनाटकची चमकती । बाराभाई जमले नाहीं त्यांची गणती ॥ सांडणी-स्वाराची डांक फिरे भोंवती ।......॥अशी जमाबंदी करून । भाऊ नाना०॥

*  *  *  *

झाकोळला सूर्य गगनींचा मग पडला अंधकार । गलिमानें पुरविली पाठ भाऊ हटेना रणशूर ॥ पानपतावर सुरू लढाई भाऊ अंबारींत,

कमान तीर । बाण बंदुकीचे फैर झडती तोफेचे गोळे पडे जसे गार ॥ गोळ्यासरसा भाऊ उडाला दारू महात चकाचूर । बापासी लेक वळखेना धरणीमाय जागा देईना क्षणभर ॥ नानासाहेबाशीं डांक आली ते गेले हामी सादर । झाले घोड्यावर स्वार बाईस कळलें धरला पदर ॥ बोले गोपिकाबाई पुण्याचें राज्य कोण करणार । भाऊसाहेब गेले आम्हीं तरी काय राहून करणार ॥ ब्राह्मणी राज्य पेशवाई बुडाली असें नाहीं होणार॥ ...... ॥ ( चाल ) पैजेचा विडा उचलला । सारी शाही पाहती नानाला ॥ ढाला पट्टा सुरई दाबला । दोन लाख घोडा बरोबरीला ॥ रणामध्यें येऊन शिरला । झाली चकमक एकच हल्ला ॥ चाळीस हजार जिरेटोपवाला । नानापाशीं कत्तल झाला ॥ होळकरानें फितवा केला । हें ठाऊक नाहीं नानाला ॥ वैऱ्यांनीं वैर साधला । मग जखमा चढल्या नानाला ॥ जसा भीष्म कर्ण युद्धाला । मुरदा माईना धरणीला ॥ अरब हपशी पत्रें रोहिला । तो घारीवाणी उडाला ॥ घोड्याहून खालीं आला । लढण्याचा हेत नाहीं पुरला ॥ नाना पडला धर मग सुटला । गिलच्यानें मार खूप केला ॥ ( चाल ) खंदकांत माईना लोक उंट घोडे सारे । गिलच्यांचा एक दस्त यश रणशूर ॥ नउलाखांतले सातशें उरले सारे । तोफा बंदुका पडल्या सुने दिसती डेरे ॥ मोहरा पुतळ्या रुपयांचे जागोजाग पडले ढिगारे । पडलेल्या फौजेचें मागें कोण कोण घेणार ॥ हत्ती उंट मोकळे घोड्यांचें खिल्लार । कोणी लूट घेईना पळतां जीव बेजार ॥ गेले दाही दिशांवर पळून । भाऊ नाना ॥ १० ॥

*   *   *   *

शके सोळाशें पांसष्ट फाल्गुन वद्य षष्ठी आदितवार । नऊ रात्र लढाई मग फिरले माघार ॥ सातशांनीं धरली वाट पुण्याची निर्माल्य

लष्कर । खेड्या-खेड्याचे पाटिल लुटती महार चांभार ॥ बेदड घालिती छापे वाट चालेना तिळभर । पुढें बिकट बारी कैसा तारील परमेश्वर ॥ असे सांडाव देत आले अटक उतरून नऊ कोशांवर ॥ ( चाल ) तिथून अवघे फुटले पुण्याचे रस्ते भुलले । फार दिसा भुलीमध्यें गुंगले ॥ नऊखंड फिरतां चकले । अन्नाविण वाळून सुकले ॥ भक्षिती झाडांचे पाले । गोसावी कितीएक झाले ॥ तुंबे हातीं घेतले । किती रामेश्वराकडे झुकले ॥ काशीचे रस्ते धरले । या रीतीनें सैन्य खपले ॥ दैवाचे पुण्याशीं आले । लाखोटे सदरेवर पडले ॥ दुःखाचे सागर फुटले । ........ ॥ ( चाल ) लाखोटे वाचितां झाले अवघे घाबर । नानाभाऊ बुडाले पुण्यास आली खबर ॥ नानाभाऊ बुडाले परंतु लौकिक दुनयावर । नवलाख बांगडी फुटली असा हाहाकार ॥ दक्षिण बुडाला सती पडल्या महामूर । श्रीमंतांच्या तक्तापाशीं भले भले मनसुबीदार ॥ स्थापिले गादी-वर माधवराव नेणार । सोन्याची जळली भट्टी उरलें खापर ॥ शाहु छत्रपतीचें देणें सांब अवतार । गातो सगनभाऊ ठिकाणा शाहुनगर ॥ गातो फत्तेजंग पोवाडा करून । भाऊ नाना० ॥

## १४. यापुढें

कोठचा शिवाजी राजा
निजधर्माचा अभिमानी—यापुढें
कोण देशकार्यासाठीं
सोडील स्वहितीं पाणी—यापुढें
कोठची रामदासाची
बोधाची मधुरा वाणी—यापुढें
मावळे, जयांनीं दिले, आपले गळे, देशनिर्वाणीं,
नांवही न त्यांचें कानीं—यापुढें ॥ १ ॥

निपजणार कोण धनाजी
तारण्या मराठेशाही—यापुढें
रडवील कोण रणरंगीं,
शत्रूला धायी धायी—यापुढें
भासून रूप कोणाचें—
दचकतील ठायीं ठायीं—यापुढें
राखिलें, राज्य आपलें, असें व्यापिलें जया राहूं दे ।
कोण असा प्रसवे आई—यापुढें ॥ २ ॥

फांकडा शिपाई बाजी
दाबील निजामा कोण—यापुढें
वारील छत्रसालाचें
सांकडें वीरवर कोण—यापुढें
घालील महाराष्ट्राला
निरभिलाष आळा कोण—यापुढें

जें शिवें, स्थापिलें नवें, राज्य त्या जवें वाढवी बाजी
सर करील त्यांची कोण—यापुढें ॥ ३ ॥

अटकेवर झेंडे न्याया
आणितां कुठून भरारी—यापुढें
थिजलीच, न चालेल पुन्हां
भाऊंची शौर्यभरारी—यापुढें
फडनवीस नाना गेले
त्यांची न दिसेल हुशारी—यापुढें
जी खनी, प्रसवली मणी, यापरी जनीं, बहुगुणी भारी
झाली ती हाय भिकारी—यापुढें ॥ ४ ॥

ऐश्वर्य लयाला गेलें
जडलें दारिद्र्य कपाळीं—यापुढें
हास्याचे दिन मावळले
आंसवें लोचनीं आलीं—यापुढें
मित्र सर्व वैरी झाले
संकटीं न उरला कोणी—यापुढें
यापरी, नाडलों तरी, लोचनांतरीं, वीज जी भरली,
ती निघेल कवण्या काळीं—यापुढें ॥ ५ ॥

# १५. गोपाळ गणेश आगरकर

" जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति ।
देह ' झिजवीती ' उपकारें ॥"

सातारा जिल्ह्यांत कऱ्हाडापासून दोन मैलांवर टेंभू नांवाचें लहानसें खेडें आहे. तेथें सन १८५६ सालीं—म्हणजे उत्तर हिंदुस्थानांत पेटलेल्या भडक्याची तयारी होत होती त्या सालीं—गोपाळरावजींचें जन्म झालें. यांचे वडील गणेश विष्णु आगरकर हे प्रकृतीनें दमेकरी व स्थितीनें अगदीं गरीब असल्यामुळें त्यांचे हातून गोपाळरावजींचें शिक्षण व संवर्धन नीटपणें होणें अशक्य होतें, व त्यामुळें अगदीं लहानपणींच गोपाळरावजींस आईबापांचें आश्रयछत्र व आपलें आवडतें जन्मघर सोडून कऱ्हाडास त्यांचे मामा रामचंद्र विष्णु भागवत यांचे आश्रयास जाऊन रहावें लागलें.

बाळपणाच्या हूडपणांत व व्रात्य लीलांत दिवस मजेनें घालवीत गोपाळरावजी वयाचे बाराव्या वर्षापर्यंत कऱ्हाडासच होते. त्या वेळचा कृष्णेच्या वाळवंटांत घातलेला हुतुतु, कृष्णा—कोयनेच्या प्रीतिसंगमानें फुलून गेलेल्या अफाट पात्रांत डुंबणें व पोहणें, संवगड्यांबरोबर खेळलेले दांडगे खेळ, वगैरे गतगोष्टींची आठवण झाली म्हणजे त्या वेळच्या स्थितीचा विद्यमान स्थितीशीं असणारा ठळक विरोध लक्षांत येऊन गोपाळरावजींना सकौतुक खेद होई; व त्यांच्या समाचारास जाणाऱ्या मंडळीसही या गोष्टी ऐकून इतक्या दांडग्या प्रकृतीचे गोपाळराव चाळिशी उलटण्यापूर्वींच इतके थकले कसे, याचें आश्चर्य वाटे. पोटाचे कितीहि हाल असले किंवा एकंदर जीवितमार्गांत कितीहि अडचणी असल्या तरी बाळपणीं त्यांचा तितका विधिनिषेध वाटत नाहीं. कऱ्हाडास गोपाळरावजींची स्थिति अशीच होती. बारा वर्षांच्या वयापर्यंत कऱ्हाडांत गोपाळरावजींचा सगळा मराठी व इंग्रजी तीन इयत्तांइतका अभ्यास झाला. या पुढच्या अभ्यासाचें साधन कऱ्हाडास नव्हतें. बरोबरीचे एक दोन संवगडी पुढील अभ्यासासाठीं

पुण्यास आले. अर्थात् गोपाळरावजींसही तसेंच करण्याची इच्छा झाली. पण ती सफल व्हावी कशी ? त्यांना पुण्यास आश्रय देणार कोण ? त्यांच्या शिकण्याकरितां पाण्यासारखा पैसा ओतावा कोणीं ? तें कांहीं शक्य नव्हतें, अभ्यास तर पुढें करावयाचा, मार्ग तर दिसत नाहीं, अशी स्थिति होऊन गेली. वय लहान तरी गोपाळरावजींना ऐट जंगी; दम मोठा; त्यांचें ओज प्रखर; तें त्यांना चैन पडूं देईना. स्वभाव धडकबाज. झाला, त्यांचा निश्चय झाला, व त्यांनीं कऱ्हाड सोडून रत्नागिरीस त्यांचे एक आप्त होते त्यांचा आसरा मिळेल या आशेनें तिकडचा रस्ता धरला ! तेथें या तेजस्वी रत्नास चांगलाच उजळा मिळाला; त्याची प्रभा विशेषच चमकण्यास आरंभ झाला. आजपर्यंत शमींतील अग्नीप्रमाणें गुप्त असलेली त्यांची अन्तर्ज्योति प्रज्वलित करणारे रत्नागिरीस पुष्कळ प्रसंग आले. रत्नागिरीस असतां गोपाळरावजी कांहीं दिवस वारावर निर्वाह करीत होते; शाळेच्या खर्चाकरितां व अभ्यासार्थ जीवधारणा होण्याकरितां त्यांना तेथें दुसऱ्याचीं धोंतरें धुवावीं लागत; पडेल तें काम—सांगतील ती चाकरी करावी लागे; व क्वचित् थोड्यांचे गोड तर बहुतेकांचे कठोर वाग्बाण गट्ट गिळून काळ काढावा लागे. “ गरिबीमुळें खरीं माणसें पुढें येतात ” असें म्हणणारे हरीचे लाल पुष्कळ असतील. आम्ही तर म्हणतों, “ क्षुच्चिंतेचा थंड गारठा थिजवी तेज हिऱ्याचें । आपत्तीच्या हिमें नांवही करपे हृज्ज्योतीचें ” ही ग्रे कवीची उक्तीच जगांत अधिक प्रत्ययास येते. गरिबीच्या असह्य गारठ्यानें गोपाळरावजींची ज्योति मालविली नाहीं, हें आम्ही आपलें व आमच्या समाजाचें भाग्य समजतों.

गोपाळरावजींनीं अशाप्रकारें कशींबशीं दोन वर्षें रत्नागिरीस काढिलीं, व तेवढ्यांत पुढच्या दोन इंग्रजी इयत्ता त्यांनीं पदरांत पाडून घेतल्या. पण कितीही दमदार गडी असला तरी परिस्थिति हट्टानें विरुद्ध झाल्यावर तिजपुढें त्याचा इलाज चालत नाहीं. गोपाळरावजींस शेवटीं रत्नागिरी सोडावी लागली व ते परत कऱ्हा-

डास गेले. ग्रहदशेनें अजून त्यांना सोडलें नव्हतें. इतरांची ग्रहदशा साडेसातच वर्षें टिकते. यांची जन्मापासून जन्मान्तरापर्यंत सारखी सुरू होती ! तरी तिच्याशीं नेटानें झुंजत हा खंबीर गडी एकोणचाळीस वर्षें तगला. कऱ्हाडास आल्यावर "आतां काय करावें" हा विचार दत्त म्हणून पुढें उभा. शिकण्यास शाळा नाहीं–साधन नाहीं. तेव्हां त्यांनीं तेथील दवाखान्यांत कांपौंडरची नोकरी धरली. समाजाच्या रोगांचें परीक्षण करून त्यांवर औषधोपचार सांगणाऱ्या या भावी सामाजिक डाक्तरास कांपौंडरीच्या चांचणींतून जावें लागलें हें एकपरी बरें झालें म्हणावयाचें. या नोकरींत असतां आंतल्याआंत धुमसत राहिलेली त्यांची ज्योति त्यांना स्वस्थ बसूं देईना. त्यांनीं ती नोकरी सोडली व मुनसिफ कोर्टांत लिहिण्याची जागा पतकरली. पण समाजनौकेचें होकायंत्र ज्याच्या हातीं यावयाचें होतें तो तसल्या खर्डेघाश्या गुलामगिरींत कोठून संतुष्ट राहणार ? गोपाळरावजींनीं त्याही जागेचा राजिनामा दिला व कऱ्हाडास रामराम ठोकला. पुण्याचा आश्रय करावा म्हणून ते तेथें गेले. तेथें त्यांचे दुसरे मामा सदाशिवराव भागवत हे खडकवासल्याच्या कामावर होते. पण लवकरच ते पुणें सोडून वऱ्हाडाकडे गेल्यामुळें त्यांच्यामागून गोपाळरावजींसही वैदर्भ देशाकडे आपलें तारूं हाकारावें लागलें. अकोल्यास त्यांनीं सहाव्या व सातव्या इयत्तेचा अभ्यास केला. सातव्या इयत्तेंत ते प्रसिद्ध विष्णु मोरेश्वर महाजनि यांच्या हाताखालीं शिकत होते. त्या वेळची एक आख्यायिका लक्षांत ठेवण्यासारखी आहे. एके दिवशीं कांहीं कारणामुळें गोपाळरावजींचा अभ्यास झाला नव्हता; तेव्हां त्यांना रागें भरण्याच्या उद्देशानें विष्णुपंत म्हणाले, "तुमच्या हातून काय अभ्यास होणार आहे; तुम्ही असेच रखडत पडणार." गोपाळरावजींस तेवढें सहन न होऊन त्या तडफेसरशीं त्यांनीं उत्तर दिलें, "काय? रखडत पडणार ! आपल्यासारखा एम्. ए. होईन तरच नांवाचा आगरकर." हें उत्तर व या उत्तराबरहुकूम झालेली कृति शाळेंतील प्रत्येक विद्यार्थी आपल्या हृद-

यावर पक्की खोदून ठेवील तर किती बरें त्याचें कल्याण होईल ? अकोल्याचे हायस्कुलांतून १८७५ सालीं प्रवेशपरीक्षा पास होऊन ते अकोला सोडून पुण्यास आले.

येथून त्यांच्या चरित्राच्या दुसऱ्या भागास आरंभ झाला म्हणावयाचा. कॉलेजांतील शिक्षण मिळविण्याची त्यांना फारशी आशा नव्हती. परंतु सुदैवानें त्या वेळीं डेक्कन कॉलेजांत उत्तम मराठी लिहिणारास स्कॉलरशिप होती ती त्यांना मिळाली, व पुढें दुसऱ्याही स्कॉलरशिपा मिळून त्यांच्या कॉलेजक्रमास बरीच मदत झाली. यावेळींही पैशाची अडचण त्यांना इतकी होती कीं, पुरते कपडे सुद्धां त्यांना घालण्यास नव्हते. कित्येक दिवस तर एकच सदरा रोज रात्रीं धुवून वाळवून सकाळीं त्यांना अंगांत घालावा लागे. एफ्. ई. ए. च्या परीक्षेच्या वेळीं परीक्षेची फी देण्यास जवळ पैसे नव्हते, तेव्हां गोपाळरावांनीं एक नाटक लिहून पैसे मिळविण्यास कंबर बांधिली, व त्याप्रमाणें रात्रीं दोन दोन वाजेपर्यंत जागून यांनीं नाटक लिहिण्याचें काम चालविलें. पुढें त्यांच्या सुदैवानें ही हकीगत केरूनानांस कळल्यामुळें व त्यांनीं त्यांना फी दिल्यामुळें नाटकाचें काम व रात्रीचें जागरण बंद पडलें. आतांपर्यंत गोपाळरावजींना फक्त गरिबी व तिच्या उपाधींचाच जाच होता. पण आतां आणखी एक व्याधि त्यांना छळूं लागली व तिनेंच शेवटीं त्यांचा बळी घेतला. बी. ए. चा अभ्यास चालला असतां त्यांचा आनुवंशिक दमा उपटला, व दर वर्षी तो अधिकाधिक जोरानें वाढीस लागला. आजपर्यंत गरिबी भोगलेली; दम्यासारख्या व्याधीनें प्रकृति गांजलेली—निदान घेरलेली; आप्तवर्गाची पुढील सुखाची आशा मुलाच्या हुशारीनें प्रदीप्त झालेली; अशा स्थितींत गोपाळरावजींनीं लक्ष्मीची संगति धरण्याचा, सरकारी नोकरीची बेडी--रुपेरी--स्वीकारण्याचा व पैशाच्या व स्वसुखाच्या दृष्टीनें केलेल्या श्रमांचें--भोगलेल्या संकटांचें--सार्थक्य करण्याचा विचार मनांत आणला असता तर त्यांस कोणी दोष दिला असता काय ? निदान ज्या

यातायातींत त्यांना आपल्या सर्व आयुष्याची कहाली करून घ्यावी लागली ती यातयात–तो दावाग्नि तरी त्यांच्या पाठचा चुकला नसता काय ? पण नाहीं. गोपाळरावजींसारख्या उदार धीरवीर आत्म्याकडून राजसेवेचें हीनवाणें काम होणें नाहीं. तशी कल्पनाही त्यांना असह्य होती. १८७८ सालीं गोपाळरावजींची बी. ए. ची परीक्षा होऊन ते फेलो झाले त्या वेळींच त्यांनीं आपल्या आईस पुढील आशयाचें पत्र लिहिलें होतें. "आपल्या मुलाच्या मोठाल्या परीक्षा होत आहेत. आतां त्याला मोठ्या पगाराची चाकरी लागेल व आपले पांग फिटतील, असे मनोरथ आई तूं करीत असशील; पण मी आतांच तुला सांगून टाकतों कीं विशेष संपत्तीची, विशेष सुखाची हाव न धरितां मी फक्त पोटापुरत्या पैशावर संतोष मानून सर्व वेळ परहितार्थ खर्च करणार."

अशा तऱ्हेचे निर्धाराचे शब्द गोपाळरावजींच्या लेखणींतून, कॉलेजांतील क्रम संपतो न संपतो तोंच उतरले होते, व पुढें तें कष्ट-धीरव्रत त्यांनीं आमरणांत पाळिलें हें सर्वांस महशूर आहेच. वरील व्रताच्या चिंतनिकेंत व निदिध्यासांत असतां टिळक व ते त्या व्रताच्या सिद्ध्यर्थ बेत करूं लागले. यांचा एम्. ए. चा व त्यांचा एल्‌एल्. बी. चा अभ्यास सुरू असतांच शास्त्रीबोवांची गांठ होऊन तिघांच्या विचारांचा एकत्र खल झाला. सरकारी नोकरी न पत्करितां देशसेवेंत आयुष्य वेंचण्याचा तिघांचा निश्चय होतांच, तो शेवटास नेण्याचा मार्ग ठरला. न्यू इंग्लिश स्कुलाचे गर्भवासाचे महिने लोटले. शाळा निघाली. गोपाळरावजींची एम्. ए. ची परीक्षा उतरली नाहीं. त्यांना एक वर्ष आणखी कॉलेजांत घालवावें लागलें. पण तें वर्ष जातांच १८८० च्या अखेरीस आगरकर आपल्या सहकाऱ्यांस येऊन मिळाले. येथें गोपाळरावजींच्या जीवितप्रवाहाची दिशा नक्की ठरली, व याच दिशेनें पुढें पंधरा वर्षें हा जंगी प्रवाह खडकांतून, कड्यांतून उड्या टाकीत, आपल्या शरिराचे हाल हाल करून घेत, पण मोठ्या जोमानें व ऐटीनें वहात राहिला. लवकरच

केसरी पत्राचें चालकत्व त्यांजकडे आलें. शाळेंत नुसते तीस रुपये घेऊन मेहनतीनें शिक्षकाचें बिकट काम करावयाचें; रोज ओरडून शेर-दीडशेर रक्त आटवावयाचें; व घरीं आल्यावर केसरीसारख्या पत्राचे रकाने, आपली जबाबदारी पूर्णपणें ओळखून, भरून काढावयाचे; याशिवाय गोपाळरावजींना दुसरा उद्योग राहिला नाहीं. याप्रमाणें स्वतःच्या पायावर उभें राहून संसाराचा गाडा हांकण्यास सुरुवात झाल्यावर जिकडे तिकडे सर्व प्रकारें शांतता भासत होती; लौकिकाकाश स्वच्छ निरभ्र होतें; परिस्थितीचें वारें संथ वाहत होतें; व आतां वादळांच्या कचाट्यांतून आपण सुटलों अशा समजाचा नुकता अंकुर फुटत होता. तोंच केसरीला एका मदोन्मत्त गजराजाच्या मदगंधाचा वास आला. त्याची गर्जना सुरू झाली. तिकडे करवीराच्या बाजूस आकाश काळेंकुट्ट झालें. वादळाची सपाटून तयारी झाली. तोंच इकडे काळमुखी विजेचा कडकडाट होऊन शास्त्रीबोवांची आहुति त्या महामायेनें घेतली. आकाशच कोसळलें; बालगोपाळांचें धैर्य कसास लागण्याचा अति दुर्धर प्रसंग गुदरला; व या तरुण नरकेसरींस डोंगरीच्या पिंजऱ्यांत पडावें लागलें. स्वभावतः मानी व आचरणतः कर्तव्यदक्ष असल्यामुळें असल्या पिंजऱ्याची आमच्या बालगोपाळांस मुळींच परवा वाटली नाहीं. मुदत संपतांच कृतसंकल्पार्थ बांधलेलें कंकण दृढतर करून हे दोघे वीर बाहेर पडले. वनराजाची गर्जना व न्यू इंग्लिश स्कूलची भरभराट विशेष जोरानें चालू झाली. १८८४ सालीं केसरीचें व त्याच वर्षाचे अखेरीस न्यू इंग्लिश स्कुलाचें स्वरूप विशेष मनोहर झालें. शाळेला नवीन अपत्य झालें. कडेवर नवीन मनोहर बाळक घेऊन उभी राहिलेली आपली कन्या पाहून सहृदय बापाच्या हृदयांत वात्सल्याला व प्रेमौघाला भरपूर भरतें आलें असेल यांत काय शंका? तसाच आपला केसरी बच्चा वाढतां वाढतां सभोंवतालच्या प्रांतांत सदर्प संचार करितांना पाहूनही त्यांना किती समाधान झालें असेल बरें? याप्रमाणें केसरीच्या व शाळेच्या संवर्धनांत रात्रंदिवस खटपट करण्यांत गोपाळरावजी एकदिलानें व निःस्पृहतेनें

झटत असतां पुनः काहूर आलें. केसरीचा व त्यांचा वियोग झाला ! आपण स्वतः वाढविलेल्या, स्वतः लालनपालन केलेल्या, स्वतः सर्व तऱ्हांनीं जोपासलेल्या बाणेदार अर्भकास दुसऱ्याच्या स्वाधीन करण्याची वेळ ज्या बापांवर आली असेल त्यांनाच त्या वेळच्या गोपाळरावजींच्या शोकाकुल स्थितीची कल्पना करितां येईल. ज्याच्याकरितां तुरुंगांत पडून १०१ दिवस डोंगरीची हवा पत्करिली त्या प्राणाहून प्रिय लाडक्याला हातचा सोडायाचा म्हणजे त्यांच्या पराकाष्ठेचें जिवावर आलें, पण परिस्थितीच्या असह्य तडाक्यामुळें त्यांस केसरीस शेवटचा नमस्कार करावा लागला.

त्यांच्या सहकारी मंडळीचे व त्यांचे विचार भिन्न, निदान ते लोकांपुढें मांडण्याचे व ते अमलांत आणण्याचे मार्ग भिन्न असल्यामुळें १८८८ सालापासून त्यांना आपल्या नांवावरच जगापुढें यावें लागलें. निंद्य, तिरस्करणीय मानलेल्या सुधारणेचे हे कट्टे भक्त. तिचा पक्ष खरा आहे व तिचाच शेवटीं विजय व्हावयाचा आहे, असें जगास—वेडावलेल्या जगास—स्पष्टपणें सांगावयाची इच्छा त्यांची. सुधारणेचा व सुधारकांचा पक्ष लोकांस वाटत असल्याप्रमाणें दुर्बळ नाहीं इतकेंच नाहीं, तर त्याचेंच सर्वत्र साम्राज्य होणार असें युक्तिवादानें सिद्ध करण्यासाठीं आगरकरांची सारी खटपट. ती खटपट सफल व्हावी म्हणून १८८८ सालीं त्यांच्या हातून सुधारकाचा अवतार झाला; व तेव्हांपासून त्यांचें खरें काम त्यांना मिळालें म्हणावयाचें. समाजाच्या प्रत्येक नाडीचें परीक्षण करणें, भ्रमिष्ट झालेल्या, गोंधळून गेलेल्या, व चंदन म्हणून सापाला पोटाशीं धरणाऱ्या समाजाला प्रसंगीं पलिस्तरें मारणें, तर कधीं मोरावळ्यांत गोड औषध देणें, जाणूनबुजून आड रस्त्यानें जाणाऱ्या जनतेस व तिच्या पुढाऱ्यांस वाटेवर आणण्याकरितां त्यांवर सणसणीत कोरडे ओढणें, सारें जग उलटलें तरी आपल्याला रास्त वाटणाऱ्या मतांच्या प्रतिपादनार्थ लेखणी सरसावून उभें ठाकणें, टांकांतून अर्थबोधक अक्षरें काढण्याचें सामर्थ्य असेल व तीं वाचण्यास एक तरी

इसम तयार असेल तोंपर्यंत तरी स्वस्थ बसण्याचें स्त्रैण कर्म सुधारकास स्पर्श करूं शकणार नाहीं, असा बाणा बाळगणें, हें त्यांचें खरें कर्तव्य, व तें चोखपणें बजावण्यास या वर्षीं मोठ्या अभिमानानें त्यांनीं सुरुवात केली. सुधारक पत्राचा जन्म झाल्यापासून गोपाळरावजींचा उघड उघड छळ होऊं लागला. "आम्ही तुम्हांस ठार करूं" अशीं पत्रें तर पाठविलीं; शिमग्यांत, ते जिवंत असतां, भर रस्त्यानें त्यांचें खोटेंच प्रेत तर मिरविलें. असला छळ, असली लोकनिंदा, असला अपमान नित्यशः होत असूनही ज्यांनीं तो धिमेपणानें सहन केला व अप्रिय पण पथ्य विचार लोकांच्या कानांवर आदळणें ज्यांनीं सोडलें नाहीं, असले थोर पुरुष ज्या देशांत निर्माण झाले व होतात तो देश खचित मेलेला नाहीं. आमच्या महाराष्ट्रांत आपल्या लेखणीच्या प्रखर विद्युच्छक्तीनें जीवचेतना ओतणारे धन्वंतरी जर आजपर्यंत कोणी झाले असतील तर ते विष्णुशास्त्री चिपळूणकर व आगरकर होत यांत संशय नाहीं.

गोपाळरावजींस महाराष्ट्राच्या पुनरुज्जीवनाचें महत्कार्य घडवून आणणाऱ्या पुरुषांत आम्ही श्रेष्ठ स्थान देतों. देशाची उन्नति सर्वांशीं तरुण मंडळीवर अवलंबून असते. त्या तरुण पिढीच्या मनाला पिळदार वळण लावणारे, तिच्या वाढत्या बुद्धीला जोम व दम देणारे किंबहुना तिच्यांत जीव घालणारे व तिची कर्तव्यदिशा तीस दाखवून देणारे आध्यात्मिक नायक, तेच देशाचे भाग्यकर्ते पुरुष होत. कापसाच्या तंतूप्रमाणें सैरावैरा हवेंत तरंगणाऱ्या नवीन विचारांच्या व्यक्ति १८८८ सालापूर्वीं तुरळक असतील. परंतु १८८८ सालानंतर नवीन मतवाल्यांची जी एक अफाट सेना निघाली; जो एक सबंध पक्ष, एक नवा तट, निर्माण झाला तो गोपाळरावजींच्या अनवरत श्रमांमुळें, यांत संशय नाहीं; व म्हणूनच आम्ही गोपाळरावजींना महाराष्ट्राच्या उद्धारकर्त्यांत श्रेष्ठ स्थान देऊन त्यांच्या नांवावांचून महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासाचें एक पृष्ठही लिहितां येणार नाहीं असें म्हणतों.

मनुष्याच्या सार्वजनिक चरित्रापेक्षां खाजगत आचरणांत त्याचें खरें स्वरूप सांपडतें असें आजपर्यंत शहाण्या लोकांनीं म्हटलें आहे. त्या दृष्टीनें पाहतां गोपाळरावजींसारखा साध्या, निर्मळ, निष्कपट हृदयाचा, सरळ, दोरीसूत, निष्कलंक आचरणाचा, खऱ्या बालबोध नीतीचा, अभंग धैर्याचा, बाणेदार ब्रीदाचा व सदय अंतःकरणाचा, जागृत कर्तव्यदक्षतेचा, जिवंत आस्थेचा, खऱ्या व जाज्वल्य देशाभिमानाचा, नम्र, विनयशील सभ्यतेचा व मितव्ययी व्यवहाराचा गृहस्थ दुसरा सांपडणें नाहीं. वरील प्रत्येक गुणाचे उदाहरणीय प्रसंग त्यांच्या चरित्रांत हवे तितके आहेत. महाराष्ट्रभाषेची सेवा त्यांचे हातून किती झाली हें महाराष्ट्रास ठाऊक आहे. आपल्या इच्छेप्रमाणें ते भाषा-सुंदरी नटवीत, सजवीत; किती भिन्न पोषाख तिला देऊन तिच्या स्वरूपानें प्रेक्षकांस कसें मोहून टाकीत; त्यांच्या हातीं मराठी भाषा कधीं सालंकार तर कधीं सहजसुंदर, कधीं तरुण युवती तर कधीं प्रौढा गृहिणी अशीं नवीं नवीं रूपें घेऊन रंगभूमीवर नाचत असे. याप्रमाणें ज्यानें आपल्या समाजाकरितां व परहिताकरितां कंकण बांधिलें; लोकहितार्थ ज्यानें दुर्धर कारागृहवास भोगण्यासही मागें घेतलें नाहीं; सर्व सुखावर पाणी सोडून निरपेक्षतेनें, होळकरांनीं देऊं केलेली पांचशें रुपयांची नोकरी ज्यानें नाकारिली; सत्यपक्षाच्या अभिमानाकरितां लोकनिंदेचें स्थान झालेल्या सुधारणेचा पक्ष चालविला; राजसेवा न करितां नव्या पिढीला तयार करण्याकरितां दम्याचा विकार असतांही थोडक्या पगारावर पंधरा वर्षें शिक्षकाचें काम केलें; रूढ पण घातक लोकाचारांवर हत्यार धरण्याचें घोर पातक केल्यामुळें ज्याला व ज्याच्या पत्नीला विनाकारण छळवाद सोसावा लागला; केवळ उदात्त विचारांचा व खऱ्या मार्गाचा जय व्हावा म्हणून ज्याला, निकट आप्तांच्या सहवासासही मुकावें लागलें; केवळ महाराष्ट्राच्या पुनरुज्जीवनार्थ, आपल्या देशाच्या उत्कर्षार्थ रात्रंदिवस ज्यानें आपल्या मांसाचे रज न् रज झिजविलें; ज्यानें असंख्य संकट-शत्रूंशीं टक्कर देऊन आपल्या जलाल मात्रांनीं रुग्ण

समाजाच्या एका अंगाला तरी ताळयावर आणिलें, अशा असामान्य सत्पुरुषाचा छळ व्हावा व त्याची किंमतही कळूं नये काय? अथवा त्याची किंमत कळण्याचे, आम्हांस त्याचें महत्त्व समजण्याचे, व त्याच्या मृत्यूनें झालेली हानि चांगली भासमान होण्याचे दिवस अजून यावयाचे आहेत असें म्हणावयाचें? असे दिवस येतील यांत शंका नाहीं. पण ते पाहण्यास गोपाळरावजी मात्र पुनः येणार नाहींत. त्यांनीं लाविलेल्या वृक्षाला व पेरलेल्या बियांना चांगलीं फळें, चांगलें पीक येईल हें खचित. पण तीं फळें चाखण्यास व तें पीक पाहण्यास त्यांना मात्र दुष्ट काळानें येथें ठेविलें नाहीं.

# १६. सिंहावलोकन

मुखा फिरवुनी जरा वळुनि पाहतां मागुती
कितीक हृदयें वदा चरकल्याविणें राहती ?
' नको वळुनि पाहणें ' म्हणुनि दृग् जरी आवरूं
धुकें पुढिल जाणुनी मन न घे तसेंही करूं १

प्रदेश किती मागुते रुचिर ते बरे टाकिले ?
कितीक तटिनीतटें, श्रम जिथें अम्हीं वारिले ?
किती स्मृतिस धन्यतास्पद वनस्थली राहिल्या ?
जिथें धवलिता निशा प्रियजनांसवें भोगिल्या ? २

सुखें न मिळतील तीं फिरुनि !--तीं जरी लाविती
मनास चटका, तरी नयन त्यांवरी लोभती
परंतु हृदयास जे त्वरित जाउनी झोंबती
प्रमाद दिसतां असे नयन हे मिटूं पाहती ३

किती घसरलों !--किती चुकुनि शब्द ते बोललों
किती अनुचितामुळें पतित हाय हो जाहलों !
स्वयें बहकुनी उगा स्वजनमानसें टोंचिलीं
वृथा स्वजनलोचनीं अहह आंसवें आणिलीं ! ४

चुकूनि घडलें चुको; 'परि असें नव्हें हें बरें'
वदूनिहि, कितीकदा फिरुनि तेंच केलें बरें
म्हणूनिच अम्हां पुढें घन तमिस्र सारें दिसे
पुढें उचलण्या पदा धृति मुळींहि आम्हां नसे ! ५

' चुकी भरुनि काढणें फिरुनि हें घडेना कधीं '
असें प्रकट होतसे अद्य सत्य चित्तामधीं !
म्हणूनि अनिवार हें नयनवारि जें वाहतें
असे अहह ! शक्त का कवणही टिपायास तें ? ६

# १७. कर्तव्याचा आनंद

मुलांनो, लहानापासून मोठ्यांपर्यंत सर्व माणसांची नेहमीं इच्छा काय असते ? आपल्याला सदोदित सुख व्हावें, आपल्या आनंदांत कधीं कमी पडूं नये हीच. या आपल्या पृथ्वीच्या पाठीवर असा एक तरी मनुष्य—किंबहुना प्राणी—सांपडेल काय कीं, त्याला सुख मिळावें, आनंद व्हावा, अशी मुळींच इच्छा नाहीं ? लहान असो, मोठा असो, ज्याला त्याला इच्छा ही कीं, आपल्याला सुख व्हावें, दुःखाचा स्पर्शसुद्धां होऊं नये. मनुष्यमात्राची—प्राणिमात्राची—खटपट, सततची आनंदस्थिति—सततचें सुख-मिळावें यासाठीं चाललेली असते. तुमचीहि इच्छा तीच; माझीही इच्छा तीच; सर्व पृथ्वीवरल्या प्राणिमात्रांची इच्छा तीच; आणि ही इच्छा तृप्त करून घेण्याकरितांच सर्व खटपटी चाललेल्या असतात. सदासर्वदा अशा खटपटींना यश येतें असें नाहीं. पण मनुष्य आपल्याकडून खटपट करीत असतो. तुम्ही शाळेंत असतांना उत्तम प्रकारानें अभ्यास करितां; कां ? तर शिक्षकांनीं चांगलें म्हटलें, आईबापांनीं चांगलें म्हटलें, आणि आपण आपलें काम केलें म्हणजे जो मनाला आनंद होतो तो आपल्याला मिळावा म्हणून.

यावरूनच तुम्ही विचार करा कीं, ‘आनंदा’चें महत्त्व किती आहे तें ! एक क्षणभर तुमचा आनंद नाहींसा करतों, असें जर कोणीं कोणाला म्हटलें तर लागलीच कशी स्थिति होते ती पहा. तेव्हां अशी जी सर्वत्रांना सदा सर्वदा हवी अशी वस्तु ती उत्पन्न होते कशापासून ? ती आहे काय ? आणखी सदोदित आपल्या स्वाधीन ती असावी एवढ्याकरितां काय केलें पाहिजे ? याचा आपण विचार करून या तीनही प्रश्नांना अगदीं समर्पक अशीं उत्तरें मिळालीं, आणि त्या उत्तरांचा यथायोग्य उपयोग आपण करूं लागलों, म्हणजे ही अमोल वस्तु आपणाला सततची लाभलीच म्हणून समजावें. तर मग या प्रश्नांचीं समर्पक उत्तरें शोधण्याच्या खटपटीला आपण लागूं या.

पहिला प्रश्न: " आनंद उत्पन्न होतो कशापासून ? " हा प्रश्न ऐकून तुम्हांला मोठें आश्चर्य वाटेल नाहीं ? आतां जर तुम्हांला एकेकाला विचारलें कीं, ' आनंद होतो कशापासून ? ' तर किती तरी निरनिराळीं उत्तरें येतील. एक म्हणेल, " शाळेंत जाण्याचा, आणखी अभ्यास करण्याचा त्रास चुकल्यापासून ! " दुसरा म्हणेल, " खाण्यापिण्याची चंगळ असून कोणी रागें भरायला नाहीं, कशाची वाण नाहीं असें असल्यापासून ! " तिसरा म्हणेल, " जें ज्या वेळीं कांहीं करावेंसें वाटेल, तें त्या वेळीं करायला मिळाल्यापासून ! "--कोणी कांहीं सांगेल, कोणी कांहीं सांगेल. एकंदरींत एवढी गोष्ट खरी कीं, निरनिराळ्यांचीं निरनिराळीं उत्तरें येतील. सर्वांचा हेतु एकच कीं, आपल्याला आनंद मिळावा; परंतु तो आनंद कशापासून मिळेल याच्यासंबंधानें काय तो मतभेद. हा वरवर मतभेद दिसेल खरा, परंतु हा खराखुरा मतभेद नव्हे बरें. आनंदाचें मूळ आहे एकच. खरा आनंद--खोटा क्षणभर टिकून पुढें जन्मभर दुःखांत लोटणारा नामधारी आनंद नव्हे--उत्पन्न होतो तो एकाच गोष्टीपासून. ती गोष्ट कोणती ती पहा. आज जो तुम्हांला आनंद झाला आहे हाच कशापासून उत्पन्न झाला आहे तें पहा, म्हणजे तुम्हांलाच ती गोष्ट कोणची तें समजेल. आतां तुम्ही सगळेजण उत्तर द्याल कीं, आजचा आमचा आनंद आम्हांला महिना दीड महिना सुटी मिळणार आणि रगड खेळायला सांपडणार, या विचारापासून उत्पन्न झाला आहे. गोष्ट खरी आहे. तुम्हांला आतां सुटी मिळणार, विश्रांति मिळणार म्हणून आनंद झाला आहे. पण विचार करा कीं, ' सुटी ' ' विश्रांति ' या शब्दांच्या पूर्वी काय ? जेव्हां सहा महिने ' काम ' केलेंत तेव्हां आतां सुटी. गेल्या सहामाहींत योग्य तऱ्हेनें ' श्रम ' केलेत म्हणून आतां विश्रांति. या भावी विश्रांतीपासून ' खरा खरा आनंद ' कोणाला आहे ? ज्यांनीं आजपर्यंत खरे खरे श्रम केले, आणि ही विश्रांति मिळावी अशी योग्यता अंगीं आणली त्यांना. ज्यानें कांहीं श्रम केले नाहींत, ज्यानें आपले अभ्यास योग्य तऱ्हेनें केले नाहींत,

परीक्षेंत ज्याचा निकाल अगदीं वाईट झाला असेल, त्याला आतां या घटकेला जरी आनंद झाला असला, तरी तो खोटा, आणि अगदीं अल्प-काळपर्यंत टिकणारा; सर्व सुटीभर टिकणारा नव्हे. उद्यां गेल्या सहा-माहीच्या परीक्षेचा निकाल पालकांकडे गेला, म्हणजे ज्यांनीं अभ्यासांत कसूर केली असेल त्यांचे पालक त्यांस रागें भरणार, नांवें ठेवणार, ते खेळूं लागले कीं, अभ्यास करण्याविषयीं टोंचणी लावणार, अर्थात्च त्या सगळ्या आनंदाचा विरस होणार.

आनंद म्हणजे आपण जें कर्तव्य करावयाचें, जें आपण करावें अशी आपल्या शिक्षकांची व पालकांची इच्छा, तें केल्याबद्दलचें समाधान. आपण करावयाचें तें केलें नाहीं, भलतेंच केलें, असा विचार वारंवार मनांत येऊन आपलें मन आपल्याला खाऊं लागलें म्हणजे मग काय राहिलें? मग आनंद कसला? मनाची शांति आणि समाधान तोच आनंद. आनंद दुसरा कसला आहे? शिक्षकांनीं व मातापितरांनीं अमुक गोष्ट करण्याला सांगितली, अमुक गोष्ट नेहमीं अमुक वेळीं अमुक प्रकारानें करावी अशी त्यांची आज्ञा आपण अगदीं यथासांग बजाविली, आतां आपणांस ते चार चांगले शब्द बोलतील, या विचा-रांनीं जो आनंद होतो तोच आनंद खरा; इतर सर्व आनंद खोटे व क्षणिक, हें तुमच्या मनालाच विचारून बघा, म्हणजे चांगलें प्रत्ययाला येईल. सारांश काय कीं, आतां विचारलेल्या पहिल्या प्रश्नाचें समर्पक उत्तर हें कीं, 'आनंद' हा ज्यानें त्यानें आपलें कर्तव्य योग्य काळीं योग्य तऱ्हेनें बजावल्यानें उत्पन्न होतो. हें पहिल्या प्रश्नाचें उत्तर निघालें.

दुसरा प्रश्न: "आनंद ही वस्तु काय आहे?" आनंद म्हणजे "आपलें काम आपण योग्य वेळीं, योग्य तऱ्हेनें केलें म्हणजे होणारें समाधान." हें समाधान तुमच्या मनांत आज असलें, तरच तुम्हांला आनंद झाला असें म्हणतां येईल. अरेरे, आपण अमक्या विषयाचा नीट अभ्यास केला नाहीं, त्यामुळें त्या विषयांत आपण गेल्या

परीक्षेंत नापास झालों, आतां घरीं निकालाचें छापील कार्ड आलें म्हणजे वडील रागें भरतील,' अशी रुखरुख ज्यांच्या ज्यांच्या मनाला या वेळीं लागून राहिली असेल, त्यांना आनंद आहे कुठें? ज्यांच्या मनाला तळमळ त्यांना शांति कसली? समाधान कसलें? आणि आनंद कसला? खरा आनंद त्यांनाच कीं, ज्यांना कोणत्याही प्रकारची रुखरुख नाहीं. आपण जसें वागावें, जसा अभ्यास करावा अशी आपल्या वडिलांची व आपल्या शिक्षकांची इच्छा त्याप्रमाणें आपण खरोखर मनापासून वागलों, आणि त्याचें चीजही झालें, अशी ज्यांच्या मनाची खात्री असेल, परीक्षेच्या निकालाचें कार्ड घरीं जाईल केव्हां आणि आपल्या वडिलांच्या नजरेस तें पडून आपण त्यांच्या तोंडचे चांगले शब्द ऐकूं केव्हां, अशी उत्सुकता ज्यांना ज्यांना या वेळीं वाटत असेल, त्यांना त्यांना खरा आनंद आहे.

आतां तिसऱ्या प्रश्नाकडे वळूं या. हा प्रश्न सगळयांत अधिक महत्त्वाचा आहे. तो कोणचा तर, हा 'आनंद' आपल्यास सदासर्वदा कसा प्राप्त होईल? आज आहे तसाच उद्यां, तसाच परवां, तसाच एक वर्षानें आणि दहा वर्षांनीं कसा राहील? बाळपणांत आहे, तोच तरुणपणीं, आणि तोच वृद्धपणीं राहील असें कसें करतां येईल? मुलांनो, हा आनंद कशापासून उत्पन्न होतो, आणि हा काय आहे, याचे गुणधर्म काय आहेत हें ज्याला कळलें, त्याला या तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर देणें कांहीं अवघड नाहीं. सूर्य उगवला कीं, प्रकाश पडायचाच, ही गोष्ट जशी सदा सत्य आहे, त्याचप्रमाणें हीही गोष्ट सदा सत्य आहे कीं, आपल्या कर्तव्याला आपण जागून तें योग्य तऱ्हेनें बजावलें कीं त्यापासून होणाऱ्या समाधानाचा, अर्थात्च आनंदाचा लाभ हा व्हावयाचाच. सृष्टीचे जे कित्येक अपरिहार्य नियम आहेत त्यांपैकींच हा एक नियम आहे असें म्हटलें तरी चालेल. हें जर खरें आहे तर त्या आनंदाच्या सदैव लाभासाठीं काय केलें पाहिजे, याचें उत्तर शोधायला लांब जायलाच नको. बाळ-

पणीं काय, तरुणपणीं काय किंवा वृद्धपणीं काय, जें जें म्हणून कांहीं आपलें कर्तव्य असेल, तें तें यथाकालीं, यथायोग्य करीत गेलों कीं, 'नित्य' असा जो आनंद तो आपल्याला लाभलाच म्हणून समजावें. आपण आपलें काम केलें असें मनाला पक्कें वाटलें, आपलें मन आपल्याला खाण्यास जागा राहिली नाहीं, म्हणजे पूर्ण समाधानवृत्ति झालीच, आणि अशी समाधानवृत्ति झाली, म्हणजे आनंदाला काय पारावार !

## १८. कालमहिमा

कोठें गेले थोर पृथ्वीपती ते । सांगा गेले शूर कोण्या गतीतें ॥
झाले गेले मृत्युपंथेंचि सारे । कां देखाना सर्व कीं हें असारें ॥ १ ॥
त्यांची ती रणकीर्ति शत्रुहननीं उद्दाम तें वर्तन ।
त्यांचे ते मुशलापरी भुज, जयां भ्याले अरींचे गण ॥
त्यांचा तो घनघोर शब्द चढवी आंगीं रणाची रती ।
तीं आरक्त विलोचनें, सकलही झालीं कथामात्र तीं ! ॥ २ ॥
नाम काल तें थोर वाटलें। सुकृतिकीर्तनीं कर्ण कोंदले ॥
आज नष्ट तें, होय विस्मृती । कीर्ति लोपली कालभक्ष्य ती ॥ ३ ॥
तिमिर झांकितां गगनमंडला । तुटुनि अंबरीं क्षण झळाळला ॥
केतु दीपवी जनविलोचना । तों गिळी तया तम, विरोचना ॥ ४ ॥
नर हा किति दुर्लभ पाहे । क्षणभंगुर जीवित आहे ॥
नरदृष्टि असे किति कोती । किति तो भ्रमला गणगोतीं ॥ ५ ॥
किति गर्वभरें तो मनिं फुगला । क्षण एक असे बुद्बुद तगला ॥
चिरकीर्ति म्हणे मी मिळविन ती । रविचंद्र नभीं जोंवरि तपती ॥६॥
मोठालीं देउळें तूं धन वितरुनियां बांधिसी, आस ही कीं ।
राहो माझी सदाही अभिनवरुचिरा कीर्ति साऱ्या त्रिलोकीं ॥
रे मूढा कीर्ति कैशी अमर विलसते, मर्त्य तूं नाशवंत ।
कोटींचीं कोटि वर्षें क्षणसम गमतीं काल आहे अनंत ॥ ७ ॥
पाहे हा भूमिभागीं उलथुनि पडला स्तंभ मोठा जयाचा ।
चौं बाजूंनीं जयाच्या विलिखित दिसतो लेख चारी लिपींचा ॥
सांगे तूं अर्थ याचा नृपति कवण तो, कोरिला हा जयानें ? ।
भाषावेदी विवादा करिति म्हणति ' हा अर्थ ' ऐसें हटानें. ॥ ८ ॥
गेला तो नृपती, तदन्वय तसा, सामंत कोठें अतां ।
त्याची ती नगरी सुरम्य वनिता शालाहि वाताहता ! ॥
गेलें वैभव ये फिरूनि कसचें ? तो काल गालीं हंसे ।
कालाचा महिमा अगाध समजे तद्भक्ष्य सारें असें ॥ ९ ॥

# १९. प्रौढशिक्षण

ज्या हमालपुऱ्यांत फुरसदीअंतीं जाण्याचा श्यामसुंदराचा परिपाठ असे त्यांत राहणारे लोक बहुधा स्टेशनावर आणि कापसाच्या गांठी बांधण्याच्या व सरकी काढण्याच्या कारखान्यांत कामावर असत. ते निरक्षर व व्यसनासक्त असत. त्यांची पैदास इतर मजुरांच्या मानानें बरीच मोठी असे, पण तिचा बहुतेक भाग ते मद्यपानासारख्या व्यसनांत फस्त करून टाकीत. दारूप्रमाणें विडच्या ओढण्याचें व्यसनही त्यांजमध्यें फैलावलें होतें. व्यसन जडण्यास रिकामटेकडेपणाच बहुधा कारण होत असतो, हें जाणून श्यामनें हमालांचीं मनें गुंगवून टाकण्याकरितां एक भजनाचा अड्डा सुरू केला. तेथें श्याम रोज रात्रीं दोनदोन, चारचार घटका प्रार्थनासंगीतांतील पदें म्हणे, व त्यांची इतरांना संथा देत बसत असे. श्यामचा स्वर अत्यन्त मधुर होता. तो गाऊं लागला म्हणजे अडाणी हमाल नागाप्रमाणें डोलूं लागत व त्याच्या स्वरास फारच उठाव मिळून पार्थिवद्रव्यांत मध्येंच दिसून येणाऱ्या सोन्याच्या थराप्रमाणें किंवा काळया ढगांतून चमकणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें, तो अत्यन्त चित्ताकर्षक वाटे.

थोडच्याच दिवसांत एक बराच मोठा भजनी मेळा तयार झाला, व त्याचें भजन ऐकण्याकरितां गर्दीही बरीच जमूं लागली. या मेळयाच्या उपयोगाकरितां श्यामनें मुंबईहून प्रार्थनासंगीताचीं पुस्तकें मागविलीं. त्या पुस्तकांत प्राचीन व अर्वाचीन कवींच्या अत्यन्त प्रेमळ गीतांचा संग्रह होता. तीं श्यामच्या कंठांतून निघूं लागलीं कीं, श्रोत्यांचीं चित्तें भक्तिरसानें उचंबळून येत व त्यांच्या डोळयांतून प्रेमाश्रु वहावयास लागत.

तूं माझी माउली, मी तुझें लेंकरूं ।
नको पान्हा चोरूं विठाबाई ॥
बाळ जाणेना मातेसी ।
तिचें मन बाळापाशीं ॥

अशा ज्या अभंगांत ईश्वरास आईची व भक्तांस तिच्या अर्भकाची उपमा दिलेली आहे, ते म्हणतांना आईची आठवण होऊन श्यामचा कंठ दाटून येई, व त्याच्या डोळ्यांतून अश्रुबिंदु वाहूं लागत.

श्यामला प्रार्थनासंगीताच्या पुस्तकांतून रोज नवीन नवीन मधुर व प्रेमळ पदें काढतांना पाहून, त्याच्या श्रोत्यांना त्या पुस्तकाबद्दल फारच कुतूहल वाटूं लागलें. त्या अमृताच्या ठेव्याची किल्ली हस्तगत करून घेण्याची इच्छाही अनेकांना झाली. केवळ एका महिन्याच्या अभ्यासानें त्या पुस्तकांतील पदें आपणास वाचितां येतील, असें श्यामकडून कळतांच, त्यांनीं लिहिण्यावाचण्याकडे रोज दोनदोन तास देण्याचें ठरविलें. दुसऱ्याच दिवशीं रात्रीचा वर्ग स्थापन झाला. त्यांत आरंभींच पन्नास पाऊणशें विद्यार्थी जमा झाले. त्यांचा शिक्षक श्याम, हा सर्वांच्या मानानें अगदीं अल्पवयस्क दिसे. ज्याप्रमाणें आगगाडीच्या डब्यांस ओढून नेणारें एंजिन त्या सर्वांपेक्षां लहान दिसतें, त्याप्रमाणें श्यामचा देह त्याच्या शिष्यांच्या धिप्पाड देहांपुढें अगदींच किरकोळ दिसे. त्यांपैकीं कित्येकजण इतके उंच होते कीं, त्यांना शासन करण्याकरितां त्यांच्या श्रीमुखांत भडकावण्याचें श्यामला कारण पडलें असतें, तर त्याला उडीच मारावी लागली असती. परंतु तो प्रयोग त्यास कधींच करावा लागला नाहीं. ते सारे विद्यार्थी स्वेच्छेनें शिकावयास गोळा झाले होते; त्यांस उचलबांगडी करून जुलमानें शाळेंत आणून बसविलें नव्हतें, तर त्यांच्या मनांनींच उचल खाऊन त्यांस तेथें खेंचून आणिलें होतें; शिवाय, अनेक वर्षांच्या संवयीनें परिश्रम व मनाची एकाग्रता करणें हें त्यांच्या अंगवळणीं पडून गेलें होतें. त्यांची समजूतही बालपणांतल्यापेक्षां बरीच वाढली होती; यामुळें त्यांची लहानपणची तीव्र बुद्धि बोथट झाली असतांही तिचा ज्ञानांत सपाट्यानें प्रवेश होऊं लागला.

श्यामचें शिकविणेंही सुलभ व ज्ञानग्रहणास अनुकूल असेंच होतें. बुद्धिमांद्यापासून उद्भवणाऱ्या सर्व दोषांकडे श्याम सहानुभूतिपूर्वक पहात

असे. कोणत्याही विषयासंबंधानें एका स्पष्टीकरणानें शिष्यांची समजूत पडली नाहीं, तर तो विषय तो अनेकदा व विविध मार्गांनीं स्पष्ट करून दाखवी. त्याचे बहुतेक सारे शिष्य त्याचे व्यवसायबंधु असल्यामुळें तो त्यांस आदरानें वागवीत असे. त्याच्या सौम्य वर्तनावर व गोड स्वभावावर त्याचे विद्यार्थी इतके खूष असत कीं, ते वर्ग सुरू होण्याचे अगोदर कितीतरी वेळ येऊन त्याची वाट पहात बसत. वर्गाचें काम संपल्यावर सर्व मिळून कांहीं वेळ भजन करीत, व नंतर आदल्या दिवसापेक्षां अधिक संस्कृत बुद्धीनें व अन्तःकरणानें घरोघर परत जात. याप्रमाणें श्यामनें आपल्या अडाणी व्यवसायबंधूंना प्रथम गाण्याची गोडी लावून, नंतर त्याच्या द्वारें त्यांचा सरस्वतीच्या प्रांतांत प्रवेश करविला. सरस्वतीदेवीचें ध्यान ज्यानें प्रथम कल्पिलें त्याचा तिच्या हातीं वीणा देण्यांत विद्या व गायन यांचें साहचर्य प्रस्थापित करण्याचा हेतु होता कीं काय, हें माहीत नाहीं; पण पशुकोटींतून मनुष्यकोटींत आणून पोहोंचविणारें गायन मनुष्यकोटींतून देवकोटींत नेऊन बसविणाऱ्या विद्येची पहिली पायरी आहे, असें म्हणण्यास काय हरकत आहे ?

वर्गांतील विद्यार्थ्यांस लिहिणेंवाचणें व हिशेबठिशेब येऊं लागल्या-बरोबर श्याम त्यांजकडून ईसापनीति, बाळमित्र, पंचतंत्र, इत्यादि सोपीं पुस्तकें वाचून घेऊं लागला. त्यांतील गोष्टी ऐकण्यास बरीच गर्दी होऊं लागली. केवळ दोनतीन महिन्यांचे अवधींत निरक्षर हमालांत केवढें आश्चर्यकारक रूपांतर घडून आलें, हें पहातांच इतरांसही अक्षर-ओळख करून घेण्याची तीव्र इच्छा झाली, व एका वर्गाचे लौकरच अनेक वर्ग करण्यांत आले. नवीन वर्गांवर शिक्षक म्हणून श्यामच्या पट्टशिष्यांची योजना करण्यांत आली. व्यसनाप्रमाणें विद्याही सांसर्गिक आहे. तैलबिंदु पाण्यांत टाकला असतां जितक्या शीघ्रगतीनें भोंवतालीं पसरतो, तितक्याच शीघ्रगतीनें तैलबुद्धिही आपल्या विद्येचा प्रसार

भोंवतालच्या जडबुद्धीमध्यें करूं शकते. शिवाय, श्याम प्रत्येक विद्यार्थ्यापासून त्यास शिक्षण देण्यापूर्वीं दुसऱ्या एका तरी इसमास आपणाप्रमाणेंच साक्षर करण्याची शपथ घेववीत असे. यामुळें गांवांत विद्येचा प्रसार भूमितिश्रेढीनें होऊं लागला. श्यामच्या वर्गांत केवळ प्रौढ वयाचेच विद्यार्थी शिकावयास येत असें नाहीं, तर दिवसा सरकारी शाळेंत जाणारीं मुलेंही रात्रीच्या वर्गांत सामील होऊन, त्यांत मिळणाऱ्या शिक्षणानें आपल्या ज्ञानांत भर टाकीत. हळूहळू मुलांबरोबर मुलीही श्यामच्या वर्गांत येऊं लागल्या व अनेक कुटुंबवत्सल पिते आपल्या मुलांमुलींसह तेथें अध्ययन करतांना दिसूं लागले. ज्ञानलालसेंत कौटुंबिक प्रेमाची भर पडल्यामुळें संपादन केलेलें ज्ञान वज्रलेप होई. संसारांतील इतर प्रसंगीं कुटुंबियांस परस्परांची मदत झाल्यानें त्या प्रसंगांची आठवण राहून त्यांचें परस्परांवरील प्रेम वृद्धिंगत होई; त्याप्रमाणें शिक्षणसंपादनांतही त्यांचें परस्परांस साहाय्य होऊन त्यांचें ज्ञान व परस्पर प्रेम दृढ होत असे. आपल्या शिक्षणाचा दुसऱ्यास लाभ देण्याची शपथ मुलांप्रमाणें मुलींसही घ्यावी लागत असल्यामुळें, त्या घरीं आपल्या मातांस ज्ञानदान करून जन्मदात्र्यांचें ऋण फेडूं लागल्या. जो श्याम ब्राह्मणजातींत शिक्षणानें मागसलेला होता, तो मराठ्यांच्या शिक्षणाचा एक अद्वितीय पुरस्कर्ता होऊन बसला.

शिक्षणाची जसजशी प्रगति होऊं लागली, तसतसें व्यसनाचें पाऊल मागें हटूं लागलें, व प्रत्येक कुटुंबांत अधिकाधिक सुखसमाधान नांदूं लागलें. कांहीं व्यसनी इसम अजून श्यामच्या वर्गापासून अलिप्त राहिले होते. त्यांचें व्यसन सोडविण्याचे कामीं त्यास बरीच दगदग व मानहानि सोसावी लागली. हें व्यसन बहुधा दारूचें असे. श्यामनें हमालपुऱ्यांतील प्रमुख इसमांचीं मनें वळवून, त्यांजकडून व इतरांकडून मद्यपान न करण्याच्या शपथा घेवविल्या. शपथ मोडल्यास अपराध्यानें दंडादाखल एक भारी रक्कम द्यावी, असें ठरलें. या दंडाच्या रकमा पुष्कळदा अपराध्यांकडून वसूल होत नसत, त्या श्याम

आपल्या पदरच्या भरीत असे. अतिरिक्त मद्यसेवनानें बेहोष झालेल्या व रस्त्यांत लोळणाऱ्या इसमास बाबापुता करून त्याच्या घरीं बंदोबस्तानें पोंचवावें लागे. अशा प्रसंगीं श्यामला शिव्या व मारही सोसावा लागे. श्यामसारख्या सज्जन पुरुषास आपल्यामुळें किती त्रास सोसावा लागला हें त्या इसमास दुसऱ्या दिवशीं कळे, तेव्हां तो लाजेनें मरून चूर होई; व इतःपर आपल्या हातून त्याची अप्रतिष्ठा होऊं नये, अशाबद्दल तो फार जपे. त्यांत त्यास पहिल्याच खेपेस आलें नाहीं, तरी दोनतीन खेपांत हटकून यश येई.

दारूबाजीसारख्या व्यसनांतून सुटका झाल्यामुळें मजूरलोकांपाशीं आतां थोडाबहुत द्रव्यसंचय होऊं लागला. तो छानछोकींत खर्च न होतां सार्थकीं लागावा, म्हणून श्यामनें मजुरांची एक समाईक भांडवलाची सहकारी पतपेढी काढली व तिचें काम त्याच्याच हाताखालीं शिकून तयार झालेल्या इसमांच्या देखरेखीखालीं सुयंत्रपणें चालू केलें.

द्रव्याइतकीच वेळेचीही किंमत असते. द्रव्याप्रमाणें वेळही कारणीं लावावा, म्हणून त्यानें मराठ्यांच्या सार्वजनिक खर्चानें एक वाचनालय स्थापन करून, त्यांत कांहीं प्रमुख वृत्तपत्रें व मासिकें घेण्याची सोय केली. जगाच्या पर्यटनानें जो अनुभव व उदार शिक्षण मिळतें तें नियतकालिकांच्या वाचकांस घरबसल्या मिळत असतें. एकाच पक्षाचीं नियतकालिकें वाचनांत आल्यानें वाचकांचें मन संकुचित होतें, तसें होऊं नये म्हणून त्यानें सरकारी, नेमस्त, जहाल, ब्राह्मण, अब्राह्मण, इत्यादि सर्व पक्षांचीं वृत्तपत्रें आणविण्याची तजवीज केली. त्यांतील निबंधक व सुंदर लेख तो रात्रीच्या वर्गांतून वाची किंवा वाचून घेई.

सारांश, एका सामान्य बुद्धीच्या व सामान्य शिक्षणाच्या इसमास इच्छा असल्यास किती समाजहित साधितां येतें, हें चिमणपूरच्या समाजाच्या प्रत्ययास श्यामनें चारपांच महिन्यांच्या अवधींत आणून दिलें.

# २०. कर्णाचा थोरपणा

श्रीकृष्ण म्हणे, " कर्णा ! विश्रुत तूं शुद्धविप्रजनदास ॥
चाल, भजोत भ्राते तुज, चातक भजति जेंवि वनदास ॥ १ ॥
देईल अजातारी मद्वचनें आजि राज्य अभ्रात्या ॥
भ्रात्या न वळेल कसा ? वळवीलचि धर्मवायु अभ्रा त्या ॥ २ ॥
सानुजसुत धर्म तुला नमिल, सयादव करीन मीं नमन ॥
सच्चित्त गुर्वनादर तोयानादर करी न मीनमन ॥ ३ ॥
राज्याभिषेक करितिल तुज मजसह विप्र भूमिप दरानें ॥
किंबहुना ? घेइल तव तांबूल क्षिप्र भूमि पदरानें ॥ ४ ॥
चाल कसा, हो राजा, मातेच्या मानसासि दे सुख, गा ! ॥
यांचा तुज काकांचा सहवास जसा सितच्छदा सुखगा " ॥ ५ ॥
कर्ण म्हणे, " बा ! देवा ! वदसि स्नेहेंचि बा ! दयालो ! हें ॥
भटकरगें जोडावी स्पर्शमणीची कशी दया लोहें ? ॥ ६ ॥
निष्फळ कसें करूं गा ! बा ! परिहृतसर्वनतनराधे ! तें ? ॥
मेल्यावांचुनि द्यावें जोडुनि सुतशोकवतन राधेतें ? ॥ ७ ॥
दुर्योधन नांवाचा, राजा मीं, सर्व राज्यभोग मला ॥
मूर्त नरक नरकाविच्या हृदयाला, जो कृतघ्न, तो गमला ॥ ८ ॥
संस्कार विवाहावधि केले माझे यथोक्त सूतानें ॥
निर्मळपणें निघावें रक्तपटांतूनि केंवि सूतानें ? ॥ ९ ॥
समरमखाचि होवूं द्या, क्षत्रिय सेवूत तल्प न गद्रांनीं ॥
पुण्य रणमरणदानीं वीरां जें, तें न कल्पनगदांनीं ॥ १० ॥
श्रीकृष्णजी ! करावा कैसा विश्वासघात अवसानीं ? ॥
युद्ध कसें न करावें ? आम्हां हा युद्धलाभ नवसांनीं ! ॥ ११ ॥
तरि मग उरलें काय ? प्रभुजी ! त्यजिल्या जरि प्रतिज्ञा त्या ॥
नच सोडवेल देवुनि धीर भरवसा अरिप्रति, ज्ञात्या ! ॥ १२ ॥

राज्य न करील, देइल धर्म मला उमजतांचि हें नातें ॥
देइन सुयोधना मीं तेव्हां होइल तुम्हांसि हें नातें ॥ १३ ॥

धारातीर्थींच मिळे सद्गति सत्कीर्ति शुद्धि अधमातें ॥
राज्यपद्भोग नलगे, द्यावा देवा ! रणांत वध मातें ॥ १४ ॥

मज समजलें प्रभो ! हें त्वद्दृष्टिपुढें उरेल न क्षत्र ॥
रवि काळरुद्रदृष्टिसि न पुरे, तेथें पुरेल नक्षत्र ? ॥ १५ ॥

तूं स्वाश्रितप्रतिज्ञा करिसिल, न धरूनि शस्त्र, सत्या, गा ! ॥
उरतिल कैसे करिते झाले जे, हरुनि वस्त्र, सत्यागा ? " ॥ १६ ॥

देव म्हणे, "राज्य नको ? उपदेश अयोग्य काय हे महिम्या ? ॥
क्लीबाला कन्यासी तुज कां द्यावी बळेंचि, हे महि, म्या ? ॥ १७ ॥

जेथें भीम धनंजय, बहुदुःसह वासवा रणाजिर तें ॥
हरिलंघन असतांही बळिगजसहवास वारणा जिरतें ? ॥ १८ ॥

धनदानें अधनाचा तुमचा तैसाचि काम रणदानें ॥
म्यां पुरविजेल, द्यावीं स्वरगें इतरें न का मरणदानें ? ॥ १९ ॥

जा, सर्व सिद्ध व्हा, जरि आहे उद्युक्त मानस मराया ॥
सम रायास तुम्हांसहि भीमार्जुन वरद, शीघ्र समरा या ॥ २० ॥

देईल कुरुक्षेत्रीं धर्म प्रभुवर तुम्हां निधनदानें ॥
धनदानें जसिं येणें न दिलीं उदकें तथाविध नदानें " ॥ २१ ॥

कर्ण म्हणे, " बा ! वचना मान्य न झालों म्हणों नको पावें ॥
वध्यें 'वधाचि' म्हणतां, प्रभुनें आग्रह म्हणोनि कोपावें ? ॥ २२ ॥

सत्य उपदेश आम्हीं वरिचेवरि भव्यहेतु झेलावे ॥
जाणोनि सर्व, देवा ! लाविसि कां बोल ? हे तुझे लावे ॥ २३ ॥

स्वप्नांत पाहिले नृप, शांतनव, द्रोण हाहि दाता हे ॥
घेऊनि उष्ट्रयानीं बैसुनि दक्षिणदिशेसि जाताहे ॥ २४ ॥

सहदेव, नकुळ, सात्यकि, भीमार्जुन, धर्म, तूंहि बापा ! हे ॥
सप्त तुम्ही श्वेतगजीं ऐसें स्वप्नांत कर्ण हा पाहे " ॥ २५ ॥
श्रीकृष्ण म्हणे, " बहुधा मरणारचि हे समस्त सुपदेश ॥
कीं तव हृदयें माझा हितहि स्वीकारिला न उपदेश " ॥ २६ ॥
कर्ण म्हणे, " भेटि असी परलोकीं मात्र बा ! दयालो ! कीं ॥
कलहीं स्नेह न राहे, हे दुर्लभ म्हणुनि पाद या लोकीं " ॥ २७ ॥
ऐसें म्हणोनि कर्ण प्रभुला कडकडुनि भेटला सुचिर ॥
मुग्धांसहि जडितकनकमरकतनग न गमला तसा रुचिर ॥ २८ ॥
झाला मंत्र असा, मग आला नगरांत कर्ण परतोन ॥
पर तो न प्रभु, कोपे वरि पुरता पूर्ण, आंत परतोन ॥ २९ ॥

# २१. ताईचा मृत्यु

इ. स. १९१२ तील दिवाळींत ताईस बरें नव्हतें, तरी दिवाळी नेहमींप्रमाणें थाटाची झाली. हरिभाऊंच्या मित्राकडून ताईला एक किल्ला व सुंदर चित्रें बक्षिस म्हणून आलीं. किल्ल्याच्या व फटाक्यांच्या धांदलींत इकडे तिकडे आनंदांत हिंडतांना ताई दुखणें विसरली व हरिभाऊ व वेणुताई यांनासुद्धां ताईचा आनंद पाहून तिच्या दुखण्याची विस्मृति झाली.

दिवाळी झाल्यानंतर ताईच्या इच्छेप्रमाणें तिची मोठी भातुकली झाली. त्या दिवशीं हरिभाऊंच्या वीसपंचवीस मित्रकन्या आनंदाश्रमांत जमल्या होत्या. त्या साऱ्यांनीं मिळून जेवायचें होईपर्यंत देवळांत खेळांचा धुमाकूळ मांडला. ताईनें सांगितल्याप्रमाणें तिच्या मैत्रिणींसाठीं पाट, रांगोळ्या, विडे वगैरेंची जय्यत तयारी तिच्या आईनें ठेविली होती. हरिभाऊंना सांगून त्यांच्याकडून तिनें मैत्रिणींना देण्यासाठीं आयत्या वेळीं फुलें आणविलीं. जेवावयाच्या वेळीं माजघर मुलींनीं भरून गेलें होतें. तो भोजनसमारंभ व मुलींचा आनंद कौतुकानें पहात हरिभाऊ तेथें उभे राहिले. आपल्या लाडक्या ताईसाठीं म्हणून इतक्या मुली आपल्या घरीं आल्या या विचारानें त्यांच्या नेत्रांत आनंदाश्रु आले. परंतु हा त्यांचा आनंद संपण्याची वेळ जवळ जवळ येत चालली होती.

दिवाळीनंतर मात्र ताईच्या दुखण्याचें मान वाढतच चाललें. अंगांत रक्त तयार होईनासें झालें व ती दिवसेंदिवस अधिक कृश दिसूं लागली. इतकें बरें नव्हतें, तरी तिनें हरिभाऊंच्याकडून संक्रान्तीच्या दिवशीं घरांतल्या सर्व मंडळींना व छापखान्यांतील नोकर माणसांना बोलावून घेतलें व सर्वांना प्रेमानें तिळगुळ दिला. ताईची क्षीण प्रकृति पाहून हरिभाऊंना फार वाईट वाटलें.

ताईस आतां ताप येऊं लागला, अन्न जाईनासें झालें; जीव मात्र एकसारखा घाबरा घाबरा होई. नानाप्रकारचीं औषधें सुरू होतीं. परंतु ताप कमी होण्याचें लक्षण दिसेना. ताईची प्रकृति अत्यंत नादुरुस्त झाली आहे हें हरिभाऊंना समजत नव्हतें असें नाहीं. परंतु ताईकडे पाहतांच ही मुलगी म्हणजे आपणांस सोडून जाईल, तिचा व आपला चिरवियोग होईल अशी कल्पनाच त्यांच्या डोक्यांत येत नसे. लहानपणीं भयंकर दुखण्यांतून ती बरी झाली तशीच आतांहि होईल अशी आशा त्यांना वाटे. प्रेमी हृदय कितीतरी वेडें असतें ! प्रत्यक्ष गोष्टीवर विश्वास न ठेवतां खोटी आशा नेईल तेथें तिच्या मागून तें बिचारें जात सुटतें. आपण ज्यावर प्रेम करतों तें मनुष्य अमर असतें अशीच त्या वेड्या मनाची कल्पना असते कीं काय कोण जाणे !

दुखण्यामुळें ताईचा नादिष्टपणा वाढला. ‘ अमक्याच माणसाला बोलवा ’ असा हट्ट ती धरून बसे; व तें मनुष्य तिच्याजवळ येऊन बसल्याशिवाय तिला करमत नसे. ‘ यंदाचा माझा वाढदिवस मोठा कर ’ असा तिनें आपल्या आईपाशीं छंद घेतला होता. परंतु तिचा जन्मदिवस उजाडला, त्यापूर्वींच आठ दिवस ताई निघून गेली होती !

त्या वर्षींच आनंदाश्रमांत लाविलेल्या सोनकेळीला एक मोठा सुंदर घड आला होता. ताईला केळीं फार आवडत. बिछान्यावर पडल्या पडल्या त्या घडाकडे पाहून ती वारंवार म्हणे, ‘ तात्या, मला बरं वाटलं अन् हीं केळें पिकलीं म्हणजे मला द्याल ना एक ? ’ हरिभाऊ तिला रोज सांगत, ‘ ताई, तुला बरं वाटलं म्हणजे द्यायचं बरं कां एक केळ ! ’ सोनकेळ्यांचा घड कांहीं कालानें पिकला; परंतु त्याकडे पाहून हरिभाऊ व वेणुताई यांना टिपें गाळण्याचाच शेवटीं प्रसंग आला !

शेवटीं शेवटीं तीन दिवस तिला कांहींच अन्न गेलें नाहीं. आदल्या दिवशीं सिव्हिल सर्जन पाहून गेला होता. झोंप येण्यासाठीं म्हणून तिला औषध दिलें, परंतु त्यामुळें गुंगी न येतां एकसारख्या उलट्याच

होऊं लागल्या. ही तिची स्थिति पाहून हरिभाऊंचा धीर सुटत चालला. त्या दिवशीं रात्रीं ताई एकदम वेणूताईंना म्हणाली, 'आई, मला एक भाऊ किंवा बहिण असती तर बरं झालं असतं, नाहीं ग!' त्यावर, 'काय करायची आहे भाऊ न् बहिण? तूं तर आहेस आम्हांला!' असें तिच्या तोंडावरून हात फिरवित सद्गदित कंठानें वेणूताईंनीं म्हटलें. तेव्हां, 'तसं नव्हे ग. पण...' इतकें अर्धवट बोलून ती थांबली. 'आपण आतां जाणार, आईला व तात्यांना मग कोणी नाहीं,' असे विचार त्यावेळीं तिच्या डोक्यांत येत होते कीं काय कोण जाणे!

सकाळीं ती जागी झाली. तेव्हां सर्व मंडळी अत्यंत खिन्न होऊन बसलेली तिला दिसली. चहा करायला कुणाला सुचत नव्हतें. परंतु चहा केला नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेवून तिनें विचारिलें, 'आई, आज चहा कां ग नाहीं केला?' 'तुला बरं वाटत नाहीं म्हणून नाहीं केला झालं,' असें वेणूताईंनीं उत्तर दिलें. हें ऐकून तिला चैन पडेना व ती म्हणाली, 'आई चहा कर तूं. मी अन् तात्या मिळून चहा घेऊं. राव-साहेब आले आहेत. त्यांनाहि पण चहा दे.' तिच्या बोलण्याचा त्या दिवशीं अनादर करणें अशक्यच होतें. वेणूताईंनीं चहा केला व सर्वांना दिला. ताईबरोबर घेतलेला हा चहा हरिभाऊंच्या आयुष्यांतील शेवट-चाच ठरला. कारण यानंतर चहाच्या थेंबासुद्धां त्यांनीं कधीं स्पर्श केला नाहीं!

सकाळीं साडेनवापासूनच श्वास लागला होता. ही इतकी एकसारखी बोलते, तेव्हां चिन्ह कांहीं ठीक नाहीं, अशी हरिभाऊंच्या मनाची खात्री होत चालली. साडेदहानंतर तिनें हरिभाऊ व वेणूताई यांना आपल्याजवळून हलूं दिलें नाहीं. वेणूताई सारख्या रडत होत्या. 'आई ग रडूं नकोस. मला बरं वाटतं आहे, पण आज किनई कांहींतरी वेग-ळंच होतं आहे,' असें बोलून आसन्नमरण स्थितींतही ताई त्यांची समजूत घालीत होती. वेणूताईच्या डोळ्यांचें पाणी खळेना, तेव्हां ती हरिभाऊंच्याकडे वळून म्हणाली, 'तात्या, आईला कांहीं तरी सांगा

ना ? ती पहा कशी एकसारखी रडते आहे. तुम्ही सांगितलंत म्हणजें ती ऐकेल. ’ वेणूताईच्या सारखीच हरिभाऊंच्या हृदयाची स्थिति झालेली होती. ते त्यांची समजूत कशी करणार ?

डॉक्टर आपल्याकडून प्रयत्नांची शिकस्त करीत होते. ताईची तळमळ चालली होती. ताई शुद्धीवर असून शहाण्यासारखी बोलत होती. हरिभाऊ व वेणुताई चिमणीसारखीं दीनवाणी तोंडें करून आपल्या हृद्यांतील त्या प्राणाकडे पहात राहिलीं होतीं. ताईचे पाय थंड पडत चालले होते व मुख अगदीं निस्तेज दिसूं लागलें होतें. ‘ ताई, आतां तूं बोलूं नकोस. राम, राम म्हण ’ असें सांगितल्यावरून तिनें ‘ राम, राम ’ म्हणण्यास सुरुवात केली. आणि दुपारीं एक वाजतां ‘ राम, राम ’ म्हणत म्हणत माघ शुद्ध चतुर्दशीच्या दिवशीं ( ता. १९ फेब्रुवारी १९१३ ) तिनें प्राण सोडला ! वेणुताई शोकानें मूर्च्छित होऊन पडल्या. हरिभाऊंच्या अंतःकरणांतील अमर्याद दुःखाचें कोण वर्णन करणार ? आपला स्वतःचा प्राणदीप मालविला असें त्यांस वाटलें. आनंदाश्रमांतील आनंदमूर्ति नाहींशी झाली. तिच्याबरोबरच हरिभाऊंच्या जीवनांतील आनंदाचा कायमचा लोप झाला !

## २२. जयद्रथवध

सौभद्रशोकविवशें रचिलें पणातें । कुंतीसुतें समजल्याविण आपणातें ॥
तें वाक्य सत्य करवी तव पूर्वजाचें । श्रीकृष्ण नाम भज त्यासि अपूर्व ज्याचें ॥१॥

'मी मारीन जयद्रथासि समरीं जों भानु आहे नभीं
नाहीं होमिन देह हा हुतवहीं, सर्वात्मना ही न भी, ।
ऐसें बोलुनि वाक्य त्या परिस तो केला असा नेम रे
रक्षूं त्यासि बळें, घडो मग तसें, तो स्वापमानें मरे ॥ २ ॥

यानंतरें जशुनि कौरवराजसेना । आली कशी ? अवनिमण्डल जें दिसेना ॥
तों पार्थसैन्यहि सवेंचि निघे रणाला । ज्या इंद्रहि परि नव्हे क्षम वारणाला ॥३॥

सूचीव्यूह तयांत पद्म रचिलें राहे तदभ्यन्तरीं
राजा सैंधव तो जयद्रथ तरी चिंता करी अंतरीं ।
व्यूहाच्या वदनीं कृतांतसमसा आचार्य राहे बळें
जे जे ज्या स्थळिं ठेविले नृपवरें ते राहिले तुंबळें ॥ ४ ॥

वदे कृष्ण, 'पाहे नरा ! द्रोण हा रे । समस्तास्त्रवेत्ता रणीं जो न हारे ॥
जयाचे शरव्रात भात्यांत कोरे । तयाशीं वृथा झुंज लावूं नको रे ॥५॥

पंचाशीति जयासि वर्ष गणना आपांडुता मस्तकीं
युद्धीं द्रोण तथापि दुर्धर दिसे हस्ती जसा मस्त कीं ।
पार्था ! तूं न भिडे तयासह नको तो आजि नाटोपतो
पाहा दुःसह वाटतो मज रणीं याचा खटाटोप तो' ॥ ६ ॥

नमस्कार दूरोनियां सव्यसाची । करी बाणयोगें गुरूला तसाची ॥
सवेगें पुढें तो पृथापुत्र धांवे । यदर्थ प्रतिज्ञा तयातें वधावें ॥ ७ ॥

सव्यापसव्यकृतसायकतांडवानें ।
केलें पराजित रणीं रण पांडवानें ॥
घालूं शके कवण यावरि वीर घाला ।
जैसा मृगांत मृगराज तसा निघाला ॥ ८ ॥

कौंतेयाप्रति देवकीय वदला, 'हे भागले वाह रे
जाले फार तृषार्त, यत्न करणें जेणें पिपासा हरे '।
बोले पार्थ, 'जळासि यांसि जपतों मी वारुणास्त्रा रणीं
या वीरांसहि वारितों, गज जसा सक्रोध आधोरणीं ' ॥ ९ ॥

तत्काळ वापी रचिलीच पार्थें । वारोनियां वीरबळें अपार्थें ॥
केलें युगापासुनि मुक्त देवें । सर्वेंचि ते घोटक वासुदेवें ॥ १० ॥
आर्द्रपृष्ठ हय पाजुनि पाणी । दों करीं चतुर नीरज पाणी ॥
देखती कुतुक सैनिक सारे । बोलती, ' प्रबळ पार्थ कसा रे ? ' ॥ ११ ॥,

संयोजिले तुरग शीघ्र रथासि देवें ।
केलें पहा सुकृत पांडुसुतें सदैवें ॥
दे हात पार्थ चढतां स्वरथावरी तो ।
एक्या करें हय चतुष्टय सांवरीतो ॥ १२॥

होतां असा मग रथारुढ कैटभारी ।
बोलें, ' नरा ! मन तुझें न भया उभारीं ॥
अस्ताचला स्वतिलकीकृत भानु गेला ।
वेड्या! जयद्रथवधास्तव तूं भुकेला, ॥ १३ ॥

हें क्लिष्टवाक्य पडतां श्रवणीं, विलोकी ।
सूर्याकडे, मग म्हणे, 'मुख केंवि लोकीं ॥
दावूं ? अतःपर करूं न शके पणातें ।
हें वाक्य सत्य करि होमिन आपणातें' ॥ १४ ॥

अच्यूत हें समजला जगदांतरात्मा ।
बोले शतक्रतुसुताप्रति तो महात्मा ॥
' कां धाकलास इतुक्यांतचि या वधाया ।
पाहें कशी रचितसें निजयोगमाया ॥ १५ ॥

तुझें उणें या स्वजनीं दिसावें । रथीं तुझ्या म्यां मग कां बसावें ।
मर्मीं असें कार्य तुझें सजावें । उगोंचि वाटे मज तूं खिजावें ' ॥ १६ ॥

साधावया अर्जुनकामनेला । अस्तासि मार्तंड निकाम नेला ॥
प्रमोद जाला धृतराष्ट्रजाला । कीं आज हा सैंधव वीर जाला ॥ १७ ॥
समीप आले नृपलोक सारे । पाहो मरे अर्जुन हा कसा रे ॥
कोणी नरासी करिती खटाळी । ते मारिती हांसुनि मूर्ख टाळी ॥ १८ ॥

' पार्था ! रे रवि हा जयद्रथहि हा, हें लक्ष लावीं बरें '
बोले अर्जुन, ' लाविलें, हरि वदे, 'मारी ' जगच्छेखरें ।
ऐसें त्याप्रति बोधितां झडकरी त्या सैंधवाचा गळा
गेला तोडुनि अर्धचन्द्रविशिखें कीं मस्तका वेगळा ॥ १९ ॥

## २३. सहाव्या इयत्तेची परीक्षा

सहाव्या इयत्तेच्या परीक्षेला बसावयाला वयाचीं सतरा वर्षें पुरीं व्हावीं लागत. हीं पुरीं झाल्यानंतर या परीक्षेला जाण्याचा मीं बेत केला. परीक्षेची वेळ हल्लींप्रमाणेंच सप्टेंबर महिन्यांत होती ती अतिशय गैरसोयीची असे. रत्नागिरी मुरुडाहून तीस कोस आहे. पावसाळ्याचे दिवस, व वाटेंत जिकडेतिकडे खाड्या; यामुळें रत्नागिरीस जाणें अशक्य असे. म्हणून मुरुडचे विद्यार्थी परीक्षेसाठीं मुंबईस जात. विद्यार्थ्यांनीं आपापल्या जिल्ह्यांत परीक्षेला बसलें पाहिजे, असा नियम पुढें झाला. या वेळीं विद्यार्थ्यांना वाटेल त्या ठिकाणीं परीक्षेला घेत. शिवाय मुंबईची परीक्षा रत्नागिरीपेक्षां सोपी, अशीहि विद्यार्थ्यांची समजूत असे. त्या वर्षीं आम्हीं पांच विद्यार्थी परीक्षेला जाणारे होतों. आंजर्ल्याच्या खाडींतील एक गलबत मुंबईस जावयाचें होतें, त्यांतून जाण्याचा आम्हीं बेत केला. गलबत रात्रीं बारा वाजतां निघणार होतें. आम्हीं आवशीलाच खाडीजवळच्या धर्मशाळेंत जाऊन बसलों. इतक्यांत पाऊस अतिशय जोराचा पडूं लागला व तो थांबण्याचें चिन्ह दिसेना. अर्थात् गलबत जाण्याचें राहिलें व आम्हीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं पावसाच्या टोंबांतून सहा मैल घरीं परत आलों. आमच्या गांवांतील खाडीलाच इतकें पाणी झालें कीं, मोठ्या कष्टानें ती उतरून आम्हीं पार पडलों. पायरस्त्यानें मुंबईला जावयाचें म्हणजे रत्नागिरीसारखीच अडचण होती. जिकडेतिकडे उतार न होणाऱ्या खाड्या. आतां आमचें परीक्षेला जाणें बहुतकरून राहतें, असें सर्वांना वाटलें. साताराच्या परीक्षेस अजून चार दिवस होते. कसें तरी करून अठरा कोसांवर असणारें चिपळूण गांठतां आलें तर पुढील रस्त्यावर नद्यांना जिकडेतिकडे पूल होते. पण पाऊस फारसा कमी झाला नव्हता, म्हणून आमच्या कोणाच्याच घरची मंडळी आम्हांला परवानगी देईना. शिवाय दीड कोसावर कर्दें येथें राहणारा एक विद्यार्थी होता,

त्याची परवानगी मिळवावयाची होती. आम्हीं हट्ट करून परवानगी मिळविली आणि सर्वजण कर्दे येथील मुलाच्या घरीं वस्तीला गेलों. आतां पाऊस कमी झाला होता; पण तीन दिवसांत सातारा गांठावयाचा होता. सर्वांना हें अशक्य वाटलें. कर्दे येथील मुलाच्या घरची परवानगी मिळेना; तेव्हां आम्हीच निघालों व तो मुलगा आम्हांला पोहोंचवावयाला आला. सामानसुमानाशिवायच तूं आमच्याबरोबर चल, म्हणून आम्हीं त्याला म्हटलें व तोही आम्हांबरोबर आला. दोनप्रहरीं सहा कोसांवर कुंभें गांवीं आम्हीं दुपारच्या जेवणासाठीं मुक्काम केला. इकडे या मुलाच्या घरच्या मंडळींनीं ताडलें कीं, ज्या अर्थी हा परत आला नाहीं, त्या अर्थी हा परस्पर गेला असावा. तेव्हां त्याचा वडील भाऊ त्याचें सामानसुमान घेऊन निघाला व आमचीं जेवणें होऊन आम्ही पुढें जावयास निघणार, तों त्यानें आम्हांला गांठलें. आम्हीं सर्वांनीं आपापलीं ओझीं पाठींशीं बांधलीं व जेवल्याबरोबर पुढें जाण्यास निघालों. आठ कोसांवर आम्हीं रात्रीची वसती केली. पुनः पहांटेस उठून उजाडल्याबरोबर आम्हीं चिपळूण गांठलें. तेथें आमच्या गांवचे एक गृहस्थ फौजदार होते, त्यांच्या घरीं आम्ही उतरलों. दोन प्रहरचीं जेवणें करून थोडी विश्रांति घेऊन आम्ही पुनः निघालों. फौजदारसाहेबांनीं आम्हांला ओझ्यासाठीं भाड्याचें एक घोडें करून दिलें. चिपळुणापासून पाटण अठरा कोस, व पाटणापासून सातारा अठरा कोस, इतकी मजल आम्हांला मारावयाची होती, व अवकाश काय तो दीड दिवस व दोन रात्री इतका होता. आम्हीं कुंभार्ली घाटाच्या पायथ्याशीं जाऊन फराळ केला, व रात्रींची चारपांच तास झोंप घेऊन पहांटेला दोन वाजतां घांट चढूं लागलों. इतकें नेटानें चालण्याची आम्हांला संवय नव्हती. यामुळें आम्ही थकलों होतों; तथापि कसेंबसें करून एक वाजण्याच्या सुमाराला पाटण गांठलें. तेथें एका गृहस्थाच्या घरीं वाटसरूंना भोजन मिळत असे. तेथें जाऊन आम्हीं स्नान करून जेवणखाण आटोपलें, तों तीन साडेतीन वाजले. दुसऱ्या

दिवशीं दहा वाजतां परीक्षेसाठीं हजर व्हावयाचें होतें, व अठरा कोसांचा प्रवास करावयाचा होता. परीक्षेला जाण्यासाठीं विद्यार्थी आले आहेत अशी शाळामास्तरांना खबर कळली, तेव्हां ते आम्ही उतरलों होतों तेथें आले. त्या मंडळीनें आम्हांला अशी सल्ला दिली कीं, मोठ्या रस्त्यानें गेलें तर सातारा अठरा कोस आहे; परंतु पायवाटेनें खिंडींतून धनगरसड्याच्या मार्गानें गेल्यास सहा कोसांचा हिसका वांचतो; आम्हीं जलदी केली, तर काळोख पडण्यापूर्वीं धनगरसड्यावर जाऊं, व मग पुढील वाट तितकी वाईट नाहीं. आम्हीं सर्वांनीं लागलीच निघण्याची तयारी केली. या सर्व प्रवासांत एक आनंदाची गोष्ट एवढीच होती कीं, पहिल्या सहा कोसांच्या पुढें आम्हांला पाऊस बिलकूल लागला नाहीं. आम्ही पाटणहून निघाल्यानंतर दोन तीन मैल कसेबसे ठीक गेलों; परंतु पुढें घोडें अगदीं थकलें. पाटणहून निघतांनाच घोडेवाल्यानें खूप आढेवेढे घेतले; परंतु आम्हीं त्याला जुलुमानें आमच्याबरोबर यावयाला लावलें. आम्हांला परीक्षेचा ध्यास लागला होता, त्यामुळें जरी आमचीं शरीरें थकलीं होतीं, तरी आमचीं मनें त्यांना जोर देऊन ओढओढून नेत होतीं. तसें उत्तेजन त्या बिचाऱ्या घोड्याला काय होतें? बोलून चालून तें भाडेकरीं घोडें. त्याला खाणें बेताचेंच मिळावयाचें. चिपळुणापासून पाटणपर्यंतच्या अठरा कोसांच्या प्रवासानें तें थकून गेलें होतें. एक काठी मारिली कीं, चार पावलें चालावें व पुनः थबकून उभें रहावें, असा क्रम त्यानें सुरू केला. आम्हीं त्याला मारून चालविण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ. आम्हीं अर्ध्या खिंडींत आलों व काळोख पडला. एका बाजूला उंच कडा व दुसऱ्या बाजूला खोल दरी आणि मध्यें दोन एक हाताची अरुंद वाट व जिकडे तिकडे किर्र झाडी! अशा अडचणींत आम्हीं सांपडलों. घोडेवाला आमच्या मूर्खपणाबद्दल व आम्हीं आपल्याबरोबर त्याला संकटांत घातल्याबद्दल, आमचें शब्दांनीं ताडण करीत होताच. मोठा धीट मनुष्यहि अशा वाटेनें रात्रीला जाण्याचें धाडस करावयाचा

नाहीं; पण आम्हांला त्या वाटेची कांहीं कल्पना नव्हती. आम्ही घोड्याला मारमारून चालविण्याचा प्रयत्न केला. अखेरीला नाइलाज होऊन थकल्यामुळें तें घोडें खालीं बसलें, तें कांहीं केल्या उठेना. आम्हीं त्या वेळीं स्वार्थ साधण्यासाठीं अतिशय निर्दयपणानें वागलों! आम्ही पांचजण व घोडेवाला पडला एकटा. त्यांतून तसा तो खाष्ट नव्हता. नाहीं तर तो इतक्या संध्याकाळीं खिंडींत शिरताच ना. किती मारलें तरी घोडें उठत नाहीं, हें स्पष्ट दिसून आलें. अशा अरण्यांत सबंध रात्र काढणें अशक्य होतें. घोडेवाल्याचें मन द्विधा होत होतें; घोड्याला टाकून जावें कसें व अरण्यांत थांबावें तरी कसें? अखेरीस तो आमच्याबरोबर पुढें जाण्याला तयार झाला. आम्हीं ओझीं पाठों-गळीला मारलीं. घोडेवाला पुढें झाला. मागोमाग आम्ही निघालों. वाट बिलकूल दिसेना. पांच पंचवीस पावलें चालल्यानंतर मधून एखाद्या-वेळीं आकाश दिसावें व पुनः झाडींमध्यें लपून जावें, असें होत होतें. घोडेवाला माहीतगार होता, त्यामुळें आम्हीं मोठ्या कष्टानें दहा अकरा वाजतां खिंडींतून बाहेर पडलों. जवळच धनगरसड्याचा माळ होता, तेथें धनगरांच्या चार दोन झोंपड्या होत्या. त्यांच्या शेजारीं माळाव-रच आम्हीं मुक्काम केला. पहांटेला अतिशय वारा सुटला आणि थंडीनें आम्हीं कुडकुडून गेलों. आम्हांला जर पुढील वाट माहीत असती, तर आम्हीं तसेच पुढें चाललों असतों. आम्हीं घोडेवाल्याला घेऊन पुढें गेलों असतों, पण तो येईना. दिसूं लागलें तेव्हां आम्हीं पुढची वाट धरली. घोडेवाल्याला अधिक पैसे देऊन खूष करण्यालाहि आम्हां-जवळ कांहीं नव्हतें. सात आठ रुपये एकेकाजवळ होते. तेवढ्यांत परीक्षेची एक रुपया फी, साताऱ्यांत जितके दिवस रहावें लागेल तितक्या दिवसांची खाणावळ व प्रवासाचे सर्व खर्च भागवावयाचे होते. तेव्हां आम्ही सातारपर्यंत ठरलेलें भाडें देऊन त्याला परत लावलें. त्या बिचाऱ्याच घोडें त्याला परत मिळालें, कीं रानांतच त्याला कोणीं हिंस्र पशूनें खाऊन टाकलें, कीं अतिश्रमानें तें निजधामाला गेलें,

ईश्वर जाणें ! या बरोबरीच्या चार विद्यार्थ्यांपैकीं दोघे अजून हयात आहेत, त्यांपैकीं कोणाची गांठ पडली कीं, त्या प्रसंगाची आठवण होऊन त्यावर संभाषण सुरू होतें व अंगावर शहारे येतात !

आम्हीं त्या दिवशीं सकाळीं दहा वाजतां साताऱ्याला जाऊन पोहोंचण्याची जी खटपट केली. ती व्यर्थ गेली. आम्हांला साताऱ्याला पोहोंचण्याला संध्याकाळचे पांच वाजले. आमचे एक ग्रामस्थ तेथें कलेक्टराच्या कचेरींत कारकून होते, त्यांजकडे आम्हीं बिऱ्हाड ठेवलें व जेवण्याची सोय खानावळींत केली. परीक्षेला दोनतीनशें विद्यार्थी होते. त्यांचीं नांवें नोंदण्यांतच तो दिवस गेला होता, व खऱ्या परीक्षेला सुरवात झाली नव्हती. नांवें नोंदून झाल्यावर जर वेळ उरला, तर निबंध लिहावयाला देण्याची वहिवाट असे; पण या वर्षीं तसें झालें नव्हतें. हें ऐकून आम्हांला धीर आला. आमच्या ग्रामस्थांनीं परीक्षेच्या अध्यक्षांची गांठ घेतली व आमची हकीगत त्यांच्या कानीं घातली, तेव्हां आम्हांला परीक्षेला घेण्याचें त्यांनीं कबूल केलें. दुसऱ्या दिवशीं दहा वाजतां आम्ही परीक्षेच्या ठिकाणीं गेलों. मी नांव नोंदून घेण्यासाठीं पुढें झालों, तेव्हां माझी मूर्ति पाहिल्याबरोबरच त्या सर्वांना मी वय खोटें सांगतों, असें वाटलें. कमिटीनें माझ्याबरोबरच्या चार विद्यार्थ्यांचीं नांवें नोंदलीं, व मला परीक्षेला बसूं दिलें नाहीं. मीं शाळेतला वयाचा दाखलाहि नेला होता, पण त्याकडे कोणीं पाहिलें नाहीं. मी इतका ठेंगणा व कृश दिसे कीं, पंधरा वर्षांहून अधिक वर्षें मला खास नाहींत, असें कोणालाहि वाटावें. परीक्षकांना परीक्षा सुरू करण्याची घाई होती, तेव्हां त्यांनीं मजकडे अधिक लक्ष न देतां " तुला परीक्षेला घेत नाहीं, " असें मला सांगून ते पुढील उद्योगास लागले.

झालें, माझ्या सर्व आशेचा भंग झाला ! पुन्हां गांवीं परत जाऊन रिकामटेकडें हिंडत राहणें माझ्या कपाळीं आलें. मी भित्रा, मुखदुर्बळ म्हणून मला या वेळीं परीक्षेला घेतलें नाहीं. हा माझा भित्रेपणा व मुखदुर्बळपणा मला माझ्या आयुष्यांत पुष्कळ ठिकाणीं नडला, व अजूनहि नडतो.

# २४. केका

तुझ्या बहुत शोधिले अघनिधी पदांच्या रजें.
न तें अनृत, वर्णिती बुध जनीं सदाचार ज;
असें सतत ऐकते, सतत बोलते, मीच ते–
प्रमाण न म्हणों जरी, उचित माझिया नीचते. १

तसाचि उरलों कसा ! पतित मी नसें काय ! कीं–
कृपाचि सरली ! असें हि न घडे जगन्नायकीं;
नसेन दिसलों कसा ! नयन सर्वसाक्षी रवी;
विषाद धरिला म्हणों, न सुरभी विषक्षीर वी. २

सदैव नमितां जरी पद ललाट केलें किणें,
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें;
नतां करुनि मुक्तही म्हणसि ‘ मी बुडालों रिणें. ’
अशा तुज न जो भजे मनुज, धिक् तयाचें जिणें ! ३

तरेन तुमच्या बळें भवमहानदी, नाविका !
तुम्हीच मग आतरास्तव मला सुदीना विका.
असे विदित वासही मज सदाश्रमींचा; करा
दया, गुण पहा, सवे मज सदा श्रमीं चाकरा. ४

तुम्ही परम चांगले, बहु समर्थ, दाते, असे
सुदीन जन मी, तुम्हा शरण आजि आलों; असें
पुन्हांहि कथितों, बरें श्रवण ह करा यास्तव;
समक्ष किति आपुला सकललोकराया स्तव ! ५

समागम तुझा घडो, म्हणून जाहले लांकडें,
तपोऽनलिं तसे मुनि त्यजुनि, जोडिलीं माकडें;
अयुक्त बहु ज्या जनास्तव घडे पडे सांकडें,
तदुक्तिहुनि आमुचें बहुत बोलणें वांकडें ! ६.

न जें प्रिय, सदोष तें; प्रिय सदोषही चांगलें;
स्वतोक पितरां रुचे, जरिहि कर्दमीं रांगलें.
तुलाचि धरि पोटिशीं काशि तदा यशोदा बरें !
जरी मळविशी रजोमलिनकाय तूं अंबरें. ७

तुम्ही बहु भले, मला उमज होय ऐसें कथा;
कसा रसिक तो ? पुन्हा जरि म्हणेल आली कथा;
प्रतिक्षण नवीच दे रुचि शुकाहि संन्यासिया;
न मोहिति भवत्कथा अरसिका अधन्यासि या. ८

तुझें यशचि तारितें, परि न केवळा तारवे;
सहाय असिला असे, तरिच शत्रुला मारवे;
न भागवत भेटतां, न घडतांहि सत्संगती,
न अज्ञहृदयें, तशीं तव यशोरसीं रंगती. ९

सुसंगति सदा घडो; सुजनवाक्य कानीं पडो;
कलंक मतिचा झडो; विषय सर्वथा नावडो;
सदंघ्रिकमळीं दडो, मुरडितां हटानें अडो,
वियोग घडतां रडो, मन भवच्चरित्रीं जडो. १०

दयामृतघना ! अहो हरि ! वळा मयूराकडे;
रडे शिशु, तयासि घे कळवळोनि माता कडे;
असा अतिथि धार्मिकस्तुतपदा ! कदा सांपडे ?
तुम्हां जड भवार्णवीं उतरितां न दासा पडे. ११

## २५. शास्त्रांचा अभ्यास

विद्या, कला, वाङ्मय, इतिहास वगैरे ज्ञानाच्या शाखा अत्यंत महत्त्वाच्या आहेतच, परंतु शास्त्रज्ञानाचें महत्त्व सध्याच्या काळीं विशेष आहे हें प्रत्येक भारतवासीयानें लक्षांत बाळगणें जरूर आहे. शास्त्राभ्यास हा मोठमोठ्या कॉलेजांतून आधुनिक उपकरणांनीं सज्ज अशा प्रयोगशालांमध्येंच केला जातो व करणें शक्य आहे अशी कोणाची समजूत असल्यास ती सर्वस्वी बरोबर नाहीं. आधुनिक उपकरणें व विद्वान् अध्यापकांची मदत ह्या आनुषंगिक गोष्टी आहेत. ह्यांच्यामुळें सोय होईल. परंतु ज्ञान मिळविण्याची तीव्र इच्छा, दुर्लभ महत्त्वाकांक्षा व दांडगी चिकाटी ह्या गोष्टी ज्ञानसाधनाच्या कामीं खऱ्या महत्त्वाच्या आहेत. ह्या असल्या म्हणजे शास्त्राचा अभ्यास कशाही प्रतिकूल परिस्थितींत करतां येईल व बाह्य साधनेंही जरूर तेवढीं आपल्याला जुळवितां येतील. आजपर्यंत होऊन गेलेल्या कित्येक महान् शास्त्रज्ञांच्या जीवनवृत्तांतांवरून हीच गोष्ट दिसून येते कीं, शास्त्रज्ञ बनण्यास मोठ्या संपत्तीची किंवा विश्वविद्यालयीन शिक्षणाची जरूरी असतेच असें नाहीं. मोठमोठ्या शास्त्रज्ञांचें विद्यालयांतील शिक्षणावांचून अडलें नाहीं, पैशावांचून अडलें नाहीं, किंवा साधनसामग्री नाहीं म्हणूनही ते स्वस्थ बसले नाहींत. जगाच्या राजकीय इतिहासामध्यें प्याद्याचा फर्जी झाल्याचीं अनेक उदाहरणें आपण वाचतों. नेपोलिअन, आब्राहाम लिंकन, बाळाजी विश्वनाथ, हैदरअली, राम्से मॅक्डोनाल्ड इत्यादि उदाहरणें जगामध्यें केवळ कर्तृत्वाच्या जोरावर हीन स्थितींतून अत्यंत उच्च पदवीला कसें पोचतां येतें हें दर्शवितात. परंतु हाच धडा अधिक सात्त्विक रीतीनें शिकविणारीं उदाहरणें जगाच्या शास्त्रीय इतिहासांत कमी आहेत असें नाहीं.

विख्यात जर्मन ज्योतिषी केप्लर याचा लहानपणींचा वृत्तान्त हृदयास द्रव आणणारा आहे. त्याचा बाप हा कसा तरी जिकीरीनें संसार कर-

बापाला एक खाणावळवाला असून आई तर केवळ कर्कशा होती. बिचाऱ्या केप्लरला भांडीं विसळावयाचें काम त्या खाणावळींत करावें लागत असे. पुढें त्याची अलौकिक बुद्धि पाहून त्याच्या नातेवाईकांनीं त्याला विद्यालयांत धार्मिक शिक्षण घेण्यास पाठविलें. परंतु त्यानें त्याच्याकडे दुर्लक्ष करून गणित व ज्योतिष यांचा स्वतःच खासगी रीतीनें अभ्यास केला. विख्यात इंग्रज शास्त्रज्ञ सर हंफ्री डेव्ही हा तर तरुणपणीं एका खेड्यांतल्या डॉक्टराचा बाटल्या धुणारा कांपाऊंडर होता, व तेथें असतांनाच त्यानें शास्त्राचें अध्ययन करून नवीन प्रयोग करण्यास सुरवात केली. मायकेल फाराडे याची हकीकत याहूनही अद्भुत व स्फूर्तिदायक आहे. तो एका लोहाराचा मुलगा असून त्याच्या बापाला इतकी हलाखीची स्थिति आली होती कीं, पांच वर्षांच्या छोट्या मायकेलला एका पावावर एक आठवडाभर गुजारा करावा लागत असे! ज्याच्या अद्वितीय शोधांमुळें विद्युल्लता ही आपली वाटेल तें काम करणारी आज्ञाधारक दासी बनली आहे, त्याला लहानपणीं धड खावयाला मिळत नव्हतें, मग विश्वविद्यालयीन शिक्षण आणि इतर सर्व साधनसामग्री यांची गोष्ट तरी कशास काढावयास पाहिजे! पुढें फाराडे थोडा मोठा होतांच एका पुस्तकें बांधणाऱ्याकडे उमेदवार म्हणून राहिला; व तेथें पुस्तकें बांधण्याच्या कामाबरोबरच पुस्तकें—विशेषतः शास्त्रीय पुस्तकें—वाचण्याचें काम त्यानें इतक्या उत्सुकतेनें केलें कीं, विद्यालयीन तरुणांपेक्षां त्याचा ज्ञानसंग्रह किती तरी मोठा बनला. पुढें त्याची शास्त्रजिज्ञासा व मार्मिक अध्ययन डेव्हीच्या दृष्टीस पडलें व त्यानें त्याला आपल्या प्रयोगशाळेंत नोकरी दिली. झालें; किनाऱ्यावर पाण्याबाहेर तडफडणाऱ्या माशाला पाण्यांत नेऊन सोडावें त्याप्रमाणें फाराडेला झालें व तेथून पुढें त्याच्या अद्वितीय संशोधनकार्यास सुरवात झाली.

विकासवादाचा प्रणेता लामार्क हा तर प्रथम शिपाईगडी होता. पुढें लढाईतून जखमी होऊन आल्यानंतर त्यानें स्वतंत्रपणें वनस्पतींच्या

अभ्यास करण्यास सुरवात केली. पांच वर्षें हलाखीच्या स्थितींत घाल-विल्यानंतर 'फ्रान्समधील वनस्पति' हा त्याचा ग्रंथ जेव्हां प्रसिद्ध झाला तेव्हां इतर शास्त्रज्ञांचें त्याच्याकडे लक्ष जाऊन त्याला बरे दिवस आले. अशीं एक ना दोन किती उदाहरणें सांगावीं! शास्त्रज्ञांची चरित्र-मालिका अशा उदाहरणांनीं भरलेली आहे.

आपल्या हिंदुस्थानांतलें मनाला अत्यंत चटका लावणारें उदाहरण म्हणजे प्रसिद्ध गणिती रामानुजम् यांचें होय. हा बिचारा पदवीधर देखील नसून एका हपिसामध्यें साधा कारकून होता. परंतु काय त्याची बुद्धिमत्ता व चिकाटी! युरोपांतील धुरंधर पंडितांनाही जे सुटत नव्हते असे गणितांतील कूट प्रश्न त्यानें लीलेनें सोडविले. दुसरें महा-राष्ट्रांतील उदाहरण म्हणजे शंकर बाळकृष्ण दीक्षित यांचें. हे शाळामास्तर होते. त्यांनीं ज्योतिषाचा अभ्यास इतका उत्कृष्ट केला कीं, त्यांचें 'भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास' हें पुस्तक मराठी वाङ्मयांत तर अद्वितीय होऊन राहिलें आहेच परंतु तसें पुस्तक इतर देशी भाषांत किंवा इंग्रजींत देखील असेल कीं नाहीं याची शंका वाटते.

आतां शास्त्राभ्यासाच्या बाबतींत आपल्याकडे अडचणीही फार आहेत ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. प्रयोगशाला नाहींत, उपकरणें थोड्या खर्चांत मिळण्याची सोय नाहीं, व सर्वांत मुख्य गोष्ट म्हणजे स्वभाषेमध्यें उच्च दर्जाचें आजतागायत माहितीचें शास्त्रीय वाङ्मय नाहीं. या अडचणी आहेत खऱ्या; पण यांपैकीं कोणतीच दुर्लंघ्य नाहीं. इतर पुढारलेल्या देशांनीं बरोबर याच अडचणींतून आपला मार्ग काढला आहे. तेव्हां मुख्य अडचण बाह्य परिस्थितीची नसून आमच्या मानसिक शून्यतेची आहे. आमच्यांत जिज्ञासा नाहीं, उत्सुकता नाहीं व चिकाटी नाहीं. आमच्यांत शास्त्रीय विषयांची गोडी उत्पन्न झाल्यास जिल्ह्याच्या ठिकाणीं एकेक तरी शास्त्रीय चर्चामंडळ स्थापितां येईल. स्थानिक सभासदांना आपापसांत वर्गणी जमवून निवडक शास्त्रीय पुस्तकांचें

लहानसें ग्रंथालय निर्माण करतां येईल, कांहीं थोडीं उपकरणेंही जमा करतां येतील, अगर स्थानिक हायस्कुलांत किंवा कॉलेजांत बरींचशीं उपकरणें असल्यास त्यांचाही योग्य अटींवर उपयोग करून घेतां येईल. मानसिक शास्त्रें व सामाजिक शास्त्रें यांच्या अभ्यासास तर विशेष उपकरणांचीही जरूरी नाहीं. तात्पर्य, कांहीं तरी केलें पाहिजे अशी मनाची आंच किंवा तळमळ उत्पन्न झाल्यास पुढील मार्ग सुचतील.

# २६. भास

मी उठुन सकाळीं कामाला लागतें
पण वेळोवेळीं भासे मम चिमणें मज बाहतें !

मी भाजी चिरतां दचकोनी थांबतें
करिं हळुच धरोनी पातें मज गमे बाळ पाहतें !

मी थकुन दुपारीं धरणीवर टेकतें
निश्चिंतपणें तइं वाटे मजजवळ बाळ घोरतें !

मी कधीं दुपारीं डाळ गहूं निवडितें
खुडबूड कुठें तरि चालू बाळाची मज वाटते !

मी कधीं देऊळिं प्रदक्षिणा घालितें
भुरभूर माझिया मागें पण गमतें कुणी चालतें !

मी सायंतनिं वात जेधवां लावितें
मम चिमणें कर जोडोनी मजजवळ उभें भासतें !

या भासानें तर ऊर कसें दाटतें
नाशिबिचें सुख संपोनी गेलेंसें मज वाटतें !

# २७. कारकून

[ स्थळः-सरकारी कचेरी. एक मोठी खाली. चार कारकून काम करीत बसले आहेत. उजव्या हाताकडे असलेल्या खोलींतून टाइपरायटरचा आवाज ऐकूं येत आहे. पाठीमागच्या बाजूला एक मोठा दिवाणखाना असून त्यांतही बरेचसे कारकून काम करीत बसले आहेत. मधूनमधून पट्टेवाले वेताच्या टोपल्यांत कागद घेऊन व मध्येंच 'साऽऽब!' असें ओरडत इकडून तिकडे धांवत आहेत. डाव्या हाताकडे एक खोली असून तिचें दार अर्धवट उघडें आहे. दारावरच किंचित् वरच्या बाजूला 'रेकॉर्ड' अशी डोळे वटारून बघणारी पाटी दिसतच आहे. ]

केशवराव—( जांभई देऊन ) आ-य आई! छे बोवा, काय भयंकर उन्हाळा हो!

गोविंदराव—अरे तें कांहीं विचारूं नकोस! सारख्या डोक्यांतून अन् अंगांतून घामाच्या धारा चालल्या आहेत! हुश्श! हा, हा, हा!

केशवराव—नाहीं–पण यंदांचा उन्हाळा जरा जास्तच—

गोविंदराव—अरे चालायचेंच. दिवसेंदिवस उन्हाळा आतां जास्तच कडक येत जायचा. कारण—

अप्पासाहेब—डॅम! कोठलीं निब्स आणलीं आहेत कोणाला ठाऊक! जसे कांहीं नांगर!

केशवराव—अहो, नांगरच नाहींतर काय! अक्षरसुद्धां धड येत नाहा. अप्पासाहेब, हें निब् पहा बरें कसें काय चालतें तें! हें माझें आपलें खासगी आहे हो!

पट्टेवाला—( आंत येऊन ) हं दिनकरपंत, हें स्टेट्मेंट घ्या. नानासाहेबांनीं सांगितलें आहे कीं, आजच्या आज तयार करून मिळालें पाहिजे! समजलें का?

दिनकरपंत—अरे, पण हें आजच्या आज होणार कसें?

पट्टेवाला—तें मला नाहीं ठाऊक. नानासाहेबांनीं सांगितलें कीं, आजच्या आज—

दिनकरपंत—आधींच काम किती पडलें आहे, आणखी—

पट्टेवाला—ही कुरकूर माझ्याजवळ कशाला करतां? साहेबांनीं सांगितलें, मीं आणून दिलें. करा, नाहीं तर तिकडे फेंकून द्या.

[ निघून जातो. ]

गोविंदराव—खरेंच, बाकी काम पुष्कळच पडलें आहे. आणि स्टेट्मेंटहि कांहीं लहानसहान नाहीं!

केशवराव—अहो, तुम्हांला ठाऊक नाहीं? पंतांचें अक्षर चांगलें आहे, अन् ते काम फार काळजीपूर्वक करतात, म्हणून साहेबांची त्यांच्यावर इतकी मर्जी आहे! आपल्यासारखें थोडेंच आहे! बोलून-चालून आळशी माणसें आम्ही!

गोविंदराव—हं:, चांगली मर्जी आहे अन् काय! एखाद्या माणसाचें अक्षर चांगलें आहे, अन् तो काळजीनें काम करतो, म्हणून त्याच्यावर उगीच वरच्यावर कामाचा बोजा लादणें, ही तुमची चांगली मर्जी आहे बुवा!

केशवराव—अजून ते रुळले नाहींत. येऊं दे, त्यांना एकदा अनुभव येऊं दे, म्हणजे आपसूखच येतील ताळ्यावर.

गोविंदराव—तें कसें काय बुवा?

केशवराव—अरे, नोकरी म्हटली कीं, आपण होऊन जीव तोडून उगीच भरधांव धांवूं नये, हें अजून त्यांना कळलें नाहीं! मी म्हणतों केलें—छाती फुटेपर्यंत काम केलें! फायदा काय आहे? पैशाच्या नांवानें तर बाजा!

गोविंदराव—अरे, अंमळ हळू बोल, अप्पासाहेब ऐकतील. केव्हांचा तो एक कागद घेऊन बसले आहेत!

केशवराव—मजा आहे अन् काय! जाऊं दे! आपल्याला काय करावयाचें आहे त्यांच्याशीं? ( बरेचसे कागद टेबलावर इकडे तिकडे

पसरून ) आतां कांहीं तरी काम करायला लागलें पाहिजे. नाहींतर आपल्याहि गळ्यांत एखादें घोंगडें यायचें ! हो, करतां काय ?

गोविंदराव—( आपल्याशीं ) सारखें खालीं मान घालून काम करितो आहे. जरा अंमळ मदत करूं का ?–पण नको ! आज एकदां मदत केली, तर रोज उठून कटकट लागायची पाठीमागें !

केशवराव—काय पंत, घड्याळाकडे काय पहातां ?

दिनकरपंत—कांहीं नाहीं, सहज किती वाजले तें पाहिलें. ( आपल्याशीं ) साडेपांच तर आतांच झाले. आज कांहीं आठांच्या आंत घरीं जायला सांपडत नाहीं ! हें तर काय रोजचेंच आहे. घरीं तर--चूप ! आतां उगीच गडबड नको करूंस.

अप्पासाहेब—( कांहीं काळानें ) साहेब गेले का हो ?

केशवराव—हो केव्हांच ! ते तर साडेचार वाजतांच गेले. आपण कामांत होतां, म्हणून आपल्याला समजलें नाहीं. अप्पासाहेब, सहा वाजायला आले.

अप्पासाहेब—येऊं दे रे ! पण हो, आज तुम्हांला आनंदाची एक बातमी समजली कां ?

केशवराव—ह्यः ! ह्यः ! ती कोणती अप्पासाहेब ?

अप्पासाहेब—काय ठाऊक नाहीं ? काय गोविंदराव, तुम्हांला कांहीं माहीत नाहीं ?

गोविंदराव—नाहीं बुवा, मला कांहीं समजलें नाहीं.

केशवराव—अहो , नाहीं तर आमच्या पंतांना ठाऊक असेल. काय पंत ?

अप्पासाहेब—अरे त्याला कोठली ठाऊक असायला ? आपल्या साहेबांना प्रमोशन झालें ! समजलें कां ?

केशवराव—अस्सें ! पण तें किती ?

अप्पासाहेब—किती म्हणजे ? बाराशेंचे अठराशें आणि शिवाय भत्ता.

गोविंदराव— चैन झाली अन् काय !

अप्पासाहेब— बाकी आपला साहेब हुषार माणूस आहे म्हणा !

केशवराव— हो तर ! यांत काय संशय ? प-ण काहो अप्पासाहेब, आमच्या पंतांना नाहीं कां, कांहीं मिळालें ? अहो ते कवि आहेत !

दिनकरपंत— असं काय कांहीं तरी बडबडतां हो ?

केशवराव— अरे वा ! मोठे चमत्कारिकच दिसतां ! काय बडबडलों हो ?

गोविंदराव— इशूक ! गप बसा–नानासाहेब आले.

केशवराव— येईनात आले तर ! कांहीं अक्कल आहे कीं नाहीं ?

दिनकरपंत— चूप रहा !

नानासाहेब— ( आंत येऊन ) सायलेन्स ! काय गडबड आहे ? अप्पासाहेब, अहो हें डायरेक्टर जनरलचें प्रकरण कमिशनरकडे काय म्हणून गेलें ?

अप्पासाहेब— पाहूं, पाहूं बरें. ( प्रकरण हातांत घेऊन पाहूं लागतो. )

नानासाहेब— अहो, साहेब किती ओरडत होते ! काम नीट होत नाहीं अन् कांहीं नाहीं. हपीसांत गोंधळ माजला आहे म्हणून ! हें काय हें ?

अप्पासाहेब— हं, आतां आलें लक्ष्यांत. दिनकरपंत, इकडे या पाहूं.

नानासाहेब— कोणाची ? यांचीच चूक कां ?

अप्पासाहेब— हो, तुम्हीं हें प्रकरण डी. जी. कडे पाठवावयाचें सोडून कमिशनरकडे काय म्हणून पाठविलेंत ?

दिनकरपंत— ( प्रकरण पाहून ) साहेब, आपण पत्ता तर कमिशनरचा—

नानासाहेब— अहो, नुसतें पत्त्याचें काय घेऊन बसलां आहांत ? मजकूर नको कां वाचून पाहायाला ? असे कसे डिस्पॅच करतां तुम्ही ?

अप्पासाहेब— जा ! पुनः अशी चूक करूं नका. नीट केअरफुली— कळकळीनें काम करीत जा—समजलें ?

केशवराव— अहो, आधीं तें स्टेटमेंट्र तयार करा, आणि मग—

नानासाहेब— काय ? तें अजून तयार झालें नाहीं ? शाबास !

दिनकरपंत—साहेब,—

नानासाहेब— काय, साहेब काय ? आजच्या आज तें तयार व्हायला पाहिजे, असें सांगून पाठविलें होतें, आणि तुम्ही तर—कां हो अप्पासाहेब, तुम्ही तर यांची मोठी शिफारस केली होती कीं, हे फार काळजीनें काम करणारे आहेत म्हणून ! पण हे अगदीं सुस्त दिसतात. तें कांहीं नाहीं. आतांच्या आतां तें स्टेट्मेंट तयार करून साहेबांच्या बंगल्यावर रवाना झालेंच पाहिजे.

दिनकरपंत— साहेब, टपालच अजून किती— ( अप्पासाहेब डोळ्यानें खुणवितो. )

नानासाहेब —काय ? टपाल अजून शिल्लक आहे ? हपीसांत भांडणें करा, म्हणजे काम होईल लवकर ! वर तोंड करून बोलायला कांहीं वाटत नाहीं ! दिनकरपंत तुम्हांला अजून कायम व्हायचें आहे, हें लक्ष्यांत ठेवा.

केशवराव— ( मनांत ) खाशी-छान झाली !

पट्टेवाला— ( आंत येऊन ) साहेब, बाहेर टांगा उभा आहे.

नानासाहेब— अरे हो, खरेंच कीं ! चला अप्पासाहेब येतां का ?

अप्पासाहेब—हो, हो ! चला कीं. माझी तयारी आहे. दिनकर-पंत, आजच्या आज सगळें टपाल आणि तें स्टेट्मेंट तयार करून मग घरीं जा बरें !

नानासाहेब— काम पाहिलें तर कांहीं नाहीं, पण गोंधळ किती ? कां हो अप्पासाहेब, आपल्या वेळेला तर याच्या तिप्पट होतें.

अप्पासाहेब— ह्यः ! ह्यः ! ह्यः !

नानासाहेब— पण आपल्याला त्याचें कांहींच वाटत नसे. पांचांच्या आंत पार फडशा ! चला येतांना ? ( जातो. )

अप्पासाहेब— हा आलोंच-सुपीरियरशीं कसें बोलावें, हें सुद्धा अजून समजत नाहीं तुम्हांला ? केशवराव, जरा त्यांना मदत करा हो. ( जातो. )

केशवराव—होय साहेब-काय दिनकरपंत, पाहूं काय काय—

गोविंदराव—( सगळें आंवरून ठेवून ) चला आपण कशाला उगीच बसा ? ( जाऊं लागतो. )

केशवराव—कां हो ? निघालां कां ? थांबा, मी येतों ना ? ( डोक्याला रुमाल बांधूं लागतो. ) अहो, आज घरांत अडचण आहे, का-य तरी एकएक-चला ! ( जातात. )

दिनकरपंत—( आपल्याशीं ) असें वाटतें कीं-स्स् ! ( दांतओंठ खातो.) आहाहाहा ! डोकें कसें पेटून गेलें आहे ! ( काम करूं लागतो. ) जिवा ! तुला अजून कायम व्हायचें आहे. तुला अजून—हुं: !—कायम व्हायचें आहे ! येऊं दे, लागतील तितके अश्रूंचे लोटचे लोट येऊं देत ! पण दुःखाची इतकी आग भडकली आहे कीं, ते पार करपून--हुश्य ! ( काम करूं लागतो. ) तूं काय समजला आहेस ? जरूर नाहीं त्या नोकरीची !--हो ! बेटा, हो, हो ! अजून तुला कायम व्हायचें आहे ! हं: हं: !

( काम करूं लागतो. दार वाऱ्यानें खाडकन् बंद होतें. )

—२—

[ स्थळः—सरकारी जनरल हॉस्पिटलमधील एक खोली. हिची लांबीरुंदी साधारण वीस फूट आणि उंची जवळजवळ पंधरा फूट असेल. भिंतीला फिक्कट हिरवा रंग दिलेला आहे. उजव्या हाताशीं असलेल्या भिंतीला दोन मोठ्या खिडक्या आहेत. पण त्यांच्या तावदानांला ज्या कांचा बसविलेल्या आहेत त्या

उजेडाशिवाय पलीकडचें कांहींच दाखवीत नाहींत. समोरच्या भिंतीला दार नाहीं आणि खिडकीहि नाहीं. आंत शिरण्याचें दार आहे, तें डाव्या हाताकडील भिंतीला असून अलीकडच्या कोपऱ्यांत आहे. दार चांगलें मोठें असून, त्याचीं तावदानें सुद्धां खिडकीसारखींच आहेत. या भिंतीला देखील खिडकी वगैरे कांहीं नाहीं. याच भिंतीला लागून दाराच्या पलीकडे सहा फूट लांबीचा एक पाठीचा बांक ठेवलेला आहे. त्याच्याच पलीकडे कोपऱ्यांमध्यें एक लहानसें टेबल आहे. चार-पांच औषधांच्या बाटल्या, कांचेच्या लहान लहान नळ्या वगैरे जिनसा त्यावर व्यवस्थित रीतीनें मांडून ठेवल्या आहेत. तसेंच उजव्या हाताकडच्या कोपऱ्यामध्यें एक वॉशिंग् स्टँडहि ठेवलेला आहे. मध्यभागीं जें एक टेबल दिसत आहे, त्याच्यावर लिहिण्याचें सामान, सरकारी कागदपत्रें व पुस्तकें, तसेंच वैद्यकीय विषयाचे भले मोठ दोनतीन ग्रंथ असें सामान मोठ्या टापटिपीनें ठेवलेलें आहे. पलीकडे जवळच एक चांगली खुर्ची आहे. वैद्यकीय ज्ञानाच्या भारदस्तपणाला, व तद्विषयक पंडितांच्या गंभीर अभिरुचीला अनुसरून खोलीमध्यें तसबिरीहि लावलेल्या नाहींत, व टेबलावर फ्लावरपॉटमध्यें जो पुष्पगुच्छ ठेवलेला आहे, तोहि सुवासिक फुलांचा ठेवलेला नाहीं. समोरच्या भिंतीला डोळे तपासण्याच्या अक्षरांचा, व एक ठिपक्यांचा असे दोन नकाशे लटकावलेले आहेत. ]

पट्टेवाला—( आंत येऊन ) या इकडे. इथें या बांकावर बसा. कोठून—पोस्टखात्याकडून आलांत का ? ( गोविंदराव आंत येऊन बांकावर बसतो. )

गोविंदराव—हो, पोस्टखात्याकडूनच.

पट्टेवाला—( टेबलावरील सामान इकडेतिकडे हलवीत व पुन: जागच्या जागीं ठेवीत असतां ) तुमचें पाकीट कोठें आहे पाहूं ?

गोविंदराव—काय पाकीट ?

पट्टेवाला—हो पाकीटच ! तुम्हांला नीट ऐकायला येत नाहीं वाटतें ? ( गोविंदरावानें दिलेलें पाकीट टेबलावर ठेवून ) असें करून चालायचें नाहीं. नाहीं तर एकदम अन्‌फिट्ट व्हाल ! ( टेबलावरील बाटल्यांत औषधें आहेत

किंवा नाहींत हें पहात असतां ) माझ्याशीं बोलतांना जर तुम्ही असें करतां, तर मग साहेबांशीं कसें होईल ? पार घाबरून जाल !

गोविंद्राव—( आसपास एकदां सगळी खोली पाहून ) सिव्हिल सर्जन साहेबांची हीच खोली वाटतें ?

पट्टेवाला—नाहीं, नाहीं ! ही नाहीं. ही अशिश्टंड साहेबांची खोली आहे. थोरल्या साहेबांची पलीकडे आहे.

गोविंद्राव—अस्सें ! पण काय हो, डोळे तपासायचा हाच—

पट्टेवाला—हो, हाच तो कागद. उठा, त्या तिथें उभे रहा पाहूं ! जरा पुढें ( गोविंद्राव सांगितल्या ठिकाणीं उभा राहतो ). बस् ! डाव्या डोळ्यावर एक हात ठेवा. आतां सांगा हे ठिपके किती आहेत ते ?

गोविंद्राव—एक–दोन—

पट्टेवाला—असें मोठ्यानें मोजायचें नाहीं. एकदम सांगा—आतां ?

गोविंद्राव—आठ.

पट्टेवाला—हे ?

गोविंद्राव—चा—चार.

पट्टेवाला—असें चांचरत सांगायचें नाहीं. आतां उजवा डोळा झांका. ( गोविंद्राव उजवा डोळा झाकतो. ) हे किती ठिपके आहेत ? लवकर !

गोविंद्राव—नऊ.

पट्टेवाला—अस्सें–हे किती ?

गोविंद्राव—सहा.

पट्टेवाला—( मान हालवीत ) आहे ! फिट् व्हायला कांहीं हरकत नाहीं. बसा. आतां आमचे साहेब येतील.

गोविंद्राव—त्यांची यायची वेळ झाली वाटतें ?

पट्टेवाला—हो–झालीच म्हणायची. बाकी मी आधीं तुमचे डोळे पाहिले म्हणून बरें झालें !

गोपाळराव व अनंतराव--(एकदम आंत येऊन) हेच असिस्टंट–

पट्टेवाला—हो, हेच अशिस्टंट्ट साहेबांचें हपसि. पण तुम्ही एकदम कसे आंत शिरलांत, आधीं विचारल्याशिवाय? बसा त्या बांकावर (गोपाळराव व अनंतराव बांकावर बसतात तोंच) तुमचीं पाकिटें आणा पाहूं?

पो० शिपाई—तुम्ही कोठून आलांत? (पट्टेवाला पाकिटें टेबलावर ठेवतो.)

गोपाळराव— फॉरेस्ट् डिपार्टमेंट्.

(हणमंतराव व दिनकरपंत आंत येतात. बांकावर बसलेले तिघेजण उभे राहातात व लगेच खालीं बसतात.)

हणमंतराव—पण तुम्ही इतके उशीरां कां आलांत? आतां साहेब येतील.

दिनकरपंत—घरीं मुलगा फार आजारी–

हणमंतराव—(टेबलावर दिनकरपंतांचें पाकीट आपटून) तें खरें! पण हें सरकारी काम आहे ना? साहेब तुम्हांला पहिल्यानें तपासणार आहेत–बसा त्या बांकावर. (दिनकरपंत बांकावर बसतो. ठण् ठण् असे मोठ्यानें घड्याळाचे ठोके पडतात.) अरे आठ वाजले. आतां साहेब येतील. (पट्टेवाला व शिपाई आपले कपडे झाडून नीट ताठ उभे राहातात. बांकावर बसलेली मंडळी नीट सांवरून बसतात. सगळेजण दाराकडे पहातात. पोलिस शिपाई दाराकडे पाहून हळूच 'साब आया' असें म्हणतो. इतक्यांत बुटांचा आवाज होतो, सर्वजण उभे राहतात, व स्ट्रिंगमन्साहेब आंत आल्याबरोबर त्याला सलाम करतात. साहेब खुर्चीवर बसतात. सर्व मंडळी उभीच राहतात.)

स्ट्रिंगमन—(टेबलावरील पाकिटें फोडून वाचल्यावर वर पाहून) आज काय चार माणसें तपासायचीं आहेत? (पुन: कागदाकडे पाहूं लागतो.)

हणमंतराव—होय साहेब. चार–

स्ट्रिंगमन—नो! आज मला इतका वेळ नाहीं. पोटाचें तें ऑपरेशन करायचें आहे, तर-डिनकर कोण आहे?

हणमंतराव—डिनकर कोण तुम्ही का? हे डिनकर (बोटानें दाखवतो.)

स्ट्रिंगमन—मी फक्त आज याच माणसाला पाहीन. बाकीच्यांना उद्यां यायला सांग—( दुसरे कागद पाहूं लागतो. )

हणमंतराव—( गोविंदराव, गोपाळराव व अनंतराव यांना ) आज साहेबांना वेळ नाहीं. पुनः तुम्ही उद्यां या. दिनकरपंत, तुम्ही जाऊं नका. तुम्ही बसा.

गोपाळराव—उद्यां किती वाजतां, आठांच्या सुमाराला ना ?
( जाऊं लागतात. )

हणमंतराव—नो ! नो ! बरोबर साताला या.

[ तिघेजण जातात. ]

स्ट्रिंगमन—सिपॉय ?

पो० शिपाई—साब् !

स्ट्रिंगमन—हें पाकीट बडा साबकू देव. ( शिपाई 'अच्छा साब' म्हणून जातो. ) डावा हात अधू असलेल्या माणसाचा अनफिट् कागद पाठविला ?

हणमंतराव—होय साहेब कालच पाठविला. ( मनांत ) तो तर तसाच विसरून राहिला वाटतें त्या खणांतच !

स्ट्रिंगमन—गेट् अप् ! ( खिशांतून ठिपक्यांचे कागद काढतो, व समोरच्या भिंतीजवळ जाऊन उभा रहातो. )

हणमंतराव—( दिरकनपंतांला ) हं, इथें उभें रहा. ( दिनकरपंतांचा डावा डोळा झांकून ) सांगा किती ठिपके—?

स्ट्रिंगमन—( कार्ड दाखवून )किती ?

दिनकरपंत—( मनांत ) बरोबर दिसत नाहीं !—चार.

स्ट्रिंगमन—( दुसरें कार्ड दाखवून ) हे किती ?

दिनकरपंत—पांच.

स्ट्रिंगमन—ऑल् राइट् ! आतां डावा डोळा. ( हणमंतराव दिनकरपंताचा उजवा डोळा झांकतो. कार्ड दाखवून ) हे किती !

दिनकरपंत—( मनांत ) अरे ! यानेंहि ! —तीन.

स्टिंगमन--( दुसरें कार्ड दाखवून ) हे किती ?

दिनकरपंत--सहा. ( साहेब खुर्चीवर जाऊन बसतात. )

पट्टेवाला--स्वारी डोळयांत तर गचकली !

स्टिंगमन--( दिनकरपंतांना ) इकडे या. तुम्हांला बरोबर दिसत नाहीं. हपीसांत किती दिवस काम करीत आहां ?

दिनकरपंत--साहेब, जवळजवळ वर्ष झालें.

स्टिंगमन--तुम्हाला तर दिसत नाहीं ! मग काम कसें करतां ?

दिनकरपंत--तसेंच !

स्टिंगमन--पाहूं ? ( दिनकरपंतांचे डोळे कांहीं वेळ पाहून ) अच्छा ! कपडे खोलो.

हणमंतराव--अंगांतले कपडे काढा. ( दिनकरपंत कपडे काढून बांकावर ठेवतो. )

स्ट्रिंगमन --( छाती ठोकून पहातो, छातीला नळी लावून कांहीं वेळानें ) व्हेरि बॅड्-बोहोत खराब ! ( पोट दाबून पहातो. ) हूं: ! हें काय ? पाणथरी आहे. जाव ! ( खुर्चीवर जाऊन बसतो, व कागदावर लिहूं लागतो. )

हणमंतराव-- तुम्ही कपडे घाला.

दिनकरपंत--( कपडे घालीत असतां मनांत ) मी कुठें आहे ? ( शून्यदृष्टीनें पाहूं लागतो. )

स्टिंगमन--(लिहिलेला कागद पाकिटांत घालून तें हणमंतरावाजवळ देतो. ) बंद करून त्याच्याजवळ दे आणि सही घे. ( दुसरे कागद वाचूं लागतो. ) अलीकडे असें काय व्हायला लागलें आहे कुणाला ठाऊक ? खराब प्रकृतीचींच माणसें फार !

हणमंतराव--( पाकिट चिकटवून व टपालबुकांत नोंदून ) इकडे या पाहूं-इथें सही करा. तुमचा हात किती कांपत आहे ? सावकाश. ( दिनकरपंत सही करतो. )

स्टिंगमन--( दिनकरपंताकडे पाहून मनांत ) पूअर मॅन !

[ जातो. ]

दिनकरपंत—( पाकीट हातांत घेऊन ) हें कां हपीसांत नेऊन द्यायचें?

हणमंतराव—होय. थांबा, जाऊं नका, आणखी या बुकांत एवढी नोंद–( दुसऱ्या एका पुस्तकांत कांहीं लिहूं लागतो. )

दिनकरपंत—( पुस्तकाकडे पाहून ) आटपला बाजार ! मरेमरेपर्यंत अभ्यास केला, छाती फुटेपर्यंत काम केलें. देवा ! आतां मी कुठें—? बाहेर ! बाहेर ! इथें नाहीं !

हणमंतराव—हं, जा आतां. ( दिनकरपंत छत्री घेऊन जातो. )

पट्टेवाला—काय झालें साहेब ?

हणमंतराव—व्हायचें काय ? अनफिट्ट झाला अन् काय ?

पट्टेवाला—हं: !

हणमंतराव—बरें, हें पुस्तक घेऊन माझ्याबरोबर चल.

[ दोघेहि जातात. ]

—३—

[ स्थळ:—दिनकरपंतांचें बिऱ्हाड. त्यांची उठण्याबसण्याची व निजण्याची दोन खणांची खोली. तिच्या पाठीमागेंच एक दोनखणी स्वयंपाकघर आहे. त्यांत अंधार असल्यामुळें फारसें दिसत नाहीं. पण राखेनें दडपून टाकलेला चुलींतील विस्तव मधूनमधून मोठ्या कष्टानें डोकावत आहे. रात्र एकसारखी ओरडतच आहे. दिनकरपंतांच्या खोलींत एक राकेलचें डबडें धूर ओकीत एका कोंपऱ्यांत बसलेलें आहे. जवळच एक घडवंची आहे. तिच्यावर धान्याचे डबे वगैरे पुष्कळच सामानसुमान रचलेलें आहे. भिंतींना जागजागीं खिळे ठोकलेले असून त्यांवर मुलांचे अर्धवट फाटलेले कपडे; मळक्या व फाटलेल्या टोप्या, एकदोन जुनेरीं लुगडीं, वगैरे पांघरुणें, चिरगुटें कशींतरी जुलमानें अडकवून ठेवलेलीं आहेत. जमिनीवर मध्यभागीं फाटलेल्या दारिद्र्यांत गुरफटून तीन माणसें निजलेलीं आहेत. दिनकरपंतांची बायको यमुनाबाई ही जवळ जवळ तेवीस वर्षांची दिसत आहे. तिच्या उजव्या हाताला जवळच सखाराम नांवाचा आठ नऊ वर्षांचा मुलगा तापानें कण्हत व मधून मधून बडबडत पडलेला असून त्याच्या उशाशींच एकदोन औषधांच्या बाटल्या व पुड्या पडलेल्या आहेत. धाकटा मुलगा त्रिंबक हा पांचसहा वर्षांचा असून आपल्या आईजवळ

डाव्या बाजूला निजलेला आहे. खोलीला वरच्या बाजूला पटई वगैरे कांहीं नाहीं नुसतें कौलारू छप्पर आहे. दिनकरपंतांचें हें बिऱ्हाड एका मोठ्या वाड्याच्या मागच्या आवारांत असून, जमिनीला थोडेंसें ओल आहे. आंत शिरण्याचें दार उजव्या हाताकडच्या भिंतीला दिसतच आहे. ]

[ सुंदराबाई — घराची मालकीण. ]

सुंदराबाई—( आंतून ) हा कोण मेला रोज उठून कहर ? आपल्या बायकोला ताकीद करा. रोज उठून तुम्हांला कड्या काढाव्या कुणीं ?

दिनकरपंत—( बाहेरून ) रोज कधीं बरें काढतां तुम्ही ? आजच कुठें जरा उशीर—

सुंदराबाई—( आंतून ) अहो, म्हणून काय झालं ? रोजचा तुमचा हांका मारण्याचा सपाटा असतो कीं नाहीं ? लोकांची झोंपमोड नाहीं होत?

दिनकरपंत—( बाहेरून ) बरें, मी आज—

यमुनाबाई—अगबाई ! यायला झालं वाटतं ? (दाराची कडी काढते.)

सुंदराबाई—मेली झोंप कां काय ही ? यमुनाबाई !

(दिनकरपंत आंत येतात, व कपडे काढूं लागतात.)

सुंदराबाई-( आंतून ) शंभरदा सांगितलं कीं, रोजचा हा तुमचा कहर नको म्हणून ! रहायचं असेल तर नीट रहावं, नाहींतर खुशाल दुसरीकडे सोय करावी. आम्हांला नाहीं सपायचं हें ! सांगून ठेवतें !

यमुनाबाई-( घरांत येऊन ) रोज उठून मेलं तेंच !

दिनकरपंत—अग चालायचेंच ! आपलें ऐकून घ्यावें झालें.

यमुनाबाई:-ऐकून काय घ्यावं ? वाड्यांतील सगळीं माणसं नांवं ठेवतात कीं, ही जर रोज असं बोलते, तर तुम्हीं तरी इतकं कां सोसून घेतां ?

दिनकरपंत:-कां सोसून घेतां ? बोलूनचालून आपण भिकारी माणसें. पाहिजे कशाला एवढी ऐट ?

यमुनाबाई:—हो ! असं म्हटलं म्हणजे झालं ?

दिनकरपंत:-मग आतां त्याला काय करायचं ? लोकें बोलली-मी म्हणतों वेळेनुसार त्यांनीं लाथा जरी मारल्या-तरी आपल्याला त्या

सोसायला पाहिजेत! सोशीकपणा, कोडगेपणा, अगदीं लोंचटपणा दाखविल्याशिवाय आपल्याला खायला एक तुकडासुद्धा मिळायचा नाहीं! हें पोट!–( हुंदका देतो. )

यमुनाबाई:—अगबाई! एकदम असं रडायला काय झालं? ( जवळ जाते. )

दिनकरपंत:—हं–हं! पगार मिळणार पंधरा रुपडे! आणि गांवांत तर दहा आणे बारा आणे खणाखालीं जागा मिळत नाहीं. आणूं कुठले? ( पुन: रडूं लागतो. )

यमुनाबाई:—पुरे गडे, आज हें काय आरंभलं आहे भलतंच? ( पदरानें डोळे पुसूं लागते. )

दिनकरपंत:—बरें, दुसरें कांहीं करीन म्हटलें, तर रोज रात्रीं आठ-आठ–नऊनऊपर्यंतच्या कामानें सचून, अगदीं मेल्यासारखें होऊन जातें!

यमुनाबाई:—दुसरीकडे नाहीं कां कुठं जमण्यासारखं ?

दिनकरपंत:—कुठें दुसरीकडे? तुला कीं नाहीं ठाऊक नाहीं. एकादी जागा रिकामी आहे असें कुठें ऐकायचा अवकाश कीं, त्या एका जागेसाठीं दुष्काळानें खवखवलेलीं, माझ्यासारखीं शंभर कुत्रीं धापा टाकीत येतात. बरें त्यांत पुन: वशिला! खरोखर. या वशिल्यानें तर माणसाला अगदीं भंडावून सोडलें आहे. प्रत्येक गोष्टींत मला वाटतें, ईश्वराच्या घरीं आपण चांगला वशिला लावला नाहीं, म्हणून या दारिद्र्याच्या–हाडेंन् हाडें पिळून काढणाऱ्या या दारिद्र्याच्या पोटीं– ( पुन: रडूं लागतो. )

सखाराम:—( किंकाळून उठतो. ) आई!

यमुनाबाई:—गडे पुरे आतां? असं काय अगदीं पोरासोरासारखं? ( सखारामाजवळ जाते. ) सखाराम, बाळ, आतांपर्यंत अंमळ बरी झोंप लागली होती. पुन: आणखी—

दिनकरपंत:—( सखारामाजवळ जाऊन ) सखाराम!

सखाराम:—( तापांत बडबडतो. ) मास्तर—मास्तर मी तुमच्या पायां पडतों ! नादारी द्या ! माझा बाप गरीब आहे हो ! ( पुनः किंचा-ळतो. ) आई !

दिनकरपंत—हा ! हा ! हा ! डोकें कसें—

सखाराम :—आई !—पाणी—

दिनकरपंत—तहानेनें त्याचा जीव कासावीस होत आहे ग !

यमुनाबाई—पण पाणी द्यायचं कसं त्याला ? हें दूध देतें म्हणजे झालं. सखाराम, हें दूध घे बाळ. ( त्याच्या तोंडाशीं दुधाची वाटी धरते.)

सखाराम:—असेना फाटका कोट—मला चालतो. आई !—

यमुनाबाई:—बरं, हें दूध घे आतां. ( त्याच्या तोंडांत दूध ओतते. )

दिनकरपंत:—दूध तर अगदीं थोडें आहे ग ! आतां हें एवढेंसें दूध त्याला रात्रभर कसें पुरणार ? थोडेंसें जास्ती कां नाहीं घेतलेंस ?

यमुनाबाई—घेऊं कुठून ? पावशेरापुरतेच जर मजजवळ पैसे—

दिनकरपंत—( मनांत ) पैसा !—

सखाराम—मी नाहीं खेळायला येत जा ! मघाशींच गाडीखालीं सांप-डून एक मुलगा मेला. अण्णा, अण्णा ! बाजूला व्हा.

यमुनाबाई—अगबाई ! पाहिलं ना यानं कसे डोळे फिरवले ? मला बाई ! ( डोळ्यांना पदर लावून रडूं लागते. )

दिनकरपंत—नको रडूंस ! आपण तरी काय करणार ? जें व्हायचें असेल तें,--

सखाराम—आई ! पाणी !

दिनकरपंत—कां उगीच त्याला तहानेनें मारते आहेस ? पिऊं दे पाणी त्याला.

यमुनाबाई—नका हो—असं काय ? ( त्यांच्या हातांतून भांडें हिसकावून घेते. ) आपण कीं नाहीं—मी राधाबाईकडे जाऊन आतां दूध घेऊन येतें.

दिनकरपंत—बरें तर लवकर ये. पण त्या निजल्या असतील, तर—

सखाराम—आई ! आई !

यमुनाबाई—आलें बरें बाळ. ( हातांत भांडें घेऊन जाते. )

दिनकरपंत—( आपल्याशीं ) यमुने, या अभाग्याच्या घरांत पाऊल टाकण्यापूर्वी विवाहस्थितीचीं जीं जीं म्हणून गोड स्वप्नें आपल्या हृदयांत सांठविलीं होतींस, त्यांपैकीं एक तरी खरें झालें आहे कां ? हं—

सखाराम—अहो, अहो ! मला कामाला ठेवतां का ? आई !

दिनकरपंत—सखाराम ! सारखी मान हलवतो आहे. तहानेनें याचा जीव कसा अगदीं कासाविस झाला आहे !

( पाण्याचें भांडें हातात घेऊन )

सखाराम—आ--आ !

दिनकरपंत—पाजतोंच हें पाणी. काय हरकत आहे ?–पण नको !

सखाराम—( आंचके देतो ) आ–आई !

दिनकरपंत—अरेरे रे ! काय बिचाऱ्याचे हाल होत आहेत हे !– सखाराम, हें घे बाळ पाणी. ( पाण्याचें भांडें मुलाच्या तोंडाशीं नेतो. ) काय ? ‘ मुलाला मारूं नकोस–पाणी पाजूं नकोस ! ’ म्हणून कोण ओरडलें आतां ?

सखाराम—अण्णा !

दिनकरपंत—ओ बाळ ! पाणी पाहिजे ? ( पुनः भांडें तोंडाशीं नेतो. ) पी ! थोडें कां ? चांगलें पोटभर पी !–( पाण्याचें भांडें बाजूला ठेवून ) आतां जरा अंमळ त्याला–हो ! मी तरी तेंच म्हणतों कीं, ‘ बापानें मरायच्या वेळेला पोटभर पाणीसुद्धां पाजलें नाहीं,’ असें म्हणून ईश्वराजवळ हा रडणार तरी नाहीं ! सखाराम !–( मुलाच्या हृदयावर डोकें ठेवून अधिकच रडूं लागतो. ) कुणाच्या पायां पडून--सखाराम--आतां नादारी मागूं नकोस ! ‘ कामाला ठेवतां कां ? ’ असें म्हणून ज्याला त्याला विचारूं नकोस ! जा ! बाळा ! मागेंसुद्धा वळून पाहूं नकोस ! ( इतक्यांत यमुनाबाई दूध घेऊन रडतरडत आंत येते. ) नको रडूंस ! सुटला बरें आपला बाळ !--

यमुनाबाई—हायरे बाळ ! सखाराम ! कसा रे मला टाकून गेलास ? बाळा !––

## २८. नळराजा आणि हंस

त्यांतील एक कलहंस तटीं निजेला ।
जो भागला जलविहार विशेष केला ॥
पोटींच एक पद, लांबविला दुजा तो ।
पक्षी तनू लपवि; भूप तया पहातो ॥ १ ॥

टाकी उपानह, पदें अतिमंद ठेवी ।
केली विजार वरि डौरहि, मौन सेवी ॥
हस्तीं करी वलय उंच, अशा उपायीं ।
भूपें हळूच धरिला कलहंस पायीं ॥ २ ॥

तदितर खग भेणें वेगळाले पळाले ।
उपवनजलकेली जे कराया मिळाले ॥
स्वजन, गवसला जो, त्याजपाशीं नसे तो ।
कठिण समय येतां कोण कामास येतो ! ॥ ३ ॥

न सोडी हा नळ भूमिपाळ मातें । असें जाणोनि हंस वदे त्यातें ॥
"हंसहिंसा नच घडो तुझ्या हातें । स्वस्थळातें पावेन पक्षपातें ॥ ४ ॥
वधुनि माझी हे कनकरूप काया । कटकमुकुटादिक भूषणें कराया ॥
कशी आशा उपजली तूज राया । काय नाहीं तूजला दया माया? ॥५॥

म्हातारी उडतां नयेचि तिजला माता मदीया अशी ।
कांता काय वदों ? नवप्रसव ते सातां दिसांची तशी ॥
पाता त्या उभयांस मी, मज विधी घातास योजीतसे ।
हातामाजि नृपा तुझ्या गवसलों, आतां करावें कसें ॥ ६ ॥

सदय हृदय याचें भूप हा तापहारी ।
म्हणुनि परिसतां मी होय येथें विहारी ॥
मजहि वध कराया घातकी पातला जो ।
वरुनि पति असा ही भूमि कैसी न लाजो ?" ॥ ७ ॥

येणेंपरी परिसतां अतिदीन वाचा ।
हेलावला नल पयोधि दयारसाचा ॥
सोडी, म्हणे ‘ विहर जा अथवा फिराया ।
राहें यथानिजमनोरथ हंसराया ’ ॥ ८ ॥

सुटुनि खग पळाला, बैसला शालशाखे ।
क्षणभरि निजदेहीं मुक्ति विश्रांति चाखे ॥
स्वजन तंव तयाचे भोंवताले मिळाले ।
कवळिति निजबंधू, बाष्पबिंदू गळाले ॥ ९ ॥

विसांवा घे कांहीं उडुनि लवलाहीं परतला ।
नृपाळाचे स्कंधीं बसुनि मणिबंधीं उतरला ॥
म्हणे हंस क्षोणीपातिस, “ तुज कोणी सम नसे ।
दयेचा हा ठेवा तुजजवळि, देवा बहु वसे ॥ १० ॥

‘ हें पांखरूं मजसि येईल काय कामा ’ ।
ऐसें नृपा, न वद, पूरितलोककामा ॥
मोलें उणें व्यजन तें धरितां पुढारीं ।
छाया करी, तपनदीप्तिसही निवारी ॥ ११ ॥

वरनृपति विराजे भीम हें नाम ज्याला ।
वर दमन ऋषीनें दीधला कीं तयाला ॥
वरसुत दमनामा, दांतनामा द्वितीय ।
वरतनु दमयंती नंदिनी हे तृतीय ॥ १२ ॥

तेजोनिधीस तनया यमुना जसी ते ।
सीता जशी सुजनका, जनका तसी ते ॥
ते आवडे, सुतहि ते न तसे तयाला ।
ते नोवरी करवितों तुज मी, दयाला ! ” ॥ १३ ॥

## २९. रघोजीची बंगालवर दुसरी स्वारी

( १७४४ )

भास्कररामानें बंगाल्यांतून अगणित लूट आणिली, आणि बंगालच्या लोकांना ‘ त्राहि भगवन् ’ करावयास लावून मराठ्यांचा दरारा सर्वत्र बसविला ही गोष्ट खरी; पण अखेरीस तो अपयश घेऊन आला ही गोष्ट एकंदर मराठ्यांच्या--विशेषतः रघोजी भोसल्यासारख्या मानी पुरुषाच्या मनास लागून राहिली. मराठ्यांना आजपर्यंत असें अपयश कोणत्याही मोहिमींत मिळालें नव्हतें. जेथें ते जात तेथें ते आपलें वर्चस्व स्थापून परत येत. यामुळें लूट आणिल्याच्या आनंदापेक्षां मराठ्यांच्या नांवाला कलंक लागल्याबद्दल रघोजीला फार दुःख झालें व त्यानें संतापाच्या भरांत लागलीच आपल मोर्चे पुनः बंगालकडे वळविण्याचा निश्चय केला. मराठे बारगिरांना यावेळीं विश्रांतीची अतिशय जरूरी होती. पहिल्या मोहिमींत बंगालप्रांताची माहिती नसल्यामुळें त्यांना फार कष्ट सोसावे लागले होते. बंगालच्या कर्दमोत्थित ज्वरानें पुष्कळ बारगिरांनीं अंथरूण धरलें होतें. तथापि रघोजीचा निश्चय एकदा झाला कीं तो वज्रलेप. कोणाचेंही ऐकणारा तो पुरुष नव्हता. तशांतून झालेली मानखंडना घटकाभरसुद्धां सोसून राहणें हें त्याच्या स्वभावाला मरणप्राय दुःखदायक वाटत होतें. त्याचा राग कोणत्याही अन्य उपायांनीं शांत होण्यासारखा नव्हता. त्यानें बारगिरांच्या सोयीगैरसोयीकडे किंवा सुखदुःखाकडे न पाहतां इ. स. १७४४ मध्यें एकदम बंगालच्या मोहिमीचें शिंग फुंकलें; आणि स्वतः सेनापत्य स्वीकारून बंगालकडे कूच केलें.

अलीवर्दीखान म्हणजे कांहीं सामान्य पुरुष नव्हता. मुसलमानांत जे अत्यंत प्रौढ कर्तृत्ववान् पुरुष होऊन गेले, त्यांत तो प्रमुख होता. तो जसा मोठा बुद्धिमान् व राजकार्यकुशल मुत्सद्दी होता, तसाच अटोकाट धैर्याचा व प्रसंगावधानी पुरुष होता; आणि म्हणूनच मराठ्यांनीं केलेल्या पहिल्या स्वारींत कित्येक वेळां त्याच्यावर अत्यंत

बिकट प्रसंग आले असतांही त्यांतून तो मोठ्या धीरानें व युक्तीनें निभावून गेला होता. तथापि रघोजीशीं सामना करण्याचें सामर्थ्य त्याचे ठायीं नव्हतें, आणि रघोजीचा जो लौकिक त्यानें ऐकिला होता त्यावरून ही गोष्ट त्याची त्याला चांगलीच पटली होती. म्हणून रघोजी चवताळून आपलेवर येत आहे असें ऐकतांच तो स्वतःच्या बळावर विसंबून राहिला नाहीं. त्यानें मागच्यासारखें दिल्लीच्या बादशहास पत्र लिहून मदत मागितली; आणि बादशहानेंही बाळाजी बाजीराव पेशव्यांस अलीवर्दीखानाच्या मदतीसाठीं बंगालकड जाण्याची विनंति केली. "रघूजीस बंगाल्यांतून घालवून द्याल, तर तुम्हांस माळव्याची सनद देऊं" असें बादशहानें त्यास कबूल केलें होतें व शिवाय अजिमाबादप्रांताच्या चौथाईचा वसूल अलीवर्दीखानापासून घ्यावा म्हणून त्यानें बाळाजीकडे वरात पाठवून दिली होती. बाळाजीला द्रव्याचा लोभ सुटून त्यानें बादशहाची ही तात्पुरती कामगिरी—पैशासाठीं आपल्याच लोकांचे विरुद्ध लढण्याचें हें नीच काम पत्करलें, आणि लागलीच चाळीस पन्नास हजार फौजेची सिद्धता करून बंगालकडे आपला मोर्चा फिरविला. अलाहाबादप्रांतांतून बाळाजी बोगळीपुरापर्यंत आला. बाळाजीचें सैन्य बंगाल्यांत उतरलेलें पाहून बंगाली लोकांच्या उरांत पुनः धडकी भरली. भास्करपंडिताच्या पहिल्या स्वारीनें बंगाली लोक इतके भयभीत व हैराण झाले होते कीं, मराठे बारगिरांचें नांव ऐकल्याबरोबर सर्वांच्या अंगांत कांपरें भरत असे. अजूनही बंगाली लोक लहान मुलाला थापटून निजवीत असतां तें निजलें नाहीं तर त्या प्रसंगाचें पुढील गाणें म्हणत असतात—

छेले घुमाल पाडा जुडाल बर्गी एलो देशे ।
टिकटिकिते धान खेये छे खाजना दिब किसें ॥

[ बाळ निजलें आहे, गांवांत जिकडे तिकडे स्तब्धता आहे. बारगीर तर देशांत येऊन थडकले. पक्ष्यांनीं धान्य खाऊन टाकिलें. आतां सरकारचा सारा कसा भरावयाचा ? ]

आज दीडशें वर्षांवर जें हें गाणें बंगाली कुटुंबांत मुलांना भय दाखविण्यासाठीं म्हणण्यांत येत असतें, त्याचा प्रभाव त्या काळीं किती असला पाहिजे याची कल्पनाच केली पाहिजे. बंगाली लोकांना आपलेकडून बिलकुल उपद्रव होऊं नये अशी बाळाजीची खरोखर इच्छा होती, आणि म्हणून बोगळीपुराहून पुढें मुर्शिदाबादेला तो गेला. शेतकरी वगैरे लोकांना फौजेपासून त्रास होऊं नये म्हणून मुद्दाम शेतें व गांवें टाळून तो आडवाटेनें गेला. मुर्शिदाबादेस पोंचल्यावर त्यानें अलीवर्दीखानापाशीं चौथाईची रक्कम मागितली, व त्यानेंहि बाळाजीची आपणास मदत होईल या आशेवर मुकाट्यानें ती त्याच्या पदरांत घातली. पेशव्यांच्या मदतीची नबाबाला फार जरूरी होती. कारण, रघोजी त्या वेळीं आपल्या बारगिरांसह कट्वा व बर्द्वान यांच्या दरम्यान येऊन पोंचला होता.

याप्रमाणें मुर्शिदाबादच्या एका बाजूनें रघोजीचें व दुसऱ्या बाजूनें बाळाजीचें सैन्य भिडलें. अलीवर्दीखानानें लागलीच बाळाजीची भेट घेऊन बहारप्रांताच्या चौथाईची बाकी त्याला देऊन टाकून व पुष्कळ मौल्यवान् देणग्या देऊन त्याची तब्येत खुष केली, आणि मग त्या दोघांचीं सैन्यें हातांत हात घालून दक्षिणेकडे रघोजीच्या सैन्यावर चालून जाण्यासाठीं निघालीं. मराठ्यांचे घोडेस्वार फारच चपळ होते; अलीवर्दीच्या सैन्याच्यानें त्यांच्याबरोबर चालवेना. म्हणून बाळाजी बंगालच्या सैन्याला मागें ठेवून आपण एकटाच पुढें गेला, आणि रघोजीला गांठून कसबे जावळ व भंडाले परगणा खटाव येथें त्याच्यावर हल्ला करून त्यानें रघोजीचा फडशा उडवून दिला (आक्टोबर १७४४). आपला कार्यभाग फसला असें पाहून रघोजी विशेष भानगडींत न पडतां ओरिसाप्रांतांतून स्वदेशीं निघून गेला व नानासाहेबही बादशहाशीं केलेल्या कराराप्रमाणें फत्ते केल्याबद्दलचें बक्षीस—माळव्याची सनद-घेण्यासाठीं दिल्लीस निघून गेला.

## ३०. राजहंस माझा निजला

हें कोण बोललें बोला ?
'राजहंस माझा निजला'।

दुर्दैवनगाच्या शिखरीं । नवविधवा दुःखी आई ।
तें हृदय कसें आईचें । मी उगाच सांगत नाहीं ।
जें आनंदेंही रडतें । दुःखांत कसें तें होई—
हें कुणीं कुणां सांगावें
आईच्या बाळा ठावें ?
प्रेमाच्या गांवा जावें—
मग ऐकावें या बोला । 'राजहंस माझा निजला'।

मांडीवर मेलें मूल । तो हृदया धक्का बसला ।
होउनी कळस शोकाचा । भ्रम तिच्या मानसीं वसला ।
मग हृदय बधिरची झालें । अतिदुःख थिजवि चित्ताला ।
तें तिच्या जिवाचें फूल
मांडीवर होत मलूल
तरि शोकें पडुनी भूल—
वाटतची होतें तिजला । 'राजहंस माझा निजला'।

जन चार भोंवतीं जमले । मृत बाळा उचलायाला ।
तों काळ नाथनिधनाचा । हतभागि मना आठवला ।
तो प्रसंग पहिला तसला । हा दुसरा आतां असला ।
तें चित्र दिसे चित्ताला
तें चित्र दिसे डोळ्यांला

निज चित्र चिमनयनाला,
मग रडुनि वदे ती सकलां । ‘ राजहंस माझा निजला ’ ।

करुं नका गलबला अगदीं । लागली झोंप मम बाळा ।
आधींच झोंप त्या नाहीं । खेळाचा एकच चाळा ।
जागतांच वाऱ्यासरसा । खेळाचा घेइल आळा ।
वाजवूं नका पाऊल
लागेल तया चाहूल
झोंपेचा हलका फूल
मग झोंपायाचा कुठला । ‘ राजहंस माझा निजला ’ ।

हें दूध जरासा प्याला । आतांसा कोठें निजला ।
डोळ्याला लागे डोळा । कां तोंच भोंवतीं जमलां ? ।
जा, नका उठवुं वेल्हाळा । मी ओळखतें हो सकलां ।
तो हिराच तेव्हां नेला
हिरकणीस आतां टपलां
परि जिवापलिकडे याला—
लपवीन, एकची मजला । ‘ राजहंस माझा निजला ’

कां असलें भलतेंसलतें । बोलतां अमंगळ त्याला ? ।
छबकड्यावरुनि माझ्या या । ओंवाळूनि टाकिन सकलां ।
घेतें मी पदराखालीं । पाहूंच नका लडिवाळा ।
मी गरीब कितिही असलें
जरि कपाळ माझें फुटलें
बोलणें तरी हें असलें—
खपणार नाहिं हो मजला । ‘ राजहंस माझा निजला ’ ।

हें असेंच सांगुनि मागें । नेलात जिवाचा राजा ।
दाविलाहि फिरूनी नाहीं । नाहिंत का तुम्हां लाजा ? ।
न्यावयास आतां आलां । राजहंस राजस माझा ।
हा असा कसा दुष्टावा
कोणत्या जन्मिंचा दावा
कां उगिच गळा कापावा—
पाहुनी गरिब कोणाला । 'राजहंस माझा निजला' ।

हे काळे कुरळे केश । खेळतात डोक्यावरतीं ।
ही दृष्टि पहा मम वदनीं । नेहमीं अशी ही असती ।
हें तेज अशा रत्नाचें । झालें कां आहे कमती ? ।
कानांत नाचती डूल
तोंडावर हंसरें फूल
जीवाची घालुनि झूल—
मी असाच झांकिन याला । 'राजहंस माझा निजला' ।

या अर्ध्या उघडच्या नयनीं । बाळ काय पाहत नाहीं ।
या अर्ध्या मिटल्या तोंडीं । बाळ काय बोलत नाहीं ।
अर्थ या अशा हंसण्याचा । मज माझा कळतो बाई ।
हें हंसें मुखावर नाचे
जणुं बोल दुग्धपानाचे
कीं मुक्या समाधानाचे
इतुकेंहि कळे न कुणाला । 'राजहंस माझा निजला' ।

ते वैकुंठेश्वर गेले । पदिं त्यांच्या अर्पायाला ।
ही अखंड या अश्रूंची । वैजयंति मोहनमाळा ।
मी करित असें केव्हांची । धरुनियां उराशीं बाळा ।

कौस्तुभ हा माळेमधला
हृदयाचें कोंदण याला
तो चोराया कां आलां
दैत्याहुनि दैत्याचि झालां । 'राजहंस माझा निजला'।
हें असें जाहलें म्हणतां । तरि देवचि निजला कां हो ?।
जरि निर्दय होउनि निजला । आळविन फोडुनि टाहो,।
कीं असा पोटचा गोळा । पोटांतचि देवा राहो ।
ही कुऱ्हाड आकाशाची
मजवरती पाडायाची
नाहींच कल्पना त्याची
हा तुमचा कावा सगळा । 'राजहंस माझा निजला'।
जरि दूत यमाचे आले । लाडक्यास या न्यायाला ।
ते निष्ठुर असले तरिही । भुलतील पाहुनी याला ।
हृदयाचें होऊनि पाणी । लागतील चुंबायाला ।
मी मुका असा घेतांना–
हा पहा, पुन्हा हंसला ना
कां अशा फिरवितां माना
सुख खुपे काय डोळ्याला । 'राजहंस माझा निजला'।
जरि होऊं नये तें झालें । तरि सोडणार या नाहीं ।
पाळणाहि रुततो ज्याला । प्रेमें जरि निजवी आई ।
तो देह खांच दगडांत । छेः ! नको नको ग बाई ।
हृदयाची खणुनी खांच,
झांकिन मी बाळ असाच
दुःखाचे फत्तर साच
जा, जाउनि सांगा काळा । 'राजहंस माझा निजला'।
जरि काळाचाही काळ । बाळाला न्याया आला ।
तरि नाहीं मी द्यायाची । या जीवाच्या जीवाला ।

सारखीं गाउनी गाणीं । निजवीन कल्पवर याला ।
जा, करा आपुलें काळें
माझेही दमले डोळे
प्राणांचें पसरुनि जाळें—
मी निजतें घेउनि याला । ' राजहंस माझा निजला ' ।

सांगुनी असें सकलांशीं । मृत बाळ उराशीं धरुनी ।
तन्मुखीं स्वमुख ठेवोनी । चुंबिलें एकदा फिरुनी ।
पाहिलें नीट निरखोनी । झणिं तीहि गेली निजुनी ।
मग पुन्हां कधीं ती उठली,
जाणीव कुणा ही कुठली
परि मति या प्रश्नें हटली—
बोलेल कोण या बोला । ' राजहंस माझा निजला ' ।

मग मातापुत्रांवरि त्या । तरु गाळिति कोमल पानें ।
ढाळिती लता निज सुमनें । पशुपक्षिहि रडती गानें ।
दशदिशा दगडही रडती । मन दुभंगुनी शोकानें ।
दुमदुमतें स्थळ तें अजुनी,
त्या एकच करुणागानीं,
जा जाउनी ऐका कानीं
ऐकाल.याच बोलाला । ' राजहंस माझा निजला ' ।

# ३१. देशीभाषांचें पुनरुज्जीवन

गेल्या पन्नास वर्षांतील शिक्षणाचा प्रसार व त्यापासून झालेले परिणाम हे लक्षांत घेतले म्हणजे, यापुढें इंग्रजी भाषेची वाढ पूर्वीसारखी न होतां लवकरच खुंटेल, अर्थात् आपल्या योग्य मर्यादेपर्यंत जाऊन थांबेल, असें दिसतें. शिक्षणामुळें स्वाभिमानबुद्धि उत्पन्न झाल्याकारणानें देशी भाषांच्या उत्कर्षाविषयींची स्वाभिमानबुद्धि सुशिक्षित लोकांच्या मनांत प्रगट होऊन त्यांचें लक्ष व त्यांचे परिश्रम इंग्रजी भाषेकडून थोडेबहुत कमी पडतील. एवढेंच नव्हे तर इंग्रजी व देशी यांच्या सरहद्दीवरील झगड्यांत ते देशी भाषांचा पक्ष धरून इंग्रजीचें पाऊल थोडेंबहुत मागें हटविण्याचा प्रयत्न करतील हें उघड आहे. गेल्या पांच वर्षांत एकीकडे इंग्रजी शिकणाऱ्या मुलांची संख्या वाढली, हिंदुस्थानांत येणाऱ्या इंग्रजी पुस्तकांची संख्या वाढली, एकंदरीनें इंग्रजी भाषेचें ज्ञान असणाऱ्या लोकांची संख्या वाढली व इंग्रजी भाषेचे द्वारानें देशी भाषेंत येणाऱ्या ज्ञानभांडाराची किंमत वाढली हें खरें; पण असें असतांही त्याचबरोबर दुसऱ्या बाजूस इंग्रजी व्याख्यानें देण्याची व इंग्रजी लेख लिहिण्याची सुशिक्षित लोकांची इच्छा किंचित् कमी झाली व देशी भाषांतून लेख लिहिणें व भाषणें करणें, नवीन शब्दकोश रचणें व जरुरीमुळें संग्रहित कराव्या लागणाऱ्या विदेशी कल्पनांना होतां होईतों देशी पेहराव देऊन–देशी भावनेचा आणि संस्काराचा उजळा देऊन–घेण्याची प्रवृत्ति वाढली हीही गोष्ट विसरतां कामा नये.

सन १८९४ सालीं कै० रा० ब० रानडे यांनीं मुंबई युनिव्हर्सिटीमध्यें मराठी भाषेच्या तर्फे जें सुंदर व पोक्त विचारांनीं भरलेलें भाषण केलें त्यामध्यें ते असें म्हणाले कीं, मराठी भाषचा प्रश्न हा होमरूलच्या प्रश्नासारखा आहे. म्हणजे ज्याप्रमाणें इंग्रज लोकांच्या हाताखालीं कांहीं दिवस राजकीय शिक्षण मिळाल्यामुळें हिंदी लोकांना दिवसेंदिवस आपलीं कामें आपणच करायची इच्छा व पात्रता उत्पन्न झाली

त्याप्रमाणें इंग्रजीभाषा शिकण्यांत कांहीं दिवस गेल्यामुळें त्यांचें स्वभाषेविषयींचें प्रेम अधिक जागृत झालें. इंग्रजी भाषा शिकल्यानें मराठी भाषेचें प्रेम वाढलें असें म्हणणें हें कांहीं अंशीं विरोधाभासाचें एक उदाहरण आहे, परंतु तो अर्थातच आभास होय. कारण प्रत्यक्ष स्वराज्य असतां स्वभाषेचा उत्कर्ष म्हणून कांहीं करण्याची जी बुद्धि आपणामध्यें पूर्वीं, म्हणजे उदाहरणार्थ पेशवाईत, जागृत झालेली नव्हती ती आज इंग्रजी राज्यांत उत्पन्न झाली आहे, याचा अर्थ पेशवाईत महाराष्ट्रीयांस मराठी भाषा आवडत नव्हती अगर दुसरी एकादी आवडत होती असा नव्हे; तर मराठी भाषेवर--राष्ट्रीयत्वाच्या मुख्य साधनावर--आज एकप्रकारचें संकट आल्यामुळें तिच्या रक्षणाविषयींच्या आपल्या प्रयत्नास जागरूकता येऊन तिजविषयींचें आपलें प्रेम अधिक व्यक्त झालें आहे, इतकाच अर्थ घ्यावयाचा. याच गोष्टीला प्रत्यंतरादाखल दुसरेंहि असें एक उदाहरण देतां येईल कीं, पूर्वीं पेशवाईमध्यें शिवाजीचा उत्सव महाराष्ट्रांत करीत असल्याचें कोणी ऐकिलें नाहीं, तो उत्सव आज महाराष्ट्रांत महाराष्ट्रीयांस करावासा वाटतो. याचाहि अर्थ नानासाहेब व माधवराव पेशव्यांस शिवाजीमहाराजांची योग्यता कळत नव्हती असा नव्हे; तर आजच्या घटकेच्या महाराष्ट्रीयांना शिवाजीमहाराजांची योग्यता ध्यानांत ठेवणेची तेव्हांपेक्षांही अधिक जरूरी आहे हा होय. ज्याप्रमाणें प्रत्यक्ष स्वराज्यांत होमरूलची अशी चळवळ होऊं शकत नाहीं, परराज्यांत अशा चळवळीच्या नांवाला कांहीं औचित्य असतें, त्याचप्रमाणें इंग्रजी भाषेचें गंडांतर दृष्टीपुढें उभें राहिल्यामुळें देशी भाषांच्या सुधारणेविषयीं हिंदी लोकांच्या मनांतून स्वाभाविकच उमाळा आला. शिवाय दुसरेंही एक कारण आहे तें हें कीं, इंग्रजी भाषेच्या संसर्गामुळें हिंदी ग्रंथसंग्रह व वाङ्मय फैलावलें आहे व यामुळें पेशवाईत दीडशें वर्षांत मराठी भाषेची जी वाढ दिसून आली नाहीं ती गेल्या अवघ्या पन्नास वर्षांत दिसून आली असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

पण देशी भाषांचा उत्कर्ष म्हणजे इंग्रजीची हटकून पिछेहाट असें नाहीं; आणि इंग्रजी व देशी भाषा यांच्या दिसणाऱ्या सकृद्दर्शनी विरोधाचा विचार करतांना अगर त्यावर मत देतांना जी गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती हीच. एकाच म्यानांत एकाच वेळीं एकाहून अधिक सुऱ्या ठेवितां येत नाहींत असें जरी असलें तरी प्रसंगाप्रमाणें निरनिराळया वेळीं एकाच म्यानांत निरनिराळया सुऱ्या ठेवितां येतात. मनुष्याचें मन व भाषा यांचीहि गोष्ट कांहीं अंशीं अशीच आहे. मनुष्यास एकच भाषा येणें शक्य असतें किंवा एक भाषा चांगली आल्यामुळें अगर सरावांत ठेविल्यानें दुसऱ्या एखाद्या भाषेस हटकून अपाय झाला पाहिजे अगर गौणत्व आलें पाहिजे, ही गोष्ट जर अनिवार्य असती तर भाषांच्या प्रश्नांस लढाईचें स्वरूप आलें असतें. पण वस्तुतः तशी स्थिति मुळींच नाहीं. एखाद्या मनुष्यास इंग्रजी चांगलें येत असलें म्हणून त्याच्या देशी भाषेचें ज्ञान कमी होतें, अगर त्याला देशी भाषा लिहितां बोलतां येतच नाहीं, असें होत असतें तर गोष्ट वेगळी; परंतु एक भाषा नेहमीं दुसऱ्या भाषेस उपकारक होते. इंग्रजी चांगलें आल्यामुळें ज्यास मराठी चांगलें येत नाहीं अगर मराठी चांगलें आल्यामुळें ज्यास इंग्रजी चांगलें येत नाहीं असा मनुष्य सांपडणें शक्यच नाहीं हें कोणीही सांगू शकेल. ज्याला मूळ भाषाग्रहणशक्तिच कमी त्याला केवळ एक भाषा शिकून तरी तींत कितीसें नैपुण्य मिळणार? उलटपक्षीं ज्याच्या मनाला भाषासंस्कार व वाङ्मयाची गोडी जातीचीच आहे त्याला अनेक भाषांचें ज्ञान अपकारक न होतां उलट उपकारकच होतें. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें हिंदुस्थानांत आज कोणती एक भाषा जिवंत उरणार असा प्रश्नच मुळीं उद्भवत नाहीं असें आम्हांस वाटतें. समाजाच्या कार्यक्षमतेप्रमाणें त्याला अनेक भाषांची जरूरी असते. निदान आजच्या स्थितींतिल हिंदी समाजास तरी तशी गरज आहे यांत शंका नाहीं. आपण महाराष्ट्राचेंच उदाहरण घेऊं. आजच्या महाराष्ट्रीयांस एकच काय पण चार भाषांची गरज आहे हें सप्रमाण सिद्ध करितां येतें.

मराठी भाषा ही अर्थात् महाराष्ट्रीयांची जन्मभाषा असल्याकारणानें तिचें महत्त्व वर्णन करण्याचें कारण नाहीं. परंतु संस्कृत भाषा सर्वस्वी काढून घेतली तर मराठी भाषा मुळीं उरणेंच शक्य नाहीं. अप्रबुद्ध अडाणी अशिक्षित लोकांना संस्कृत भाषेचें प्रत्यक्ष ज्ञान नसतें, हें खरें. परंतु त्यांचा सर्व पूर्वेतिहास, त्यांचा धर्म, त्यांच्या दंतकथा, व ते तोंडानें गुणगुणतात तीं गाणीं, तात्पर्य अशिक्षित मनुष्याला केवळ सहज असें जें शिक्षण असतें तें सर्व संस्कृताच्या द्वारें आलेलें असल्यामुळें संस्कृत मराठीपासून विलग करणें शक्य नाहीं. ज्यांना आपण सुशिक्षित म्हणतां त्यांच्या संस्कृतीचा तर बराच भाग संस्कृतांतून येतो हें उघड आहे. वेद, उपनिषदें, काव्यें, नाटकें, इतिहास, पुराणें, दर्शनें व शास्त्रें या सर्वांमधून झिरपून आलेल्या संस्कृतीच्या प्रवाहांची एक नदी बनलेली असते. अर्थात् हीं उगमस्थानें सर्व आटलीं तर त्यांच्या संस्कृतीचा प्रवाहही अवर्षणानंतर उन्हाळ्यांत वाहणाऱ्या नदीच्या जल-रेखेप्रमाणें अति सूक्ष्म असेल हें उघड आहे. शिवाय पाश्चिमात्य शास्त्रें, तत्त्वज्ञान वगैरेंचें ज्ञान झालेल्या मनुष्यासही तें ज्ञान देशी कल्पनांच्या सांचांतून संग्रहित झालेलें असलें तरच मनःप्रकृतीस मानवतें. औषध इंग्रजी असलें तरी अनुपान देशीच लागतें; एरवीं तें गुणकारी होत नाहीं. तात्पर्य, संस्कृत ही जरी एका अर्थानें मृतभाषा असली तरी आमच्या देशी भाषांस जिवंत ठेवण्याइतका सजीवपणा तिचे अंगीं आहे.

परंतु आजच्या स्थितींत केवळ मराठी व संस्कृत या दोन भाषांनींहि चालणार नाहीं. कारण महाराष्ट्रांतील समाजाच्या अंगांत व उपांगांत चालणाऱ्या व्यवहाराचा इंग्रजीशीं नित्य इतका निकट संबंध येतो कीं, इंग्रजी भाषेचें ज्ञान नसणारा मनुष्य जात्या कितीही बुद्धिमान् असला तरी पाण्याबाहेर काढलेल्या माशाप्रमाणें त्यास तडफडावें लागतें; अथवा झोंपेंतून उठलेला मनुष्य एकदम उन्हाकडे पाहून जसा गांगरून अस्वस्थ होतो, तशीच स्थिति आज निवळ मराठी जाणणाराची होते. देशांतील बराचसा राज्यकारभार, व्यापार, कलाकौशल्य अगर एखादा

उद्योगधंदा चांगला करावयाचा असल्यास आज इंग्रजीशिवाय त्याचें अडणारच. तसेंच ज्या कोणाला केवळ कूपमंडूकवृत्तीनेंच राहावयाचें नसेल, जगांतल्या निरनिराळ्या देशांत पैदा झालेलें उत्कृष्ट ज्ञान संपादन करावयाचें असेल त्यालाही इंग्रजी शिकल्याशिवाय गत्यंतर नाहीं. किंबहुना एका अँग्लो-इंडियन पत्रानें म्हटल्याप्रमाणें आज महाराष्ट्रांत पेशवाई असती तर 'न वदेत् यावनीं भाषां' या वचनावर हरताळ फांसून राज्यकर्त्यांनीं व प्रजेनें विश्वसंस्कृतीच्या अपक्षेनें इंग्रजीचा अभ्यास थोडाबहुत तरी चालू ठेविला असता, असेंहि मानण्यास जपान व चीन यांच्या उदाहरणांवरून बरीच जागा आहे.

पण मराठी, संस्कृत व इंग्रजी या तिहींनींही आज महाराष्ट्रीयांचें काम भागत नाहीं. कारण नवीन परिस्थितीमुळें सर्व हिंदुस्थान देश आतां आपलाच असा वाटूं लागला आहे. प्रांतांप्रांतांतील दळणवळण वाढलेलें असून निरनिराळ्या शाखेच्या लोकांना परस्परांचे आचारविचार समजण्याची आकांक्षा उत्पन्न झालेली आहे. अर्थात् सर्व हिंदुस्थानची मिळून एकच नसली तरी प्रांतानिहाय निरनिराळी कां होईना, परंतु दुसरी म्हणून एक भाषा लागणारच. ह्या दुसऱ्या भाषेचें स्थान हिंदी, बंगाली किंवा मराठी घेणार हा मुद्दा जितका वादग्रस्त आहे तितकाच गौणही आहे; पण सर गुरुनाथ बॅनर्जी यांनीं राष्ट्रीय शिक्षणावरील आपल्या पुस्तकांत अंदाज केल्याप्रमाणें कालांतरानें दरएक प्रांतांत दोन दोन देशी भाषा चालू राहतील. उदाहरणार्थ, बंगाल्यामध्यें बंगाली व उर्दु, संयुक्त प्रांतांत व पंजाबांत हिंदी आणि उर्दु, मुंबई इलाख्यांत मराठी आणि गुजराथी, आणि मद्रास इलाख्यांत तामील व तेलगू याच मुख्य देशी भाषा प्रचलित रहातील. आजच्या घटकेला हिंदी भाषेचा प्रसार जास्त आहे; परंतु तिजमधील वाङ्मय फार कमी आहे. बंगाली भाषा बोलणारे लोक फक्त चारच कोटी असले तरी वाङ्मयाच्या दृष्टीनें पाहतां ती भाषा हिंदुस्थानांतील सर्व भाषांच्या अग्रस्थानीं आज आहे. मराठी पुस्तकांचीं बंगाली भाषेंत जितकीं भाषांतरें

होतात, त्यापेक्षां बंगाली पुस्तकांचीं मराठींत अधिक भाषांतरें होतात. गुजराथी भाषा व्यापारधंद्यास अधिक उपयोगी असली तरी इतिहास व राजकारण या दोहोंच्या दृष्टीनें मराठी हीच अधिक मान्य आहे. अशा रीतीनें कोणांत कांहीं तर कोणांत कांहीं गुण असल्यामुळें देशी भाषांमध्यें आजच्या घटकेस एकप्रकारची शर्यतच लागून राहिली आहे. ही शर्यत कोणती भाषा जिंकणार हा प्रश्न मनोरंजक असला तरी प्रस्तुत आपणांस गौणच आहे. कारण यापुढें कित्येक शतकेपर्यंत एक जन्मभाषा, एक संस्कृत भाषा, एक दुय्यम देशी भाषा, आणि सर्व जगाशीं व्यवहार करण्याकरितां इंग्रजी ही चौथी भाषा, अशा चार भाषा प्रत्येक सुशिक्षित मनुष्यास प्रायः येतील. परंतु सांगण्याचा मुख्य मुद्दा असा कीं, इंग्रजी भाषेला कितीही राजकीय महत्त्व असलें तरी इंग्रजी भाषा ही सर्व हिंदी जनतेची आवडीची अशी भाषा होईल हें शक्य नाहीं व एकाद्या देशी भाषेला नामशेष करून तिचें स्थान इंग्रजी भाषा बळकावील हें तर मळीं स्वप्नांतही आणण्याचें कारण नाहीं. इंग्रजी भाषेची उपयुक्तता कितीही असली तरी तिच्या विस्ताराला कांहीं स्वाभाविक मर्यादा आहेच.

# ३२. ध्रुवाख्यान

सूर्यवंशीं उत्तानपाद राजा ।
रूपवंती तयास दोन भाजा ॥
कनिष्ठेसी अत्यंत प्रीतमाया ।
पट्टराणीची पडों न दे छाया ॥ १ ॥

वरिष्ठेसी जाहला एक पुत्र ।
भक्तराज वैकुंठपाळमित्र ॥
सुकुमार आकर्णपद्मनेत्र ।
ठाण माण रेखिलें जेंवि चित्र ॥ २ ॥

पांच वर्षें लोटलीं ध्रुवा अंगीं ।
पिता ठाऊका नाहिं तयालागीं ॥
पुसे मातेसी भक्तराज योगी ।
'तात कोठें तो सांग मला वेगीं' ॥ ३ ॥

म्हणे माता, 'तान्हया तोचि तुझा
धराधीश बोलती ज्यास प्रजा'
येरु बोले, 'पाहीन पिता माझा'
'नको जाऊं मारील राजभाजा' ॥ ४ ॥

पूर्वपुण्यें शुभ दिन ऊगवला ।
मुलांसंगें तो राजगृहा गेला ॥
राजदृष्टी सन्मूख उभा ठेला ।
पिता पाहे तों मोह झळंबला ॥ ५ ॥

अनीवार मोहास पूर आला ।
ऊचलोनी मांडिये बैसवीला ॥
बाळशब्दें खेळवी तनूजाला
न साहे तें राणीस कोप आला ॥ ६ ॥

उचंबळे क्रोधाग्नि शिखा टाकी ।
कवण बोले बैसला राजअंकीं ॥
राव कैसा खेळवी कवतूकीं ।
ध्रुव राजा होईल धरालोकीं ॥ ७ ॥

धरोनिया सापत्नभाव चित्तीं ।
पदें लोटोनी पाडियला क्षीतीं ॥
रडत गेला माउली जेथ होती ।
अश्रुपातें हालवी नेत्रपातीं ॥ ८ ॥

म्हणे माता, ‘ तान्हया काय झालें ।
कोण पापीयें तूज गांजियेलें ’ ॥
‘ मला रायें मांडिये बैसवीलें ।
राजभाजेनें पदें लोटियेलें ’ ॥ ९ ॥

बुझावीतां माउली काय बोले ।
‘ अम्हीं देवासी नाहिं पूजियेलें ’ ॥
येरु बोले, ‘ तो देव कसा आहे ।
वसे कोठें तो सांग लवलाहे ’ ॥ १० ॥

माय बोले, ‘ सर्वत्र देव आहे ।
चराचर व्यापून विश्व राहे ॥
तयालागीं धुंडिती महायोगी ।
पूर्वपुण्यें दरुषण तयालागीं ॥ ११ ॥

तुझी बुद्धी काय बा वय सान ।
तुला कसें येईल दरुषण ’ ॥
ध्रुव बोले, ‘ त्यागीन तरी प्राण ।
हरी देईना जरी दरूषण ’ ॥ १२ ॥

उभा जैसा तैसाचि निघे वेगें ।
रडत पाठीं लागली माय मागें ॥
पुत्र गेला रायासि दूत सांगे ।
राय झाला घाबरा मोहसंगें ॥ १३ ॥

सर्व सौख्याचें मूळ बाळ माझें ।
ध्रुव गेला घेणार राज्यओझें ॥
वनीं प्राण त्यागीन लोकलाजें ।
काय जीणें मारिलें दुष्ट भाजे ॥ १४ ॥

लवलाहीं लागला ध्रुवापाठीं ।
म्हणे बाळा, 'ऐक बा एक गोष्टी ॥
बुझवीतों तुज धरुनि हनुवटी ।
तूजवीणें दाटला प्राण कंठीं ॥ १५ ॥

फीर मागें देईन एक गांव' ।
ध्रुव बोले 'देईल देवराव' ॥
'पांच गांव दीधले फीर आतां'
ध्रुव बोले, 'मागेन जगन्नाथा' ॥ १६ ॥

राय बोले, 'देईन एक देश' ।
ध्रुव बोले, 'देईल जगदीश'
'अर्ध राज्य दीधलें आण तूझी' ।
ध्रुव बोले, 'देवासि लाज मांझी' ॥ १७ ॥

'सर्व राज्य दीधलें फीर मागें' ।
ध्रुव बोले, 'देइजे रमारंगें' ॥
'स्नेह कां रे सोडिला ध्रुवा आजी ।
काळतोंडा जाहलों जगामाजी' ॥ १८ ॥

ध्रुव बोले, 'पितयास तातदेवा ।
अतां येतों मी लोभ असों द्यावा ॥
हरीभक्तीचा लोभ कसा देहीं ।
अनुतापें कोंदल्या दिशा दाही ' ॥ १९ ॥

सर्व भावें उभवूनि दोनि बाही ।
म्हणे देवा दे भेट लवलाही ॥
निरंजनीं जावोनि उभा राहे ।
शोक आक्रोशें करूनियां बाहे ॥ २० ॥

दुरूनीया अष्टाक्षसुता पाहे ।
तया दृष्टी सायुज्य पदा लाहे ॥
जवळ येवोनी पुसे बाळकाजी ।
' सान वय तूं कोण ह्या वनामाजी ' ॥ २१ ॥

पूर्व वृत्तांत सांगें नारदासी ।
आयकोनी तोषला देवऋषी ॥
गुरूमंत्रावांचोन देव कैंचा ।
श्रुती साऱ्या बोलती अशी वाचा ॥ २२ ॥

सकल मंत्रांमाझारिं मुख्य साचा ।
मंत्रराज द्वादश अक्षरांचा ॥
ध्रुवा कानीं सांगोनि मुनी गेला ।
जपतांचि तों हृदयीं प्रगटला ॥ २३ ॥

चतुर्भुज सायूध घननीला ।
तया दृष्टीसन्मुख उभा ठेला ॥
दिव्य रूपा त्या ध्रुवें देखियेलें ।
नमस्कारोनी मनीं पूजियेलें ॥ २४ ॥

देव बोले, 'तूं काय इच्छितोसी ।
धराधीश कीं स्वर्गभोगवासी' ॥
ध्रुव बोले, 'मज भक्ति सदा देई ।
पद न दीजे ऊठवी दुजी आई' ॥ २५ ॥

ध्रुव यानीं तो वाहुनियां नेला ।
ध्रुवस्थानीं तो अढळ बैसवीला ॥
चंद्र सूर्य नक्षत्र ग्रह तारा ।
सप्तऋषिही घालिती ज्यास फेरा ॥ २६ ॥

## ३३. प्राचीन इतिहासाचीं साधनें

वर्तमानपत्रांत कधीं कधीं असे उद्गार काढलेले आपल्या वाचण्यांत येतात कीं, हिंदुस्थान हा देश विस्तृत आहे, त्यांतील लोकांचे भाषेंत व रीतिभातींत इतके भेद आहेत कीं, तो एक देश नसून युरोपखंडासारखें तें एक खंड आहे. परंतु थोडा विचार केला असतां, हें मत बरोबर नाहीं असें ध्यानांत येईल. चतुःसीमांचा विचार केला तर असें दिसतें कीं, ह्या देशाच्या तीन बाजूंस समुद्र आहे. उत्तर दिशेस सर्व जगतांत मोठा असा प्रचंड हिमालय पर्वत आहे. वायव्य दिशेस हिमाचलापासून तों अरबी समुद्रापर्यंत सिंधु नदी आहे. व त्या नदीच्या पलीकडे मोठ-मोठाल्या पर्वतांच्या रांगा आहेत. ईशान्य दिशेस ब्रह्मपुत्र नद आहे. याप्रमाणें हिंदुस्थानच्या सर्व बाजूंस इतर देशांपासून भिन्न करणारीं निसर्गदेवतेचीं महान् महान् स्पष्ट निशाणें आहेत. तसेंच चतुःसीमांच्या आंत राहणाऱ्या लोकांत जें एक प्रकारचें साम्य आहे, त्या योगानें हा देश इतर देशांपासून भिन्न असल्याचें वरवर पाहणाऱ्या मनुष्याच्या सुद्धां नजरेस येईल.

साधारणपणें पाहिलें तर, काश्मीर प्रांतांत ज्या देवांची पूजा करितात त्याच देवांची पूजा कन्याकुमारीच्या भूशिरापाशीं राहणारे लोक करितात. पश्चिमेस असलेल्या द्वारकाक्षेत्रीं ज्या कृष्णदेवाची भक्ति लोक करितात त्याच कृष्णदेवाची भक्ति पूर्वेकडील बंगालदेशांत व जगन्नाथ-पुरी क्षेत्रांत करितात. रामायण महाभारतांतील कथा नेपाळ व हिमाल-यांतील इतर प्रांत यांतील लोक जितक्या आवडीनें ऐकतात तितक्याच आवडीनें काठेवाड, गुजराथ, महाराष्ट्र, म्हैसूर, त्रावणकोर, मद्रास, ओढिया, बंगाल, बहार, अयोध्या, पंजाब, राजपुताना, माळवा व नागपूर वगैरे प्रांतांतील लोक ऐकतात. जातिनिर्बंध सर्व देशभर बहुतकरून सारखेच आहेत. स्त्रियांस वागविण्याची बरीवाईट रीत व मुलींचीं लग्नें करण्याचा काळ बहुतेक सारखाच आहे. बहुतेक भाषांच्या मुळाशीं

संस्कृत भाषा आहे. धर्म, सामाजिक रीतिभाति व भाषा ह्या गोष्टी ज्या देशांतील लोकांत सारख्या आहेत, त्या देशाला तो फार अफाट आहे व त्याच्या वेगवेगळया भागांत हवापाण्यांत फार अंतर आहे, वगैरे कारणांवरून एक देश न म्हणणें हें युक्तीला विसंगत दिसतें. त्यांतून सांप्रत काळीं तर हा सर्व देश एका साम्राज्याच्या छत्राखालीं आहे. तेव्हां निदान सध्या तरी आरंभीं लिहिलेले उद्गार अयोग्य आहेत यांत संशय नाहीं.

युरोपखंडांतील ग्रीस, इटली वगैरे प्राचीन देशांचे इतिहास त्या त्या देशांतील लोकांनीं लिहिलेले आहेत. हिंदुस्थान देशाची गोष्ट मात्र या बाबतींत अगदीं भिन्न आहे. दुसऱ्या पुष्कळ विषयांत हिंदुस्थान देशाचें वाङ्मय इतर देशांच्या वाङ्मयापेक्षां जितकें श्रेष्ठ व भरपूर आहे, तितक्याच मानानें इतिहासाच्या संबंधानें याच्यांत उणेपणा आहे. हिंदुस्थानच्या इतिहासाकरितां आपणाला दुसऱ्या देशाच्या तोंडाकडे पहावें लागतें. काश्मिरांतील राजतरंगिणी नांवाच्या ग्रंथाशिवाय हिंदुस्थानांत म्हणण्यासारखा दुसरा ऐतिहासिक ग्रंथ नाहीं. रामायण व महाभारत या ग्रंथांना जरी इतिहास म्हणण्याची वहिवाट आहे तरी त्यांत अतिशयोक्तीचा व कल्पनेचा उघडउघडपणें इतका भाग आहे कीं, त्यांतील खरा कोणता व खोटा कोणता हें निश्चयानें सांगणें फार कठीण आहे.

हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाचीं साधनें मुख्यत्वेंकरून आहेत तीं येणेंप्रमाणें:—

१. लौकिकपरंपरेनें चालत आलेल्या दंतकथा.

२. परदेशांच्या प्रवाशांनीं दिलेलीं वर्णनें.

३. ताम्रपट, कोरींव लेण्यांतील व शिलांवरील लेख, दानपत्रें, नाणीं वगैरे.

४. देशांतील ग्रंथकारांनीं लिहिलेले थोडे ऐतिहासिक ग्रंथ.

पहिल्या सदरांत अठरा पुराणें येतात. पैकीं वायु, मत्स्य, विष्णु, ब्रह्मांड आणि भागवत या पांच पुराणांत राजांच्या वंशावळींच्या याद्या दिल्या आहेत. सर्व पुराणांत मत्स्यपुराण हें फार प्राचीन आहे. पुराणांचा उल्लेख उपनिषदांत आहे. परंतु सांप्रत तीं ज्या स्वरूपाचीं आहेत तें स्वरूप त्यांना अलिकडे आलें असावें. पाली भाषेंत दीपवंश महावंश नामक ग्रंथांत मौर्यवंशाची हकीगत दिली आहे. तसेंच जैन व बौद्ध ग्रंथांतही इसवी सनापूर्वी पांचव्या व सहाव्या शतकाची माहिती सांपडते.

. ग्रीस देशांतील आद्य इतिहासकार हिरोडोटस् यानें हिंदुस्थान व इराण या संबंधानें माहिती दिली आहे. पर्सिपोलिस शहराजवळ इराणच्या दरायस राजाच्या शिलालेखांत हिंदुस्थानचा उल्लेख आहे. ह्या शिलालेखाचें साल इ. सनापूर्वी ४८६ हें आहे. हिंदुस्थानची विश्वसनीय माहिती शिकंदर बादशहाच्या स्वारीपासून मिळते ( ख्रि. सनापूर्वी ३२६ ). अरिअन नांवाच्या ग्रीक ग्रंथकारानें शिकंदर बादशाहाच्या स्वारीची उत्तम हकीगत लिहिली आहे. सेल्यूकस राजाचा मॅगेस्थेनिस नांवाचा वकील चंद्रगुप्त मौर्य राजाकडे होता. त्यानें पुष्कळ तपशीलवार माहिती दिली आहे.

चिनी इतिहासकार सुमाचियेन ह्यानें इ. स. पूर्वी १०० वर्षें एक इतिहास लिहिला, त्यांतही हिंदुस्थानची माहिती आहे. चिनांतून पुष्कळ बौद्ध धर्माचे प्रवासी हिंदुस्थानांत येत असत. त्यांपैकीं पहिला 'फाहीएन' हा इ० स० ३९९ सालांत चिनांतून निघाला, तो पंधरा वर्षांनीं चिनांत परत गेला. त्याच्या ग्रंथाचें भाषांतर फ्रेंच व इंग्रजी भाषांत झालेलें आहे. त्यांत दुसरा चंद्रगुप्त ऊर्फ विक्रमादित्य ह्याच्या वेळच्या राजकीय व सामाजिक स्थितीचें फार मार्मिक वर्णन दिलेलें आहे. परंतु सर्वांत उत्तम वर्णन म्हणजे प्रसिद्ध ह्युएनत्संग याचें आहे. तो हिंदुस्थानांत सुमारें पंधरा वर्षें ( इ. स. ६२९-६४५ ) राहिला. तो चिनांतून निघून तार्तर देशांत आला व वाटेंत पुष्कळ देश

व शहरें पाहून ताश्कंद शहरीं आला. तेथून जगझार्टिज नदी उतरून तो समर्कंदास आला. तेथून हिंदुकुश पर्वत ओलांडून कपिला नगरांत आला. त्या शहरांतील राजा क्षत्रिय होता. तेथें १०९ मठ असून ६००० यति होते. शहराजवळच अशोकाचा पहिला स्तूप त्याचे दृष्टीस पडला. तेथून तो उत्तर हिंदुस्थानांत शिरला. प्रथमतः त्याला लंपा नांवाचें शहर लागलें. त्या शहराच्या उत्तरेकडील लोकांस म्लेंच्छ म्हणत असत.

तेथून तो नगरहार शहरीं आला. ह्या शहरच्या नैऋत्य दिशेस एक गुहा होती; त्या गुहेंत बुद्धगुरूनें आपली छाया ठेविली होती व प्राचीन काळीं ती छाया प्रत्यक्ष बुद्धाप्रमाणेंच दिसे अशी आख्यायिका होती; परंतु त्या विद्वान् प्रवाशाला तेथें कांहीं दिसलें नाहीं. तो येथून निघून तक्षशिला, मथुरा, कान्यकुब्ज, प्रयाग वगैरे क्षेत्रें पाहून काशीस आला. काशीस बौद्धांपेक्षां ब्राह्मणधर्माचे अनुयायी त्यास जास्त दृष्टीस पडले. तेथें शंभर देवळें होतीं व शिवाचे अनुयायी दहा हजार होते. तेथें पितळेची शंभर फूट उंचीची महेश्वराची एक मूर्ति त्याचे दृष्टीस पडली. कांहीं लोक रस्त्यांतून अगदीं नग्न जात होते व कांहींनीं अंगास राख फासली होती. काशीहून ह्युएनत्सांग उत्तरेकडे गेला. तिकडे वैशाळी व पाटलीपुत्र ह्या राजधान्या त्यानें पाहिल्या. तेथून तो गयेस गेला. परंतु सर्वांत जास्त मुक्काम त्यानें नालंद येथें केला. तेथें तो पांच वर्षें राहिला व निरनिराळ्या शास्त्रांचा अभ्यास त्यानें केला. तेथें दहा हजार यति होते. तेथून निघून तो आसाम, ओरिसा, आंध्र, द्रविड वगैरे प्रांतांत गेला; व कोंकण, महाराष्ट्र, गुजराथ, कच्छ, काठेवाड, सिंध इत्यादि प्रांतांतून हिंदुकुश पर्वतावरून आपल्या देशांत परत गेला. ह्यावरून त्याच्या लेखाचें महत्त्व किती आहे हें ध्यानांत येईल.

गिझनीच्या महंमदाबरोबर अल्बरुनी नांवाचा मुसलमान आला होता. त्यानें तहकीत-इ-हिंद नांवाची हकीकत लिहिली आहे.

पुढें इ. स. १२९५ सालीं वेनिस शहरचा प्रवासी मार्को पोलो हा दक्षिण हिंदुस्थानांत आला होता.

पुष्कळ ठिकाणीं पर्वतांचे गुहांत, शिलांवर, स्तंभांवर व प्राचीन मंदिरांवर कोरींव लेख सांपडतात. तसेंच ताम्रपटांवर दानलेख आहेत, त्यांवर दान करणारांचीं व त्यांचे पूर्वजांचीं नांवें, सालें वगैरे दिलेलीं आहेत. प्राचीन इतिहासाची माहिती अशोक राजाच्या शासनपत्रावरून मिळते. दाक्षिण हिंदुस्थानांत सहस्रावधी ताम्रपट व शिलालेख सांपडतात. इ. स. पूर्वी ३०० वर्षांपेक्षां म्हणजे अशोकाचे पूर्वीचा खात्रीचा लेख अद्यापि सांपडत नाहीं.

रॅपसन, कनिंगहॅम वगैरे ग्रंथकर्त्यांनीं जुन्या नाण्यांपासून काय माहिती मिळविण्यासारखी आहे, त्याचें वर्णन दिलेलें आहे. हीं नाणीं सोन्याचीं, चांदीचीं व तांब्याचीं आहेत. तीं हिंदुस्थानांतील सर्व भागांत सांपडतात. ज्या राजांनीं तीं काढलीं त्यांचीं, कधीं कधीं त्यांच्या बापांचीं नांवें व क्वचित् प्रसंगीं तीं सुरू झाल्याचीं सालें त्यांवर दिलेलीं आढळतात.

बाण कवीचें हर्षचरित्र व बिल्हण कवीचें विक्रमांकचरित ह्यांत ऐतिहासिक माहिती मिळते. बंगाल्यांतील पाल राजांची माहिती ज्यांत आहे असें रामचरित्र नांवाचें काव्य अलीकडे सांपडलें आहे. तसेंच तामिल काव्यांत दक्षिणेंतील राजांची माहिती आहे.

हिंदुस्थानचा इतिहास व्यवस्थितपणें लिहिण्यास एक मोठी अडचण आहे ती ही कीं, या देशांत शक किंवा वर्षें देण्याच्या भिन्न भिन्न रीति आहेत. कनिंगहॅमचे हिंदुस्थानांतील शकांचे पुस्तकांत विसापेक्षां ज्यास्त शकपद्धति दिल्या आहेत, व आणखीही पुष्कळ सांपडतील. वेगवेगळे प्रांतांतलि वेगवेगळे राजे गादीवर बसले तेव्हांपासून किंवा त्यांचे राज्याभिषेकापासून त्या त्या प्रांतांत वर्षें मोजण्याचे प्रकार आढळतात. त्या सर्वांचा मेळ घालणेस फार प्रयास पडतात. परंतु विद्वान् शोधकांना या कामीं अलीकडे बरेंच यश आलें आहे.

## ३४. निजनीज माझ्या बाळा

बा नीज गडे नीज गडे लडिवाळा !
निज नीज माझ्या बाळा ॥ ध्रु० ॥

रवि गेला रे सोडुनि आकाशाला,
धन जैसें दुर्भाग्याला.
अंधार वसे चोहोंकडे गगनांत,
गरिबाच्या जेंवि मनांत.
बघ थकुनि कसा निजला हा इहलोक,
मम आशा जेंवि अनेक.
॥ चाल ॥ खडबड हे उंदिर करिती,
कण शोधायातें फिरती,
परि अंतीं निराश होती;
लवकरि हेही सोडितील सदनाला;
गणगोत जसें अपणाला. ॥ १ ॥

बहु दिवसांच्या जुन्या कुडाच्या भिंती;
कुजुनी त्या भोंकें पडती.
त्यांमधुनी त्या दाखविती जगताला
दारिद्र्य आपुलें बाळा.
हें कळकीचें जीर्ण मोडकें दार
करकरकर वाजे फार;
हें दुःखानें कण्हुनि कथी लोकाला
दारिद्र्य आपुलें बाळा.

॥ चाल ॥ वाहतो फटींतूनि वारा,
सुकवीतो अश्रूधारा ;
तुज नीज म्हणे सुकुमारा !
हा सूर धरी माझ्या या गीताला
निज नीज माझ्या बाळा ! ॥ २ ॥
जोंवरती हें जीर्ण झोपडें आपुलें
दैवानें नाहीं पडलें,
तोंवरतीं तूं झोंप घेत जा बाळा
काळजी पुढें देवाला !
जोंवरती या कुडींत राहिल प्राण,
तोंवरि तुज संगोपीन;
तदनंतरची करूं नको तूं चिंता;
नारायण तुजला त्राता.
॥ चाल ॥ दारिद्र्या चोरिल कोण ?
आकाशा पाडिल कोण ?
दिग्वसना फाडिल कोण ?
त्रैलोक्यपती आतां त्राता तुजला,
निज नीज माझ्या बाळा ! ॥ ३ ॥
तुज जन्म दिला सार्थक नाहीं केलें;
तुज कांहिं न मीं ठेवीलें.
तुज कोणी नसे, छाया तुज आकाश
धन दारिद्र्याची रास;
या दाहि दिशा वस्त्र तुला सुकुमारा
गृह निर्जन रानीं थारा;

तुज ज्ञान नसे अज्ञानाविण कांहीं,
भिक्षेविण धंदा नाहीं.
॥ चाल ॥ तरि सोडुं नको सत्याला,
धन अक्षय तेंच जिवाला,
भावें भज दीन दयाळा,
मग रक्षिल तो करुणासागर तुजला.
निज नीज माझ्या बाळा ! ॥ ४ ॥

# ३५. ग्रहणें

सहस्त्ररश्मि प्रकाशलेला आहे, सर्व लोक आपल्या कामांत मग्न आहेत, पशुपक्ष्यादि प्राणी भक्ष्यादिकांच्या उद्योगांत आहेत, इतक्यांतें अकस्मात् अंधकार पडला, रात्र होण्याची वेळ नसतां रात्र झाली; अथवा सगळया कलांनीं प्रकाशलेल्या चंद्राचें आनंददायक चांदणें पडलें असतां तें एकदम नाहींसें होऊन चंद्र काळा ठिक्कर पडला, तर मनुष्यादि सर्व प्राण्यांस अति आश्चर्य वाटेल, फार भीति उत्पन्न होईल, आणि ते वेडयासारखे होतील. कधीं कधीं असें होतें असें ज्यांस स्वानुभवानें किंवा परंपरागत गोष्टी ऐकून माहीत नसेल त्यांची अवस्था तर विलक्षणच होईल. पशुपक्ष्यादि प्राणी आणि रानटी लोक ह्यांस परंपरागत इतिहास कोठचा, आणि त्यांस स्वानुभवाचें स्मरण कोठचें राहणार ? कोलंबस अमेरिकेंत गेला होता, तेव्हां तो एका बेटांत असतां तेथले लोक त्यास अन्नादि सामुग्रीचा पुरवठा करीत असत. परंतु पुढें कांहीं कारणानें त्यांचें आणि कोलंबसाच्या लोकांचें वैमनस्य आल्यामुळें बेटांतले लोक पुरवठा करीतनासे झाले. अशा संधीस खग्रास चंद्रग्रहण आलें. तें कोलंबसास समजलें होतें. त्यानें त्या लोकांस सांगितलें कीं, “ तुम्हावर देवाचा कोप झाला आहे. त्याचें चिन्ह आज रात्रीं तुम्हांस दिसेल. एकाएकीं अंधार पडेल, चंद्र प्रथम काळा दिसेल, आणि मग लाल दिसूं लागेल. ” त्याप्रमाणें रात्रीं झालें. तेव्हां त्या लोकांस अतिशय भीति वाटून त्यांनीं कोलंबसास तात्काळ धान्यादिक आणून दिलें. विद्याचारसंपन्न देशांत देखील आद्यस्थितींत खग्रास ग्रहणांनीं मनुष्याची अशीच स्थिति कांहीं काल असेल.

खग्रास सूर्यग्रहणें पुष्कळ होतात. तरी एकाच स्थलीं तीं फार थोडीं दिसतात. लंडनमध्यें इ. स. ११४० या वर्षी खग्रास सूर्यग्रहण पडलें, त्यावर पुन्हा इ. स. १७१५ मध्यें झालें. म्हणजे मध्यें पावणे-

सहाशें वर्षांत मुळींच झालें नाहीं. असें आहे यामुळें ग्रहणाविषयीं ऐकून माहिती असली तरी तें प्रत्यक्ष पाहून मनुष्य आश्चर्यभरित आणि चकित झाल्यावांचून राहाणार नाहीं. प्राचीन कालीं एकदा आशिया-मायनारांतील मीडिया आणि लीडिया या प्रांतांतील लोकांचें युद्ध चाललें होतें. त्यासंबंधाचें वर्णन हिरोडोटसनें केलें आहे. त्यांत तो म्हणतो: " पांच वर्षें युद्ध चाललें. कधीं या पक्षाचा जय होई, कधीं त्या पक्षाचा होई. सहावे वर्षीं एकदा दोन्ही सैन्यें युद्धाच्या कडाक्यांत गुंतलीं असतां अकस्मात् दिवसाची रात्र झाली. तेव्हां उभय पक्षांस भीति पडून त्यांचा तह झाला." हें ग्रहण कधीं झालें याविषयीं ज्योतिष्यांचा बरेच दिवस मतभेद होता. हल्लीं इंग्लंडच्या एरी नामक प्रख्यात ज्योतिष्यानें गणित करून ठरविलें आहे कीं, तें इ. स. पूर्वीं ५८४ या वर्षीं मेच्या २८ व्या तारखेस झालें. हिरोडोटसच्या लिहिण्यावरून हेंच वर्ष निघतें. प्राचीन इतिहासांत अशीं ग्रहणांचीं वर्णनें आणखी बरींच आहेत. त्यांतील बहुतेकांचा संबंध लढायांशीं आहे. " अकस्मात् सूर्य दिसेनासा झाला, यामुळें कोणी लोक शहर सोडून गेले "; " सैन्य कूच करणार इतक्यांत अभ्रें नसतां सूर्य दिसेनासा झाला आणि दिवसाची एकाएकीं रात्र झाली, यामुळें सैन्याचें जाणें राहिलें "; "आरमार युद्धाच्या अगदीं तयारींत आहे इतक्यांत अकस्मात् काळोख पडला, खलाशांस भीति पडली, मुख्य सुकाणूंवाला गोंधळून गेला "; " सैन्य समुद्रांतून जात असतां इतका अंधार पडला कीं दिवसास नक्षत्रें दिसूं लागलीं, सैन्य घाबरून गेलें "; " सूर्यमंडळ झांकून गेलें, त्याच्या बिंबाभोंवतीं किरीट आहे असें दिसलें, व तेणेंकरून राजा मरण पावणार असें भविष्य दिसून आलें "; अशीं वर्णनें इतिहासांत आढळतात. इ. स. ११४० मध्यें इंग्लंडांत खग्रास सूर्यग्रहण झालें, त्याच असें वर्णन आहे कीं, " दोनप्रहरचा सुमार होता; लोक जेवणांत गुंतले होते, इतक्यांत अंधार पडला. सूर्य काळा दिसूं लागला, खाण्यास दिसेना, यामुळें कंदील लावावे लागले. लोक

आश्चर्यानें चकित झाले, व अंधकार इतका पडला कीं, आजच प्रलय होतो कीं काय असें त्यांस वाटलें; आकाशांत तारा दिसूं लागल्या." याप्रमाणें वर्णन करून पुढें त्या ग्रहणामुळें अमुक अमुक भयंकर गोष्टी घडल्या असें त्या लिहिणारानें लिहिलें आहे.

महाभारतादिकांत ग्रहणांचें वर्णन पुष्कळ ठिकाणीं आहे. त्यांत बहुधा कांहीं विपरीत किंवा फारशी कधीं न घडणारी गोष्ट घडण्याच्या वेळीं ग्रहण पडलें होतें, अथवा ग्रहण झाल्यावर विपरीत गोष्टी झाल्या, असें वर्णन असतें. या देशांतील बहुतेक क्षत्रियांचा संहार करणारें कौरवपांडवांचें भयंकर महायुद्ध झालें, त्याच्यापूर्वीं नुकतींच एकाच महिन्यांत चंद्राचें व सूर्याचें अशीं दोन ग्रहणें झालीं होतीं, आणि त्यांवरून त्या प्रलयाचें चिन्ह दिसून आलें होतें, असें वर्णन आहे.

गेल्या सोळाशें वर्षांतले अनेक राजांचे शेंकडों ताम्रपट हल्लीं सांपडले आहेत, आणि त्यांवरून या देशाच्या प्राचीन इतिहासाचा पुष्कळ चांगला विश्वसनीय शोध लागत चालला आहे. बहुतेक ताम्रपट एखाद्या पुण्यकारक पर्वाच्या वेळीं ब्राह्मणांस भूमि इत्यादिकांचें दान केल्याच्या संबंधाचे आहेत. सूर्यग्रहण अथवा चंद्रग्रहण यांच्यावेळीं भूमिदान केल्याचा लेख पुष्कळ ताम्रपटांत आहे. ग्रहणाच्यावेळीं भूमिदान केलें असतां फार पुण्य लागतें, चंद्रसूर्यग्रहणांचे वेळीं दिलेलें अक्षय्य होतें, असें धर्मशास्त्रादिकांत सांगितलें आहे.

आमच्या लोकांस प्राचीन काळापासून ग्रहणाचा पुष्कळ परिचय आहे, व त्यासंबंधें त्यांस वास्तविक ज्ञान असावें असें दिसून येतें. अमक्या वर्षीं अमुक ग्रहणें झालीं असे शके ४०० च्या पूर्वींचे लेख आमच्या देशांत सांप्रत उपलब्ध नाहींत हें खरें. तरी खाल्डियन लोकांचीं प्राचीन ग्रहणें चंद्राची गति ठरविण्यास जशीं हिपार्कस याच्या उपयोगीं पडलीं, तशीं प्राचीन ग्रहणें आमच्या देशांतील ज्योतिष्यांच्या उपयोगीं पडलीं असतील असें दिसतें. ग्रहणांवरून सूर्यचंद्रांच्या गति

साधल्या असें आर्यभट्ट आणि ब्रह्मगुप्त यांनीं स्पष्ट लिहिलें आहे, व तशीच परंपरा त्यांच्या पूर्वींचे जे ग्रंथ आहेत त्यांची असली पाहिजे. जेवतां जेवतां अकस्मात् ग्रहण लागलें, आणि तेणेंकरून जेवणही सुचत नाहीं, अशी स्थिति आमच्या लोकांची कधीं झाली नसेल, व पुढें व्हावयाची नाहीं.

—२—

ग्रहणांच्या काळांचें एक चक्र आहे. १८ सौर वर्षें आणि ११ दिवस इतक्या काळांत जीं ग्रहणें ज्या क्रमानें होतात तींच बहुधा त्याच क्रमानें पुढें तितक्या काळांत होतात. सूर्यचंद्र हे राहूबिंदूंत एकदां आल्यापासून पुन्हा सुमारें इतक्या काळानें ते एकाच वेळीं फार थोड्या अंतरानें त्या स्थळीं येतात. त्यांच्या स्थितींत कांहीं कलांचें अंतर पडतें यामुळें, व चंद्राची स्पष्ट गति थोडी कमजास्त होते म्हणून, एका चक्रांतलें एकादें ग्रहण पुढल्यांत कमी होतें आणि एकादें वाढतें. सुमारें १००० वर्षांनीं पुष्कळ फरक पडतो.

"सांप्रत पृथ्वीवर पाप फार झालें, ग्रहणें फार होऊं लागलीं," अशा प्रकारचे उद्गार कधीं कधीं ऐकूं येतात, परंतु त्यांत कांहीं अर्थ नाहीं, हें वरील विवेचनावरून दिसून येईल. "आमच्या लहानपणीं पाऊस फार पडत असे, अलीकडे कमी कमी पडूं लागला," ह्या समजुतींत कदाचित् कांहीं अर्थ असला तर तितकाही ग्रहणाविषयींच्या समजुतींत नाहीं. दोन्ही समजुती एकाच वर्गांतल्या म्हटल्या तरी चालेल. पावसाच्या मानांत विलक्षण फेरफार एका मनुष्याच्या आयुष्यांत होण्याचा तर संभव नाहींच. कालांतरानें फेरफार होत असला तर नकळे; परंतु ग्रहणांची संख्या निदान मनुष्योत्पत्तीपासून तरी नियमित आहे.

पृथ्वीभोंवतीं चंद्र फिरतो आणि चंद्राच्या पलीकडे फार लांब सूर्य आहे. पृथ्वी आणि चंद्र हे दोन्ही गोल अपारदर्शक आहेत. यामुळें सूर्याचा प्रकाश यांवर पडतो, तेव्हां सूर्य जिकडे असतो, त्याच्या

दुसऱ्या बाजूस ह्यांची छाया पडते. रात्रीस पृथ्वीच्या ज्या अंगीं आपण असतों, त्याच्या दुसऱ्या अंगास खालीं सूर्य असतो. म्हणून आपल्या वरच्या बाजूस आकाशांत पृथ्वीची छाया पसरलेली असते. चंद्र नसला तरी ही छाया आपल्या अनुभवास येतच. याप्रमाणेंच अमावास्येच्या दिवशीं सूर्याच्या थेट खालीं चंद्र असला म्हणजे चंद्राची छाया पृथ्वीवर पडली पाहिजे. ह्या छायांमुळें चंद्रसूर्यांस ग्रहणें लागतात. सूर्य स्वयंप्रकाश आहे म्हणून वास्तविक म्हटलें म्हणजे त्यास ग्रहण कधींच नाहीं. म्हणजे त्याजवर कोणाची छाया कधींच पडावयाची नाहीं. परंतु त्याच्या आड चंद्र येऊन चंद्राची छाया पृथ्वीवर पडली, म्हणजे जेथें ती पडते तेथील लोकांस सूर्य दिसत नाहीं. म्हणून ते म्हणतात कीं, सूर्यास ग्रहण लागलें. छाया नसते तेथें सूर्य दिसतच असतो. दिवसास एकादेवेळीं आपण असतों तेथें ऊन असतें आणि कांहीं अंतरावर एखाद्या लहानशा ढगाची सावली पडलेली असते व ती जलद पळत असते, असें पुष्कळ वेळां आपल्या दृष्टीस पडतें. अशीच गोष्ट चंद्राची आहे. ढगापेक्षां चंद्र फार मोठा आहे. त्याची छाया ढगांच्या छायेहून फार मोठी असते. यामुळें पृथ्वीच्या बऱ्याच भागावर ती पसरते.

दिव्याच्या लहानशा ज्योतीसमोर एकादी मोठी दगडाची वाटोळी गोटी धरली, आणि तिची छाया भिंतीवर पाडिली, तर ती वाटोळीच परंतु गोटीहून मोठी पडेल. कांहीं उपायानें ज्योत फार मोठी वाटोळी केली आणि तिच्या समोर एक लहानशी गोटी धरली तर तिची छाया भिंतीवर तिच्याहून लहान पडेल. ती गोटी ज्योतीच्या आड परंतु भिंतीपासून पहिल्यापेक्षां लांब धरिली तर एकादे वेळीं तिची छाया भिंतीवर पोंचणारही नाहीं. ही गोट्यांची छाया शंकूच्या आकाराची पडते. तिला सूचि असेंही म्हणतात. एक फार मोठी वाटोळी ज्योत करा. तिच्या समोरच तिच्याहून लहान असें एक लिंबू धरा. ज्योत व लिंबू यांमध्यें लिंबाहून फार लहान अशी एक गोटी धरा. गोटी हा

चंद्र, लिंबू ही पृथ्वी, आणि ज्योत हा सूर्य, अशी कल्पना करा. ज्योत आणि लिंबू यांच्यामध्यें गोटी आणा. तिहींचे मध्यबिंदु एका सरळ रेषेंत येतील असें करा. गोटीची लहानशी छाया लिंबावर पडेल इतकी लांब ती गोटी धरा. छायेंतील लोकांस ज्योत मुळींच दिसणार नाहीं; तिला खग्रास ग्रहण लागलें. छायेच्या भोंवतीं पुसट छाया पडलेली दिसेल; तिला छायाकल्प म्हणतात. तींतिल लोकांस सूर्याचा कांहीं भाग दिसत नाहीं. त्यांस खंडग्रहण दिसतें. छायाकल्पाबाहेर ज्योतीचा पूर्ण प्रकाश पडलेला असेल तेथें ग्रहण मुळींच नाहीं. गोटी प्रथम धरिली होती तेथून अंमळ दिव्याकडे नेऊन तिची छाया लिंबावर मुळींच पोंचणार नाहीं असें करा. ज्योत आणि गोटी ह्यांच्या मध्यबिंदूच्या समोरचा जो लिंबावरचा बिंदू तेथें एकादी मुंगी असली तर तिला कंकणाच्या आकाराची ज्योतीची वाटोळी कडा दिसून मधल्या भागाच्या आड गोटी आल्यामुळें ती दिसणार नाहीं; म्हणजे कंकणग्रहण लागलें. मग लिंबाच्या छायेंत गोटी आणा. ज्योत आणि गोटी ह्यांच्या थेट मध्यें लिंबू असलें तर गोटी सगळी छायेंत सांपडेल. तिला खग्रास ग्रहण लागलें. गोटी अंमळ वर किंवा खालीं केली, अशी कीं तिच्या थोड्याशा भागावर उजेड पडेल, तर तिला खंडग्रहण लागलें.

सपाट जमिनीवर एक मोठी बांगडी व तिच्या आंत एक बरीच लहान बांगडी ठेवा. दोन्ही बांगड्या एका सपाटीवर आहेत. ह्या एका पातळींत आहेत असें म्हणतात. चंद्रकक्षा आणि क्रांतिवृत्त हीं आकाशांत अशींच एका पातळींत असतीं तर दर पूर्णिमेस चंद्र आणि भूमि यांचें आणि दर अमावास्येस चंद्र व सूर्य यांचें दक्षिणोत्तर अंतर शून्य झालें असतें. परंतु दोहोंच्या पातळयांत ५ अंशांचा कोन आहे. त्या पातळया दोन ठिकाणीं परस्परांस छेदितात. त्या बिंदूंस राहुकेतु म्हणतात. राहुकेतूंत किंवा त्यांच्याजवळ चंद्र असतो, म्हणजे क्रांतिवृत्ताच्या जवळच चंद्र असतो, तेव्हां सूर्यही तेथेंच असला तर त्याच्याआड चंद्र येतो; किंवा भूछाया तेथें असली तर तींत चंद्र सांपडतो, यामुळें ग्रहणें होतात.

राहुकेतूपासून चंद्र लांब असला तर तो क्रांतिवृत्तापासून लांब असतो, यामुळें तो सूर्याच्या आड येत नाहीं, किंवा भूछायेंत सांपडत नाहीं, यामुळें ग्रहण होत नाहीं. एकदा पूर्णिमेस किंवा अमावास्येस ग्रहण झाल्यापासून पुढें एक किंवा दोन पर्वांस ग्रहणें होतात, म्हणजे लगत दोन किंवा तीन होतात. कधीं एकच होतें व त्यापुढें पांच किंवा साडेपांच किंवा सहा चांद्र महिन्यांनीं पुन्हा ग्रहण होतें. चंद्रग्रहण नेहमीं पूर्णिमेस आणि सूर्यग्रहण अमावास्येस होतें. सूर्यग्रहण लागण्या-पूर्वीं सूर्याच्या पश्चिमेस चंद्र असतो, परंतु तो जलद चालणारा असल्या-मुळें सूर्याचें बिंब ओलांडून कांहीं वेळानें सूर्याच्या पूर्वेस येतो. पश्चिमेकडून चंद्र येतां येतां सूर्याच्या पश्चिम कडेच्या आड तो येतांच सूर्यास त्या दिशेनें ग्रहण लागूं लागतें; तेव्हां ग्रहणाचा स्पर्श झाला असें म्हणतात. अर्थात् सूर्यग्रहणाचा स्पर्श सूर्यबिंबाच्या पश्चिमेकडून होतो, आणि पुढें सूर्यबिंबाचा अधिकाधिक भाग आच्छादित होऊं लागतो. नंतर कांहीं वेळानें तो कमी व्हावयास लागून सूर्याच्या पूर्व-बाजूनें चंद्र सूर्यास मोकळा करितो, म्हणजे ग्रहण सुटतें व त्यावेळीं ग्रहणाचा मोक्ष झाला असें म्हणतात. मोक्ष याचा अर्थ सुटका असा आहे. ह्याप्रमाणेंच भूछायेच्या पश्चिमेकडून चंद्र येऊन पूर्वेस जातो. यामुळें त्याचा पूर्वभाग प्रथम आच्छादित होतो आणि पश्चिमभाग शेवटीं छायेंतून बाहेर पडतो. म्हणून चंद्रग्रहणाचा स्पर्श बिंबाच्या पूर्वेकडून आणि मोक्ष पश्चिमेकडून होतो. बिंबाचा जितका भाग आच्छादित होतो, तितका ग्रास झाला असें म्हणतात. त्यावेळीं जो भाग आच्छादित होतो, तो ग्रास पंचांगांत लिहितात, आणि ग्रहणाची आकृति पंचांगांत काढितात तींत दाखवितात. ग्रास याचा अर्थ खाणें असा आहे. राहू सूर्यास ग्रासितो अशी मूळची कल्पना होती, तिज-वरून ग्रास ही संज्ञा प्रचारांत आली असावी.

चंद्रसूर्यांचीं बिंबें विस्तारानें बहुधा सारखींच दिसतात. तरी पृथ्वी आणि चंद्र यांच्या कक्षा दीर्घवर्तुळ असल्यामुळें चंद्रसूर्यांचें पृथ्वीपासून

अंतर नेहमीं समान नसतें, कमजास्त होतें, त्यामुळें बिंबें लहानमोठीं दिसतात. कक्षेंतला जो बिंदु मध्यवर्ति ज्योतीपासून लांब असतो त्यास उच्च म्हणतात, आणि जवळ असतो त्यास नीच म्हणतात. सूर्य डिसेंबर अखेर आपल्या कक्षेंत नीचीं असतो आणि जून अखेर उच्चीं असतो. चंद्र सुमारें २७॥ दिवसांत एकदा आपल्या कक्षेच्या नीचीं आणि एकदा उच्चीं येतो. चंद्रसूर्य उच्चीं असतात तेव्हां त्यांचीं बिंबें लहान दिसतात, आणि नीचीं असतात तेव्हां मोठीं दिसतात. चंद्र नीचीं आणि सूर्य उच्चीं असतां सूर्यबिंबाहून चंद्रबिंब बरेंच मोठें दिसतें. अशावेळीं ग्रहण झालें तर तें खग्रास होतें. सूर्यबिंबाहून चंद्रबिंब लहान असतें तेव्हां कंकणग्रहण होतें. खग्रास होतें तेव्हां चंद्राची छाया पृथ्वीवर पडते, तिचा व्यास फारतर १८० मैल असतो. यामुळें इतक्या रुंदीचा पृथ्वीचा जितका पूर्व-पश्चिम पट्टा सूर्यबिंबावरून चंद्र पलीकडे जाईपर्यंत ( दैनंदिन गतीमुळें ) छायेंत येतो, तेथें मात्र खग्रास ग्रहण होतें, कंकणग्रहणांत तें कंकण दिसण्याचा पट्टा सुमारें १०० मैल रुंद असतो. त्या पट्ट्याच्या उत्तरेस व दक्षिणेस तींच ग्रहणें खंडित मात्र दिसतात. त्यामुळें स्थल विशेषीं खग्रास किंवा कंकण सूर्यग्रहण फार वर्षांनीं दिसतें. खग्रास सूर्यग्रहणांत सूर्य अगदीं आच्छादिलेला असा फार तर ८ मिनिटें असतो, आणि कंकणग्रहण फार तर ३१ पळें दिसतें. पृथ्वीच्या छायेचा व्यास चंद्रबिंबाहून पुष्कळ मोठा असतो. कधीं कधीं तो चंद्रबिंबाच्या तिप्पट असतो. म्हणजे ग्रहणाच्या वेळीं भूमि आणि चंद्र यांचे मध्यबिंदु एका ठिकाणीं आले तर चंद्राभोंवतीं चंद्रबिंबाच्या दीडपट रुंदीचें भूमिवेष्टन असतें. यामुळें चंद्रास कंकणग्रहण कधींही लागावयाचें नाहीं. भूछायेंतून जाण्यास चंद्रास फार वेळ लागतो म्हणून खग्रास चंद्रग्रहण फार वेळ दिसतें. यावेळीं चंद्राचा ग्रास होऊन ख म्हणजे आकाश त्याचाही होतो, म्हणून त्यास खग्रास ग्रहण म्हणतात. भोंवतीं छायाकल्प असतो त्यांत चंद्र येतो तेव्हां अंमळ निस्तेज दिसतो यामुळेंच खग्रास चंद्रग्रहणांत स्पर्शापूर्वी व नंतर कांहीं वेळ चंद्र फिकट

दिसत असतो. चंद्रग्रहणाच्या वेळीं पृथ्वीवर चंद्र जेथें जेथें दिसेल तेथें तेथें चंद्रग्रहण दिसतें, व तें सर्वत्र सारखें दिसतें; कमजास्त दिसत नाहीं.

खग्रास चंद्रग्रहणांत चंद्राच्या व आपल्यामध्यें कोणी आलेलें नसतें. फक्त त्यावर छाया पडलेली असते व त्यावेळीं सूर्याचे किरण प्रत्यक्ष पडत नाहींत, तरी ते पृथ्वीच्या वातावरणांतून वक्रीभवन पावून त्यावर पडतात. त्यामुळें तो अगदीं काळा दिसत नाहीं; किंचित् प्रकाशित दिसतो.

## ३६. स्फुट अभंग

१

कन्या सासुऱ्यासि जाये । मागें परतोनि पाहे ॥ १ ॥
तैसें झालें माझ्या जिवा । केव्हां भेटसी केशवा ॥ २ ॥
चुकलिया माये । बाळ हुरूहुरू पाहे ॥ ३ ॥
जीवना वेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥ ४ ॥

२

हेचि वेळ देवा नका मागें घेऊं । तुम्हांविण जाऊं शरण कोणा ॥ १ ॥
नारायणा ये रे पाहे विचारून । तुजविण कोण आहे मज ॥ २ ॥
रात्रंदिस तुज आठवूनि आहे । पाहतोसी काये सत्व माझें ॥ ३ ॥
तुका म्हणे किती येऊं काकुळती । कांहीं माया चित्तीं येऊं द्यावी ॥ ४ ॥

३

तुजलागीं माझा जीव झाला पिसा । अवलोकितों दिशा पांडुरंगा ॥ १ ॥
सांडिला व्यवहार माया लोकाचार । छंद निरंतर हाचि मनीं ॥ २ ॥
आइकिलें कानीं तें रूप लोचन । देखावया शीण करिताती ॥ ३ ॥
प्राण हा विकळ होय कासावीस । जीवनाविण मत्स्य तयापरी ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां कोण तो उपाव । करूं तुझे पाव आतुडे तो ॥ ५ ॥

४

ओस झाल्या दिशा मज भिंगुळवाणें । जीवलग नेणें मज कोणी ॥ १ ॥
भय वाटे देखे श्वापदांचे भार । नव्हे मज धीर पांडुरंगा ॥ २ ॥
अंधकारापुढें न चलवे वाट । लागतील खुंट कांटे अंगा ॥ ३ ॥
एकला निःसंग फांकती मारग । भितों नव्हे लाग चालावया ॥ ४ ॥
तुका म्हणे वाट दावूनि सद्गुरु । राहिला हा दुरू पांडुरंग ॥ ५ ॥

५

करावा वर्षाव । तृषाक्रांत झाला जीव ॥ १ ॥
पाहें आकाशाची वास । जाणतां तूं जगदीश ॥ २ ॥
अवघी निवारावी भूक । अवघ्या दुःख जन्माचें ॥ ३ ॥
तुका म्हणे बोलवेना । लावी स्तना ईश्वरें ॥ ४ ॥

६

उजळलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली ॥ १ ॥
संतदर्शनें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥ २ ॥
संपुष्ट हे हृदयपेटी । करूनि पोटीं साठवूं ॥ ३ ॥
तुका म्हणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥ ४ ॥

७

धन्य मी मानीन आपुलें संचित । राहिलीसे प्रीत तुझे नामीं ॥ १ ॥
धन्य जालों आतां यासी संदेह नाहीं । न पडो या वाहीं काळां हातीं ॥२॥
ब्रह्मरस करूं भोजन पंगती । संतांचे संगतीं सर्वकाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे पोट धालोंचि न धाये । खादलेंचि खायें आवडीनें ॥ ४ ॥

८

जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनियां ॥ १ ॥
चालों वाटे आम्ही तुझाचि आधार । चालविसी भार सवें माझा ॥ २ ॥
बोलों जातां बरळ करिसी तें नीट । नेली लाज धीट केलों देवा ॥ ३ ॥
अवघे जन मज झाले लोकपाळ । सोइरे सकळ प्राणसखे ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां खेळतों कौतुकें । झालें तुझें सुख अंतर्बाहीं ॥ ५ ॥

९

दीप घेऊनियां धुंडिती अंधार । भेटे हा विचार अघटित ॥ १ ॥
विष्णुदास आम्हीं न भ्यों कळिकाळा । भुलों मृगजळा न घडे तें ॥ २ ॥
उधळितां माती रविकळा मळे । हें कैसें न कळे भाग्यहीना ॥ ३ ॥
तुका म्हणे तृणें झांके हुताशन । हें तंव वचन वाउगोंचि ॥ ४ ॥

१०

आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो जाला सोहळा अनुपम्य ॥ १ ॥
आनंदें दाटलीं तिन्हीं त्रिभुवनें । सर्वात्मकपणें भोग झाला ॥ २ ॥
एकदेशीं होतों अहंकारें आथिला । त्याच्या त्यागें झाला सुकाळ हा ॥ ३ ॥
फिटलें सुतक जन्ममरणाचें । मी माझ्या संकोचें दुरी झालों ॥ ४ ॥
नारायणें दिला वसतीस ठाव । ठेवूनियां भाव ठेलों पायीं ॥ ५ ॥
तुका म्हणे दिले उमटूनि जगीं । घेतले ते अंगीं लावूनियां ॥ ६ ॥

# ३७. आनंदवनभुवन

तुटलेले कडे आणि दाट व विपुल झाडी या योगें महाराष्ट्रांतील वसता विरळ होती, परंतु अशा प्रदेशांतून प्रवास करणेंही मोठें धोक्याचें व कठिण असे. गजबजलेल्या शहराचें येथें नांवच घ्यावयास नको. कापड, धातूचीं भांडीं आणि गोदावरी व कृष्णा यांच्या खोऱ्यांतील सुगंधी द्रव्यें या रस्त्यानें बंदरावर पोहोंचून तेथून युरोपांत रवाना होत. येवढ्यामुळें याला व्यापाराची पेठ म्हणावयाचें असेल तर खुशाल म्हणावें. परंतु खरी व्यापारी पेठ असल्या प्रदेशांत असणें शक्यच नाहीं. सैन्याच्या हालचाली नाहींत. हा प्रदेश फारच बिकट. निसर्गतःच हा देश विभागलेला असल्यामुळें तेथील वस्तीही स्वतंत्र व भागशः झालेली आहे. क्वचित् प्रसंगीं कोणी प्रवासी, व्यापारी अगर एखादा लुटारू या बाजूला डोकावीत असे, तेवढाच बाहेरच्या जगाशीं या लोकांचा संबंध येई; बाकी बाहेर जग आहे असें यांना वाटावयाचें कांहीं कारणच नसे. नाहीं म्हणावयाला इराण, अरबस्तान, अबिसीनिया आणि मध्यएशिया येथील लढाऊ लोक सैन्यांतील नोकरीच्या आशेनें गुलबुर्गा, बेदर, अहमदनगर, विजापूर, गोवळकोंडा या बादशाहीमध्यें याच प्रदेशांतून वारंवार जात असत हीच काय ती तेथील रहदारी होय.

मराठे हे मूळचे कांटक व हाडापेरानें मजबूत असल्यामुळें कोणत्याही सैन्यांत त्यांचा सहज प्रवेश होई. त्यावेळीं दक्षिणेंत अनेक शाह्या असून त्या एकमेकींचा पाडाव करण्यासाठीं नेहमीं टपून बसलेल्या असत. शेतकीची दैन्यावस्था व नोकरीची सुबत्ता असल्यामुळें मराठ्यांचें लक्ष साहजिकपणेंच शेतकीवरून अगदींच उडून गेलें होतें. एखाद्यानें पुढारीपणा घेऊन शेंपन्नास पुंड लोकांची टोळी जमविली कीं त्याला पागेदारी किंवा सरदारी सहज मिळत असे. किंबहुना असा इसम आपल्याच नोकरींत असावा याबद्दल अहमहमिका सुरू होत असे. आणि अशा रीतीनें एकदां येथून निघून गेलेले रहिवासी पुन्हां या

प्रांतांत क्वचितच येत असत. कारण जिकडे त्यांना जहागीर मिळे तिकडेच ते कायमचे जाऊन रहात असत.

मराठे जात्याच स्वातंत्र्यप्रिय आहेत. उंच शिखरें व तुटलेले कडे यांच्या जणूं मजबूत भिंतीच महाराष्ट्रास असल्याकारणानें कोणासही येथील पठारावर येण्यास फार श्रम लागतात. त्यांतून अनेक संकटग्रस्त राजांनीं वेळोवेळीं याच स्थानांचा आश्रय घेऊन येथें मजबुती केलेली आहे. बहुतेक ठिकाणीं जिवंत पाण्याचे झरे असून ऋतुपरत्वें पडणाऱ्या पावसाचें पाणी सांठवून ठेवण्याचीही उत्कृष्ट सोय तेथें आहे. अशा प्रकारांनीं हा प्रदेश सुरक्षित असल्यामुळें मराठ्यांची मूळची स्वातंत्र्यप्रियता वृद्धिंगत झालेली आहे; महाराष्ट्रांतील अभेद्य किल्ले व दुर्गम वाटा यांनींही स्वातंत्र्याकांक्षेची जोपासनाच केलेली आहे; एखाद्या सपाट प्रदेशाप्रमाणें हा प्रांत घोडदळाच्या जोरावर कोणी सर करूं म्हणेल तर ती आशाच नको. त्यांतूनही एखाद्यानें येथील कांहीं भाग हस्तगत केलाच तर तो त्याची पाठ वळतांच पुन्हां येथील रहिवाशांच्या हातांत गेलाच म्हणून समजावें.

अशा बिकट प्रदेशांतील रहिवासी आळशी व ऐदी असणें शक्यच नाहीं. खेड्यांतील पाटलांना सुद्धां स्वताच्या जमिनीची मशागत करून बाकीच्या वेळांत करवसुली, पंचायत आणि गांवराखणीचें काम करावें लागत असे. लक्षाधीश असा येथें गवसणें मुळींच संभवनीय नाहीं. एखादा लहानसा व्यापारी कोठें कोठें आढळावयाचा व तोच व्याजबट्ट्याचाही धंदा करी. मोठमोठ्या जमीनदार पाटलांजवळ सुद्धां सोनें अगर नाणें दिसावयाचें नाहीं, धान्य मात्र मुबलक असे. राजकारणांत मराठे पुढें सरसावले तरीही त्यांना प्रजानुरंजन साधलें नाहीं. मुसलमानांच्या ‘ आप लीजिये ’ ‘आप लीजिये’ मानमरातबापुढें मराठ्यांचें सरळ वर्तन उद्धटपणाचें वाटे. मराठ्यांची सामाजिक राहणी अगदीं साधी असल्यामुळें चित्ताकर्षकपणा असा तिच्यांत नसे. डामडौल व ऐट मरा-

ठ्याला ठाऊक नाहीं. घाड्यावर बसण्यांत तो अत्यंत पटाईत असे खरा परंतु त्याच्या बैठकींत मोहकपणा मुळींच नसे. मराठ्यांच्या कारकीर्दींत कोणत्याही नाजुक कलेची उन्नति अगर जोपासनाही झालेली दिसत नाहीं. पेशव्यांनीं बांधलेले वाडेसुद्धां अगदींच साधे आहेत. लहान लहान खोल्या, अरुंद जिने, भिकार बांधणी, ठेंगणा कद परंतु खोदीव-काम मात्र पुष्कळ, असें या वाड्यांचें थोडक्यांत वर्णन सांगतां येईल. सारांश, मराठ्यांचें लक्ष सौंदर्यापेक्षां उपयुक्ततेकडे विशेष होतें हें यावरून सिद्ध होतें.

वर सांगितल्याप्रमाणें महाराष्ट्राची भूमि व हवा नाजूकपणाला प्रतिकूल असली तरी कित्येक बाबतींना ती फार अनुकूलही आहे हें विसरून चालावयाचें नाहीं. मराठ्यांचा आत्मप्रत्यय, मराठ्यांचें धैर्य, मराठ्यांचा दीर्घोद्योग, मराठ्यांचा कडक साधेपणा, मराठ्यांचा न्यायीपणा, मराठ्यांची सामाजिक समानता आणि मराठ्यांचा स्वाभिमान हे सद्गुण अनन्य साधारण आहेत. ह्यूएनत्संग हा चिनी प्रवासी इसवी सनाच्या सातव्या शतकांत हिंदुस्थानांत आला होता. त्यानें मराठ्यांबद्दल पुढील-प्रमाणें लिहून ठेवलें आहे. “ मराठा हा मोठा मानी व युद्धोत्सुक असतो. उपकारकर्त्याविषयीं तो कृतज्ञ व अपकारकर्त्याचा सूड घेणारा असतो. शरणागतासाठीं तो प्राण देण्यास तयार असतो, परंतु शत्रूचे प्राण हरण करण्यासहि तो मागें पहात नाहीं. चपलता, धैर्य, आत्मप्रत्यय, स्वाभिमान आणि समानतेची आवड हे सद्गुण आजही मराठ्यांत दिसतात. गोदावरी व कृष्णा या नद्यांच्या कांठीं त्यांचीं असलेलीं विस्तीर्ण राज्यें चौदाव्या शतकांत नाहींशीं झाल्यावर ते पश्चिमेकडेस रुक्ष प्रदेशांत रेटले गेले व तेथें त्यांना दारिद्र्य व एकांतवास सहन करावा लागला. क्रूर श्वापदाशीं व निष्ठुर निसर्गाशीं त्यांना सतत झगडावें लागल्यामुळें त्यांच्या मूळच्या शौर्यांत आणि काटकपणांत दूरदृष्टीची व चातुर्याची भरच पडली. धैर्य, चातुर्य, सहनशक्ति, छापे घालणें,

अडचणींतून निसटून जाणें, प्रसंगानुसार वरिष्ठांच्या हुकमाची वाट न पाहातां एकदम युद्धक्षेत्र बदलणें या गुणांत मराठ्यांची बरोबरी निदान आशियां खंडांत तरी थोडीफार अफगाण लोकच करूं शकतील. इतर कोणीही करूं शकणार नाहींत."

सोळाव्या शतकांतील मराठ्यांत गरीब व श्रीमंत हा भेद मुळींच नव्हता. लढवय्या आणि मेहनती या नात्यानें गरिबालाही किंमत होती. बहुजनसमाज साधारणतः गरीबच असल्याकारणानें प्रत्येक गरीब मराठा स्वाभिमानी असे. विशेषतः दिल्ली-आग्र्याकडे धंदेवाईक भिकारी जसे शेंकड्यानें मोजण्याइतके होते तसा स्वाभिमानशून्य प्रकार महाराष्ट्रांत मुळींच नव्हता. महाराष्ट्रांत पडद्याची चाल नसल्यानें स्त्री-पुरुष निरोगी राहिले आणि त्यांची संततीसुद्धां तशीच निपजली. यावेळच्या धार्मिक चळवळीचा हेतु ही समाजांतील उच्चनीय भावनांचा लोप करण्याकडे विशेष होता. मनुष्याची थोरवी त्याच्या जन्मावर अवलंबून नसून कृतीवर अवलंबून आहे या मताचा प्रसार जोरानें झाला व वारकरी पंथानें या प्रसाराला फारच मोठी मदत केली. पंढरीला दरवर्षीं आषाढी कार्तिकी एकादशीस फार मोठी यात्रा भरत असून त्या यात्रेंत समानता व प्रेम उंचबळून आलेलें अद्यापि ही दृष्टिगोचर होत आहे.

सोळाव्या शतकांत ज्याप्रमाणें युरोपांत प्रोटेस्टंट धर्मसुधारक निघाले त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतही भाषा, समाज, व धर्म यांच्यांत मोठी क्रांति घडवून आणणारे महन्त उत्पन्न झाले. विशेषतः हा क्रांतीचा प्रयत्न पंधराव्या व सोळाव्या शतकांत महाराष्ट्रांत अधिक परिणामकारक असा दृष्टीस पडतो. या सुधारणेचा मूळ हेतु चित्तशुद्धि, सार्वत्रिक प्रेम व इतर सद्गुणांचा विकास व्हावा असाच होता. हें सुधारणेचें काम एका विशिष्ट वर्गानेंच केलें नसून सर्व समाजानें केलेलें आहे. या चळवळीचा पुढारी साधू व सिद्ध, कवी आणि तत्त्ववेत्ते, शुद्धाचरणी व समाजनेते, यांच्याकडेच होता; व आश्चर्य हें कीं, असले महात्मे सोनार, चांभार, कुंभार, शिंपी, न्हावी, वाणी किंबहुना महार

जातींत सुद्धा उत्पन्न झाले. मग ब्राह्मणवर्णांत उत्पन्न झाले होते हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, एकनाथ, नामदेव, तुकाराम, रामदास, गोराकुंभार, सेना-न्हावी, नरहरी सोनार, चोखामेळा हीं संत मंडळींचीं नांवें महाराष्ट्रीयांच्या नित्य परिचयाचीं आहेत. कोणत्या तरी निमित्तानें विशिष्ट दिवशीं पुण्यक्षेत्रीं हजारों लोकांची जत्रा भरविणें यांत फार मोठा अर्थ भरलेला आहे. अशा जत्रांमध्यें जातिविषयक संकुचित भावनांचा अनायासें लोप होतो, विचारविनिमय करितां येतो आणि सर्वांत महत्त्वाची बाब म्हणजे विशिष्ट मत व संस्कृति यांचा सहज प्रसार होतो.

मराठ्यांच्या सद्‌गुणानंतर त्यांच्या स्वभावांतील दोषही दाखविणें क्रमप्राप्त आहे. मुख्य राजसत्ताच जेव्हां आपला व्यवहार लुटालुटींवर चालवी तेव्हां तिचे निरनिराळे अधिकारीही थोड्याबहुत प्रमाणांत लांच वगैरे रूपांत द्रव्यप्राप्ति करून घेत होते यांत नवल नाहीं. चाकराचें नीतिशास्त्र धन्याच्या नीतिशास्त्रावरच अवलंबून असणार हा नियम प्रसिद्धच आहे. साधेपणा, कष्टाळुपणा, समदृष्टि या गुणांत मराठे जसे प्राचीन स्पार्टन किंवा ग्रीक लोकांप्रमाणें होते, तसेंच त्यांच्या द्रव्यप्राप्तीच्या रीतींत तंतोतंत साम्य होतें. मराठ्यांना आपल्या कारकीर्दींत व्यापार व उद्योगाची वाढ करितां आली नाहीं, हा त्यांचा मोठाच दोष होय. एकही प्रसिद्ध व्यापारी किंवा सावकार मराठी राज्यांत पुढें आल्याचें दिसत नाहीं. सारांश, द्रव्योत्पादनशास्त्रांत मराठे अनभिज्ञ होते व त्यामुळें त्यांची राज्यव्यवस्था या दृष्टीनें शेवटपर्यंत कमकुवत राहिली. जगाला आश्चर्यचकित करून सोडणारे पराक्रम करून पेशव्यांनीं विजय संपादन केले. परंतु त्यांचा कर्जबाजारीपणा त्यांस शेवटपर्यंत भोंवला. शिवाजीला व्यापाराकडे लक्ष देण्यास अवधिच सांपडला नाहीं. परंतु त्यानंतरच्या राज्यकर्त्यांनीं या आंगाचा विचार अवश्य करावयास पाहिजे होता.

तथापि मराठ्यांना आज अद्वितीय ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झालेलें आहे. त्यांच्या अगदीं अलिकडील पूर्वजांनीं सुद्धां शेंकडों लढाया मारून धारातीर्थीं आपले देह ठेविले आहेत, व्यवस्थित रीतीनें मोठमोठ्या हालचाली केल्या आहेत, विलक्षण राजकारणें लढविलीं आहेत, राजाची फडणिशी यशस्वीपणें करून साम्राज्यांतील महत्त्वाचे प्रश्न उलगडून दाखविले आहेत. सारांश, त्यांनीं आपल्या कृतीनें हिंदुस्थानचा अगदीं अलिकडचा इतिहास बनविला आहे. हें सर्व पराक्रमाचें स्मरण हेंच मराठ्यांच्या वैभवाचें निदर्शक आहे. बुद्धीची तीक्ष्णता, दीर्घोद्योग, उच्च विचारसरणी, साधी रहाणी, कोणताही सुविचार मनांत आणण्याची धमक, चारित्र्य, 'वसुधैव कुटुंबकं' वृत्ति इतक्या सर्व सद्गुणसमुच्चयांत जर मराठ्यांमध्यें संघटनेचें चातुर्य, सहकारिता, आधुनिक यांत्रिक कलेचें ज्ञान आणि आहे त्याहून अधिक दूरदृष्टि इतक्या सद्गुणांची भर पडेल तर पृथ्वीच्या पाठीवर त्यांची बरोबरी कोणीही करूं शकणार नाहीं.

# ३८. कचोपाख्यान

जनमेजयनृपति पुसे, वैशंपायन कथी सविस्तर; तें ॥
बहु; मीं लेशचि गातो; जग लेशेंही महद्यशें तरतें ॥ १ ॥

झाला ययाति कविचा जामाता; तीच सत्कथा परिसा ॥
या चरितामृतपानें या लोकीं सर्व रसिक हो ! हरिसा ॥ २ ॥

सुरशस्त्रांहीं जे जे भट होती संगरांत असु-रहित ॥
संजीविनीबळें त्यां उठवी करि काव्य नित्य असुर-हित ॥ ३ ॥

ती विद्या सुरगुरुला अवगत नव्हती, म्हणोनि समरांत ॥
बहु मरती; तें पाहुनि न टिके उत्साह-धैर्य अमरांत ॥ ४ ॥

ती विद्या साधाया देवांनीं सद्विचार आठविला ॥
शुक्राकडे स्वगुरुसुत कच विनवुनि, युक्ति कथुनि, पाठविला ॥ ५ ॥,

शिष्यत्वें जाउनि, कच सांगे गुरुदास्यकाम, पद नमुनी ॥
प्रणतीं शत्रु-सुतींही द्रवला तो सुप्रसन्नवदन मुनी ॥ ६ ॥

आराधिला कचें गुरु, गुरुची कन्याहि देवयानी; ती ॥
झाली प्रसन्न सत्वर; शिकविति तैशीच देव या नीती ॥ ७ ॥

असुर म्हणति, 'विद्येनें प्रबळ करायासि देव, या नीचें ॥
मन मोहिलें गुरूचें, गुरुचित्ताहूनि देवयानीचें' ॥ ८ ॥

गुरुगोरक्षण करितां, देवद्वेषें हरूनि असु रानीं ॥
कचमांस वृकांसि दिलें वांटुनि भक्षावयासि असुरांनीं ॥ ९ ॥

गाई गृहासि आल्या, मावळला रविहि, कच न आढळला ॥
तेव्हां सोडुनि धृतिनग शुक्रसुताबुद्धिभूमिला ढळला ॥ १० ॥

शुक्रसुता गहिंवरली; न्हाणी तदुरस्थळासि अश्रु तिचें ॥
कवणाला न प्रिय तें गुणमणिमय केलिमंदिर श्रुतिचें ॥ ११ ॥

तातासि म्हणे, ' आला नाहीं अद्यापि कच; नसे अवधी ॥
लव धीर बुद्धि न धरी माझी; ताता! सुनिष्ठुरा तव धी ॥ १२ ॥
येता मघांचि, असता जरि कुशली, करिति खल अघा; बरवी ॥
गति न दिसेचि कचाची; कुशलिजनविरह असें न घाबरवी ॥ १३ ॥
कच आजि न येतां, मीं प्राण त्यागीन न भरतां घटिका ॥
आण तुझी; जाण खरें; केला निश्चय नव्हेचि हा लटिका ' ॥ १४ ॥
काव्य म्हणे, धैर्य धरी; ' आहे संजीविनी सुधाधारा ॥
उठवूनि आणितों कच, चिंतुनि विश्वंभरा बुधाधारा ' ॥ १५ ॥
मंत्रजप करुनि तो कवि, ' ये रे! वत्सा कचा! ' असें बाहे ॥
भेदुनि वृकोदरें, पल सर्व निघे, त्यांत लेशहि न राहे ॥ १६ ॥
कच येतां बहु हर्षे; ' धन्य ' म्हणे ' मींच कन्यका; मातें ॥
वांचविलें, त्वांचि दिला; या देइल कोण अन्य कामातें ? ' ॥ १७ ॥
त्यावरि, गुरुकन्योक्तें पुष्पें आणावयासि जाय वना ॥
सांपडला त्या असुरां कच, जैसा वत्स एकला यवना ॥ १८ ॥
पुनरपि त्या पापांनीं सद्विप्रकुमार चरचरां चिरिला ॥
भय न धरिलें तिळहि, त्या पापांच्या जोडितां महागिरिला ॥ १९ ॥
खंड तिळप्राय करुनि, नेउनि, केले निमग्न जळधींत ॥
नाहींच धर्म, करुणा, पापभय, विचारलेश खळधींत ॥ २० ॥
जो मुनि तयासि कन्याप्रियकाम, दयाळु काव्य तो तारी ॥
रज गोळा करुनि, घडी शिष्याची मूर्ति, जेविं ओतारी ॥ २१ ॥
पुनरपि तो कच वधिला; केला तद्देह दग्ध रुष्टांनीं ॥
शुक्रासि पाजिलें हो! तद्भस्म सुरारसांत दुष्टांनीं ॥ २२ ॥
कच न दिसतां रडे सुरयानी; तीतें पिता, 'म्हणे कां गे! ॥
वत्से! रडसी?' ऐसें पुसतां, तैसेंचि, ती पुन्हां सांगे ॥ २३ ॥
त्यज शोक, मत्प्रसादें तुज काय उणें असे? नकोचि रडो ॥
दाटुनि माथां वाहुनि दुर्वह दुःखाद्रिला, नको चिरडों ॥ २४ ॥

ती तातासि, ' म्हणे कच गुरुभक्त, कुलीन, साधुकार्यकर ॥
जरि त्यासि सोडिलें जल, तरि जल सोडू मलाहि आर्यकर ॥ २५ ॥
ब्रह्मघ्नां शिष्यांची भीड धरुनि, साधु शिष्य मोकलिला ॥
म्हणतिल; न ऐकवे तें; न स्वहित कवी असें गमो कलिला ' ॥ २६ ॥
स्वमनिं म्हणे कविसत्तम, ' मळवावें पंडितें न यश; हाणी ॥
प्राणांचीहि बरी; परि न यशाची; ' सांगती नय शहाणी ' ॥ २७ ॥
मग मेळवी महात्मा एकत्र समस्त असुर, कोपानें ॥
खवळे प्रियशिष्यभसितमिश्रितमधुच्याहि तज्ज्ञ तो पानें ॥ २८ ॥
असुरांसि म्हणे, ' कां रे ! नेणा अद्यापि मत्तपा ? मरतो – ॥
कीं वांचतो ? पतंग, न भी जो ज्वलनासि मत्त, पामर, तो ॥ २९ ॥
' विप्र अवध्य ' म्हणे श्रुति; हाणोनि तिच्याहि लात हा केला ॥
कचहननें सुरगुरुचा न, तुम्हीं माझाचि घात हा केला ॥ ३० ॥
धिक्कारुनि असुरांतें, धर्मचि तो अमृतमयःचा शिकवी ॥
बाहे विद्या-करुणा-दिव्य-तपस्या-बळें कचाशि कवी ॥ ३१ ॥
जों गुरु ' वत्स ! कच ' म्हणुनि ' एहि ' असें तो म्हणावया योजी ॥
तों विद्यासामर्थ्यें उपजोनि गुरूदरीं, म्हणे ' ओ जी ! ' ॥ ३२ ॥
उदरप्रवेश पुसता झाला तो पुण्यराशि शुक्रमुनी ॥
सांगुनि खळकपट, म्हणे, 'येथ वसो काळ हा शिशु क्रमुनी ॥ ३३ ॥
निर्भय वसेन, काळ क्रमुनि पवित्रोदरीं, असाचि सुखें ॥
न हित गुरूदरदारण; निघतां मज निंदितील साधुमुखें ' ॥ ३४ ॥
शुक्र म्हणे, ' वत्से ! कच कुक्षि विदारुनि निघेल बाहेर, ॥
हा तरलाचि; परि तुझें या कुव्यसनीं बुडेल माहेर ' ॥ ३५ ॥
सुरयानी त्यासि म्हणे, ' वदतां हें अशुभ काय ? हो तात !
व्हावे दोघेहि मला; चिंतामणि हेचि पाय होतात ॥ ३६ ॥
तारुनि शिष्यासि, तरो गुरु; म्हणत्यें, पात्र काय कन्या या– ॥
नोहे वरासि ? वरदा ! जाणासि तूं सुज्ञनायका न्याया' ॥ ३७ ॥

भीड सुतेची भारी; विद्या संजीविनी कचा शिकवी ॥
गुरुलाहि वांचवाया योग्य करी, सज्जना कचासि, कवी ॥ ३८ ॥

गुरुकुक्षि विदारुनि कच बाहेर निघे; परंतु बहु तो भी ॥
उठवुनि गुरु, संकोचें नमुनि रडे, कुलज कीर्तिचा लोभी ॥ ३९ ॥

कचघातकासुरांतें सुरयानीचा स्वयें जनक दापी ॥
कीं, 'जो ब्रह्मद्वेष्टा कुशल न पावेल तो जन कदापी ॥ ४० ॥

समजा बरें, जसा मीं विप्र, गुरु, तसाचि हा कच; पळाला ॥
ब्रह्मांडांतुनि जरि रिपु, वधिन, न देतांहि हाक, चपळाला' ॥ ४१ ॥

असुरांसि करुनि शिक्षा, बाहु उभारुनि, म्हणे 'अहो! कानीं –॥
घ्यावें माझें हितकर मर्यादावचन साधुलोकांनीं ॥ ४२ ॥

जो विप्र आजपासुनि मद्यप्राशन करील, तो पापी ॥
ब्रह्मघ्नासम निश्चित.' असि मर्यादा स्वयें कवि स्थापी ॥ ४३ ॥

होता सहस्र वर्षें कच गुरुसेवेंत; मग तया प्राज्ञा ॥
शुक्रें बहु संतोषें दिधली जाया पित्याकडे आज्ञा ॥ ४४ ॥

# ३९. प्रवर्तितो दीप इव प्रदीपात्

" पितापुत्रांच्या ठिकाणीं समान गुणांचा वास व विकास झाल्याचें प्रपंचांत क्वचितच आढळून येतें. परंतु चिपळूणकर पितापुत्रांच्या बाबतींत समान गुणांचा अधिवासच काय पण उन्मेषही झाला होता. "

विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या जन्मकालीं त्यांचे वडील रसिकवर्य कृष्णशास्त्री चिपळूणकर हे आपल्या वक्तृत्वानें आणि विद्वत्तेनें तत्कालीन सुशिक्षितांत सर्वमान्य झाले होते. समाजाकडून अग्रपूजेचा मान मिळावयाला जे गुण अवश्य लागतात ते सर्व शास्त्रीबुवांच्या ठिकाणीं एकवटले होते. अलौकिक बुद्धिमत्ता, अभिजात रसिकता, व्यापक विचारसरणी, लोकमताला न दुखविण्याचें धोरण, संस्कृत व इंग्रजी भाषांवरील प्रभुत्व आणि बहुमानाची सरकारी नोकरी या कारणांमुळें शास्त्रीबुवांचा लौकिक जसा विद्वन्मंडलांत तसा बहुजनसमाजांतही अगदीं पहिल्या प्रतीचा होता. वरिष्ठांचा आदर आणि कनिष्ठांचें प्रेम त्यांनीं आपल्या निस्पृह पण उदार वृत्तीनें संपादन केलें होतें. चिपळूणकरांच्या लहानपणीं आजाआजीच्या प्रेमळ वाणीचा व पावन राहणीचा संस्कार त्यांच्या मनावर होता. त्यांचे आजे हरिपंतमामा यांनींच त्यांना धुळाक्षरांची व वेदाक्षरांची ओळख करून दिली. चिपळूणकरांचें मराठी शिक्षण नवव्या वर्षी संपून १८६० सालीं ते इंग्रजी शाळेंत गेले. त्यांचा स्वभाव अबोलका परंतु फार जिज्ञासु व व्यासंगी असून त्यांचें निरीक्षण सूक्ष्म असे. अस्फुट अवस्थेंत असलेल्या त्यांच्या प्रतिभेभोंवतीं या वेळीं एक प्रकारचें वाङ्मयवातावरण होतें. १८५९ सालीं कृष्णशास्त्री चिपळूणकर दक्षिणाप्राइझकमिटीचे चिटणीस झाले. चिपळूणकरांच्या प्रतिभाविलासाला शास्त्रीबुवांनीं निर्मिलेली परिस्थिति जशी पुढें साहाय्यक झाली तशी मनोविकासाला या वेळीं गृहस्थिति झाली. नवीन ग्रंथ व ग्रंथकार यांचा राबता या वेळेपासून त्यांच्या घरीं अधिक होऊं लागला. घरीं नित्य होणाऱ्या या वाङ्मयचर्चेचा परिणाम चिपळूणकरांवर झाला

नसेल हें संभवत नाहीं. गीर्वाणवाणीच्या ठिकाणीं त्यांची विशिष्ट बुद्धि होती. इंग्रजी शाळेंत असतांना कृष्णशास्त्री वैजापूरकर यांच्याजवळ त्यांनीं संस्कृताचा अभ्यास केला. पुढें दक्षिणविद्यालयांत गेल्यावर तेथील दुय्यम संस्कृताध्यापक अनंतशास्त्री पेंढारकर हे आपला तास घेत असतांना तिकडे ते अतिशय आस्थेनें लक्ष देत असत. संस्कृत कवींचे सरस चतुरालाप आणि चमत्कृतिप्रचुर आख्यायिका याच पेंढारकरांच्या तोंडून त्यांनीं ऐकिल्या. कृष्णशास्त्री चिपळूणकरांना मराठी कवितेविषयीं प्रेम नसे. फक्त मुक्तेश्वर हाच काय तो त्यांच्या आवडीचा कवि होता. चिपळूणकरांना मराठी कवितेची गोडी त्या वेळचे प्रसिद्ध हरिदास पन्हाळकर बुवा यांचीं रसाळ कीर्तनें ऐकून लागली. तत्कालीन नवीन शिक्षितांना कीर्तनास जाणें कमीपणाचें वाटे. त्यामुळें व स्वतःच्या भिडस्तपणामुळें ते कुठें तरी मागें उभे राहूनच कीर्तनानंद अनुभवीत. त्यांचें मराठी कवितेचें परिशीलनही वडिलांच्या न कळत झालें. दक्षिणविद्यालयांत असतांना त्यांनीं विविध इंग्रजी ग्रंथही बरेच चाळले. ॲडिसन, मेकॉले प्रभृति इंग्रजी ग्रंथकारांप्रमाणें केवळ वाङ्मयसेवेंतच आयुष्य घालविण्याची स्फूर्ति त्यांना याच वेळीं झाली. अभ्यासाकडे दुर्लक्ष करूनही ते इतर ग्रंथांचें वाचन करीत, आणि या वाचनानें आलेलें बहुश्रुतत्वच त्यांना वाङ्मयसेवा करितांना फार उपयोगी पडलें. स्वभाषेची आमरण सेवा करण्याची प्रतिज्ञा त्यांनीं विद्यार्थिदशेंत असतांना केली; आणि ही प्रतिज्ञा स्वार्थत्यागपूर्वक तडीस नेल्यामुळेंच त्यांना महाराष्ट्राच्या इतिहासांत अढळ स्थळ लाभलें आहे.

कृष्णशास्त्री चिपळूणकर हे जुन्या नव्या पद्धतीनें पढलेल्या तत्कालीन पंडितांचे अग्रणी होते. त्यावेळीं सरकारदरबारीं या दोन्ही विद्यांची बहुतेक सारखीच संभावना होत असे. अशी स्थिति असतांही स. १८४८ च्या सुमारास बुधवारवाड्यांत जेव्हां नवीन सरकारी इंग्रजी शाळा सुरू झाली, तेव्हां शास्त्रीबुवांचे गुरु मोरशास्त्री साठे यांनीं त्यांना स्पष्ट सांगितलें कीं, “याउपर खांद्यावर शालजोडी टाकून हिंडण्यांत प्रतिष्ठा राह-

णार नाहीं, तूं शाहणा असलास तर इंग्रजी शीक." शास्त्रीबुवांचें संस्कृत अध्ययन त्यावेळीं नुकतेंच पूर्ण झालें असून त्यांचें शिकण्याचें वयही राहिलें नव्हतें. तरीही त्यांनीं गुरूच्या उपदेशाप्रमाणें हा अगदीं अभिनव अभ्यासक्रम पत्करून लवकरच इंग्रजी भाषेंत प्राविण्य मिळविलें. शास्त्रीबुवांची धारणाशक्ति असामान्य होती; आणि तिला आविरत उद्योगाची जोड मिळाल्यामुळें त्यांच्या बुद्धीला अविषय किंवा अगम्य असें कांहींच नव्हतें. न्यायशास्त्राच्या मरुभूमीपासून तों काव्यशास्त्राच्या नंदनवनापर्यंत ती लीलेनें संचार करीत असे. शास्त्रीबुवांच्या बुद्धीप्रमाणें त्यांचें वक्तृत्वही असाधारण होतें. त्यांच्या एका सहाध्यायी पद्यकारानें 'काकवत् कर्करायते' असें त्यांच्या वाणीचें वर्णन केलें आहे. परंतु शास्त्रीबुवांची वाणी जितकी कर्कश तितकीच अस्खलित व वादकुशल होती; आणि म्हणून त्यांचे गुरु त्यांना 'बृहस्पति' म्हणत असत.

अशा भाग्यशाली व बहुश्रुत पित्याच्या कृपाछत्राखालीं चिपळूणकरांचें बहुतेक आयुष्य गेलें. पितापुत्रांच्या ठिकाणीं समानगुणांचा वास किंवा विकास झाल्याचें प्रपंचांत क्वचितच आढळून येतें. परंतु चिपळूणकर पितापुत्रांच्या बाबतींत समान गुणांचा अधिवासच काय पण उन्मेषही झाला होता. शास्त्रीबुवांच्या ठिकाणीं जी प्रतिभा अंकुरित व पल्लवित झाली होती तिचेंच पुढें परिणतावस्थेंतील पुष्पित सौंदर्य चिपळूणकरांच्या ठिकाणीं प्रकट झालें. पिता आणि गुरु हीं दोन्हीं नातीं चिपळूणकरांच्या संबंधानें शास्त्रीबुवांच्या ठिकाणीं एकरूप झालीं होतीं. चिपळूणकर विद्यार्थिदशेंत असतांना शास्त्रीबुवा त्यांना कधीं कधीं शिकवीत असत. पण या प्रासंगिक शालोपयोगी शिक्षणापेक्षां किती तरी अधिक उदात्त शिक्षण चिपळूणकरांना त्यांच्यापासून मिळालें. १८६५ सालीं चिपळूणकर प्रवेशपरीक्षा उतरले. उत्तम लेखक व ग्रंथकार म्हणून शास्त्रीबुवांची कीर्ति त्यावेळीं सर्वत्र झाली होती. 'पद्यरत्नावलि' हा त्यांचा रमणीय काव्यग्रंथ १८६५ सालींच बाहेर पडला. आणि त्यानंतर लवकरच दादोबा पांडुरंग यांच्या मराठी व्याकरणावरील त्यांचे मार्मिक व उद्बोधक टीकालेख

शालापत्रकांतून प्रसिद्ध झाले. शास्त्रीबुवांच्या या उत्कृष्ट वाङ्मयसेवेचें ध्येय दक्षिणविद्यालयांत अध्ययन करीत असतांना चिपळूणकरांच्या दृष्टीपुढें होतें. शास्त्रीबुवांनीं वाङ्मयसेवेचा मार्गही चिपळूणकरांना याच सुमारास दाखविला. १८६५ सालीं शालापत्रकाचें काम हातीं घेतल्यानंतर 'रासेलस'चें भाषांतर शालापत्रकांत छापवयास त्यांनीं सुरुवात केली. अशा रीतीनें अठरावीस भाग प्रकाशित झाल्यावर १८६८ सालीं बाकी भाषांतराचें काम त्यांनीं चिपळूणकरांकडे दिलें, व शास्त्रीबुवांच्या अपेक्षेप्रमाणें तें चांगल्या रीतीनें पूर्णही झालें. वाङ्मयसेवेचा आनंद ही काय चीज आहे याचा प्रत्यक्ष अनुभव चिपळूकरांना यावेळीं खचित आला असेल. फुलांचा परिमळ वाऱ्याबरोबर वाहून गेला तरी त्यामुळें वेलीच्या वैभवाला बिलकुल उणेपणा येत नाहीं; त्या सुवासानें वातावरण मात्र दरवळून जातें. वाङ्मयसेवेपासून लाभणारा आनंद किंवा यश यांचाही असाच प्रकार आहे. अशा तऱ्हेचें हें वाङ्मयसेवेचें दिव्य व्रत चिपळूणकरांना पितृपरंपरनें प्राप्त झालें.

## ४०. संताजीची घोडदौड

तळहातीं शिर घेउनिया—द्‌ख्खनची सेना लढली
तरि विजयी मोंगल सेना—ना नामोहरम जहाली
पडली मिठि रायगडाला—सोडवितां नाहीं सुटली
राजरत्न राजाराम
कंठास त्यास लावून
जिंजीवरती ठेवून
परते सरसेनापतिची
घोडदौड संताजीची

मिरजेवर पातशाहाचीं—शहाजणें वाजत होतीं
हाणिल्या तयांवर टापा—फोडून टाकिलीं पुरतीं
मारिली टांच तेथून—घेतला पन्हाळा हातीं
तों कळलें त्या वीराला
जिंजीला वेढा पडला
पागा घेवोनी वळला
चौखूर निघे त्वेषाची
घोडदौड संताजीची

वाजल्या कुठें जरि टापा—धुरळ्याची दिसली छाया
छावणींत गोंधळ व्हावा—" संताजी आया ! आया ! "
शस्त्रांची शुद्धी नाहीं—धडपडती ढाला घ्याया
रक्तानें शरिरें लाल
झोंपेनें डोळे लाल
जीवाचे होती हाल
ऐशी शत्रूला जाची
घोडदौड संताजीची

'धों धों' वाहे गिरसप्पा–त्याला प्रतिसारिल कोण ?
'सों सों' शिशिराचा वारा–रोधील तयाला कोण ?
हिमशैल खंड कोसळतां–त्याला प्रतिरोधिल कोण ?
होता जो गंगथडीला
आला तो भीमथडीला
एका दिवसांत उडाला
करि दैना परसेनेची
घोडदौड संताजीची

पुरताच बांधिला चंग–घोड्यास चढविला तंग
सोडी न हयाचे अंग–भाला बरचीचा संग
नौरंगाचा नवरंग–उतरला जहाला दंग
तुरगावर जेवण जेवी
तुरगावर निद्रा घेई
अंग ना धरेला लावी
भूमीस खूण टापांची
घोडदौड संताजीची.

न कळे संचरलें होतें–तुरगांसहि कैसें स्फुरण
उफळाया बघति वेगें–रिकिबींत ठेवितां चरण
जणुं त्यांसहि ठावें होतें–युद्धीं 'जय किंवा मरण'
शत्रूचे पडतां वेढे
पाण्याचे भरतां ओढे
अडती न उधळती घोडे
ऐशी चाले शर्तीची
घोडदौड संताजीची.

नेमानें रसद लुटावी–नेमाजी शिंदे यांनीं
हयगज सांपडती तितुके–न्यावे हैबतरावांनीं
वाटोळें सर्व करावें–आटोळे सरदारांनीं
“ खाड खाड ” उठती टापा
झेंपावर घालित झेंपा
गोटावर पडला छापा
आली म्हणती काळाची
घोडदौड संताजीची.

चढत्या घोड्यानिशिं गेला–बेफाम धनाजी स्वार
करि कहर बागलाणांत–ओली न पुशी समशेर
बसवितो जरब शत्रूला–बेजरब रिसालेदार
वेगवान उडवित वाजी
तोंडावर लढता गाजी
धांवून आला संताजी
पळती मोंगल बघतांची
घोडदौड संताजीची.

नांवाचा होता ‘ संत ’–जातीचा होता शूर
शीलाचा होता ‘ साधु ’–संग्रामीं होता धीर
हृदयाचा ‘ सज्जन ’ होता–रणकंदनिं होता क्रूर
दुर्गती ति संभाजीची
दैना राजारामाची
अंतरीं सर्वदा जाची
उसळे रणशार्दूलाची
घोडदौड संताजीची

मर्दानी लढवय्यांनीं—केलेल्या मर्दुमकीचीं
मर्दानी गीतें गातां—मर्दानी चालीवरचीं
कडकडे डफावर थाप—मर्दानी शाहीरांची

देशाच्या आपत्कालीं
शर्थीचीं युद्धें झालीं
गा शाहीरा, या कालीं
ऐकूं दे विजयश्रीची
घोडदौड संताजीची.

# ४१. पंढरीची वारी

" काय ग्यानबा, औत सुटला जणूं ? " सोनबा पाटलांनीं विचारलें. सूर्य मावळण्याचा सुमार असेल नसेल; शेतांतून–रानांतून गुरेंढोरें घरीं परत जाण्याची एकच घाई चालली होती, व त्यांच्यामागून शेतकऱ्यांचीं लहान मुलें व मुलीहि आपापलीं गुरें हांकीत, व मधून मधून एखाद्या ओढाळ गाईच्या अगर बैलाच्या पाठीवर आसूडाचा तडाखा लगावून, 'हौशी हौशीं, अऽ' किंवा 'ढवळ्या, ढवळ्या, अऽऽ–'असें दरडावून ओरडत धांवत होतीं. सोनबा पाटील आपल्या मंडळींत मजुरांचे रोज चुकते करीत बसले होते. त्यांच्या भोंवतीं उभे राहिलेल्या मजुरांकडून आणि अंगणांत व सडकेवर इतस्ततः पसरलेले दगड, धोंडे, लांकडें, चिखल इत्यादि सामानांवरून त्यांचें कांहीं तरी इमारत बांधण्याचें काम चाललें होतें हें कोणासही ओळखता आलें असतें.

ग्यानबा आपल्या उजव्या हातांत आपली चार वर्षांची नात घेऊन त्तिच्याशीं बोबडें बोलून तिला खेळवीत चालले होते. त्यांच्यापुढें त्यांचा थोरला मुलगा व एक गडी औत आणि गुरें घेऊन चालले होते; आणि मागें त्यांची सून डोक्यावर पाटींत न्याहारी करून रिकामीं झालेलीं कांहीं भांडीं, शेतांतला कांहीं थोडाबहुत माल घालून सासऱ्याच्या मागोमाग चालली होती. ग्यानबांची जाण्याची वाट सोनबा पाटलांच्या घरावरून होती. तरी तो आपल्या नातीशीं लडिवाळपणानें बोलण्यांत दंग असल्यामुळें त्याचें प्रथम सोनबांकडे लक्ष गेलें नाहीं. पण सोनबांची हांक ऐकून त्यांनीं आपलें चालणें थांबविलें; आणि नातीला तिच्या आईच्या हवालीं करून पुढें घरीं जाण्यास सांगितलें, व आपला मोर्चा सोनबाच्या घराकडे वळविला.

" व्हय् सुटला औत. तुमचं छपार कुठवर आलंया ? " ग्यानबांनीं उलट विचारलें.

" या तर जरा वाइच्. या लोकांवर पहारकऱ्यासारखं सकाळपासून सारखं बसूनशान् अक्शी कंटाळलुया पघा. या, जरा पानतंबाखु तर खाऽया वाइच्. "

ग्यानबाला यापेक्षां अधिक जास्त आमंत्रणाची जरूर नव्हतीच. कारण त्याचा व सोनबाचा लोभच तसा होता. वास्तविक पाहतां सोनबाची सांपत्तिक स्थिति, व गांवांतला दर्जा ग्यानबापेक्षां पुष्कळच होता. पण दोघेजण लहानपणापासून एके ठिकाणीं खेळले वाढले असल्यामुळें, व दोघांचीं घरें, जमिनी जवळ लागून असल्यामुळें दोघांचा एकमेकांशीं चांगला स्नेह होता. खरें म्हटलें तर आजच्या अनुभवाप्रमाणें बांधकरी म्हणजे एकमेकांचे कट्टे दुष्मन् असावयाचे. दिवाणी फौजदारी कोर्टांत एकमेकांविरुद्ध वितीएवढ्या तुकड्यासाठीं भांडून, त्याच्या पायीं घरदार विकून वकिलांची भर करावयाची आणि दोघांनींही स्वत: दरिद्री होऊन परस्परांचें हाडवैर मात्र कायमचें पदरांत पाडून घ्यावयाचें हा हल्लींचा दरेक खेडेगांवांतील शेतकऱ्यांचा क्रम. पण त्या काळीं ब्रिटिशांची राज्यसत्ता देशांत आजच्याइतकी दृढमूल झाली नसल्यामुळें वकिलांचा व कोर्टबाजीचा इतका सुळसुळाट झाला नव्हता. पेशवाई नष्ट होऊन ब्रिटिशांचा अंमल नुकताच हळूहळू प्रस्थापित होत होता. त्यामुळें आजच्या प्रमाणें देशाच्या या टोंकाहून त्या टोंकाला दोन दिवसांत नेऊन सोडणाऱ्या आगगाड्या, आज मुंबईस टाकलेलें पत्र उद्यां नागपुरास अगर मद्रासेस पोंचविणारें पोस्ट, या सोई जरी त्यावेळीं नव्हत्या, किंबहुना तीं नांवेंही त्या वेळीं लोकांनीं कधीं ऐकलीं नव्हतीं, तरी या आधुनिक सुखसोयीच्या साधनांच्या नांवाप्रमाणें कोर्ट, वकील, दावा, दरखास्त, फिर्याद, हे घरादाराची, कुटुंबसौख्याची राखरांगोळी करणारे आजचे शब्दही खेडेगांवच्या लोकांस तितकेच अपरिचित होते. त्यांतून खानदेशांतल्या दूरच्या एका डोंगराच्या पायथ्याशीं वसलेल्या आंबेवाडीच्या खेडेगांवची गोष्ट तर बोलावयासच नको.

आपल्या सतरंजीवर सोनबांनीं ग्यानबास बसावयास जागा करून दिली; आणि आपला पान-तंबाखूचा बटवा त्यांच्यापुढें केला. ग्यानबांनीं डबींतील चुना अंगठ्यावरच्या नखानें उकरून पानास लावीत विचारलें, " पाटील, आपल्या घराचं काम कोठवर आलं ? "

" काय विचारता ! या लोकांच्यापुढें कांहीं बोलायची सोय नाहीं. " सोनबांनीं उत्तर दिलें. " आतांशीं कुठं कमरेइतक्या भिंती वर आल्या आहेत. तरी बरं, मी रोज सकाळपासून त्यांच्या मानेवर खडा ठेवून उभा राहतों; पण आंग चोरून, रमत-गमत काम करण्याची या मजुरांची संवय म्हणून जात नाहीं. बरं, इकडे, सगळा वेळ बांधला गेल्यानं शेतीची देखरेख राहते ती वेगळीच ! म्हणतात ना, लग्न पहावं करून, अन् घर पहावं बांधून; तसं या घराचं झालंय्. पहिल्यांदा दोनशें रुपयांत होईल म्हणून अंदाज केला; अन् आतां चारशेंपर्यंत गांठ आली तरी काम निम्मंसुद्धां नाहीं. कुठून हें काम हातीं घेतलं असं झालंय. "

" चाललंच् आहे, तुमच्यासारख्या मोठ्यांच्या मागं अशा अडचणी नसायच्या तर काय आमच्यासारख्या गरिबांच्या मागं असायच्या ? आमचं आपलं हातावर पोट; काय दोन जमिनी असतील त्या कसल्या, काय येईल ती मीठभाकर खाल्ली, आपले सुखासमाधानानं राहिले. बस्, आनंद आहे यांत. पांडुरंगाच्या कृपेनं आहे एवढंच चाललं म्हणजे झालं."

" व्याप कमी तितका त्रासही कमी हें खरं; पण असलं म्हणजे टाकून द्यायचं थोडंच. बापजाद्यांनीं मिळवलं तेवढं तरी संभाळायला नको ? आपण आहोंत तोंवर तरी संभाळावं; पुढं पोरं काय करतील तें दिसतंच आहे. " असें म्हणून सोनबा पाटलांनीं एक निराशेचा दीर्घ सुस्कारा सोडला.

" खरं सांगूं पाटील, " ग्यानबा म्हणाला, " तुमच्या या फाजील काळजीमुळंच तुमचं असं झालं आहे. अहो, पोरं मोठीं झालीं म्हणजे त्यांच्यावरच आस्ते आस्ते भार टाकायला हवा. पण जिथं तुम्हीच बारक्या

काडीपासून सगळा संसार पाहतां, तिथं पोरांनीं काळजी तरी कशाला करावी; आणि त्यांना माहिती तरी कशी व्हावी ? आतां हेंच पहाना, पंढरीला एकदां वारीला जाऊन यायचं म्हणून आज आपण चार वर्षं सारखें म्हणत आहों; पण अजून तुमचा पाय कांहीं घराबाहेर पडत नाहीं. या वर्षी ही; दुसऱ्या वर्षी ती; तर तिसऱ्या वर्षी तिसरीच कांहीं अडचण तुमच्यापुढें येऊन आपलं जाणं लांबत चाललं आहे. ”

“ ग्यानबा, मी मुद्दाम कां लांबवतों आहे ? पहिल्या वर्षी धाकटी पोरगी घरीं पहिल्या बाळंतपणाला आली; तिला टाकून जातां येतंय थोडंच. दुसऱ्या वर्षी नानू आजारी पडला, म्हणून राह्यलं. यंदा मात्र निघायचं ठरवलं होतं, घराचं काम संपवून. पण घर अजून पुरंच होईना त्यामुळं घराचं काम असं अर्धंच टाकून निघणं शक्य नाहीं. घराकडे गुंतल्यामुळें जमिनींच्याकडेही पाह्यला झालं नाहीं; म्हणून पावसाळयाच्या आंत त्यांच्या मेहेनतीमशागतीची व्यवस्था केल्याशिवाय कसं जायचं ? अशा बघा सारख्या अडचणी येताहेत. ”

“ अन् जन्मभर त्या तशाच यायच्या. अशा गोष्टी पाहूं गेलं तर आपली पंढरी या जन्मांत तरी व्हायची कांहीं मला आशा दिसत नाहीं. मी आज तीन वर्षं तुमची वाट पाहतों आहे; पण यंदा मी ठरवलंय् कीं, या आषाढीला जायचंच, मग तुम्ही या कीं नका येऊं. अहो, वय झालं तरी अजून हातपाय शाबूत आहेत, तोंवर जाऊन यावं. इतर क्षेत्रं, तीर्थं करणं नाहीं आपल्या नशिबीं. पण तुकोबाची पंढरीही होऊं नये या जन्मांत ! ”

“ ग्यानबा, तुमचा तर अगदीं निश्चयच दिसतो झालेला. पण आतां इतके दिवस थांबला तसें आणखी एक वर्ष थांबा ना. पुढल्या वर्षी खास खास जाऊं. नाहीं म्हटलं तरी शेंदीडशें कोसांचा पल्ला; जाऊन यायला तीन चार महिने तरी लागणार. त्यांत वाटेंत घाटांत पाऊस फार. त्यानं अडकवलं कीं आणखी महिनाभर जास्त. तेव्हां मी म्हणतों, इतकी

व्यवस्था माझ्या हातून आतां होणं शक्य नाहीं. पुढल्या वर्षी अगदीं खचित जाऊं."

"छे: ! तें आतां शक्य नाहीं" ग्यानबांनीं निश्चयानें उत्तर दिलें. "पुढल्या वर्षी हे दिवस डोळयानं पाह्यची हमी कुणी घेतली आहे ? अन् पाह्यले तरी हातपाय धड राहतील कीं नाहीं हें तरी कुणीं सांगावं ? परवांच्या कथेंत बुवांनीं सांगितलं कीं, पुण्यकर्म करायला उशीर लावूं नये; कारण आपल्या आयुष्याचा भरंवसा नसतो. तें ऐकल्यापासून माझ्या मनानं फार घेतलं आहे कीं हीं तीन वर्षे गेलीं तीं गेलीं; पण यंदाच्या वर्षी मात्र जायचंच. मनानं विठोबाच्या चरणीं केलेला संकल्प पार पाडल्याशिवाय राह्यचंच नाहीं. अडचणी माझ्याहि घरांत आहेतच, पण माझ्या कारभारणीनं अन् लेकानं मला सांगितलं कीं, तुम्हीं कांहीं मागली काळजी करूं नका. आपली वारी करून या."

ग्यानबाचें हें बोलणें ऐकून सोनबा पाटील कांहीं वेळ स्वस्थ बसले. ह्या अवधींत त्यांनीं पान तयार करून तंबाखूचाही बार भरला. या बाराचा त्यांच्या विचारांना चांगलाच उपयोग झाल्याचें दिसलें. कारण त्यांनीं कांहीं वेळानें तंबाखूची पिचकारी एका बाजूस टाकून निश्चित स्वरानें म्हटलें, "ग्यानबा, तुम्ही म्हणता तें खरं आहे. हातपाय उभे आहेत तोंवरच जाऊन आलं पाहिजे. चला तर, माझंही ठरलं तुमच्या बरोबरच निघायचं."

"वा: ! हें छान झालं," ग्यानबा आनंदानें म्हणाले. "पण आतां निघायचं म्हणजे लवकरच ८।१० दिवसांतच निघालं पाहिजे, कारण आपल्याला बरीच लांबची मजल मारायची आहे. हा वैशाख सरतां आपण निघालों म्हणजे आषाढाच्या आरंभीं आपण पंढरीस पोचूं. रोज थोडी थोडी मजल केली म्हणजे श्रमही होणार नाहींत. आणखी शिवाय पंढरीला जातोंच आहोंत तों परत येतांना आळंदी, देहू, नाशिक अशीं चार दुसरीं क्षेत्रंही करून येऊं."

"कांहीं हरकत नाहीं. सगळा जन्म या खेडयांत आणि पंचक्रोशींत गेला; बाहेरचीं मोठीं शहरं तरी कशानं पहायला सांपडणार आहेत. खर्चाला किती घ्यावं असा तुमचा अंदाज आहे ?"

"मीं आपले १०० रुपये काढून ठेविले आहेत. क्षेत्राच्या गांवीं गेल्यावर कांहीं देवब्राह्मण तर करायला हवा. वाटेनंही रोजची शिधा-सामुग्री लागेल. तुम्हांला १०० रुपये फार मोठी रक्कम नाहीं. पण मी अगदीं मला शक्य होतं तितकं करून ही रक्कम जमवून ठेविली आहे. माझ्या सुनेनं अन् कारभारणीनं त्यांत आपल्यापासचे २५।२५ रुपये घातले नसते तर इतकीही माझी रक्कम उभी राहिली नसती. पण त्यांनींच माझ्या वारीसाठीं आपल्याजवळची भर आपण होऊन घातली म्हणून बरं झालं."

—२—

सोनबा व ग्यानबा याप्रमाणें योग्य दिवशीं पंढरीस जाण्यासाठीं निघाले व एकमेकांच्या सोबतीनें त्यांचा प्रवासहीं मजेचा होत होता. सकाळीं—संध्याकाळीं थोडी मजल मारावी, दुपारीं—रात्रीं वाटेवरच्या गांवांतील देवळांत, धर्मशाळेंत मुक्काम करावा; सुखदुःखाच्या गोष्टी बोलाव्या, तुकोबाचे, एकनाथाचे अभंग म्हणून भजन करावें, अशा रीतीनें त्यांनीं सुमारें दीडशें एक मैल प्रवास केला. दोघेही पन्नाशीच्या पुढें गेलेले असल्यामुळें आपल्याला झेंपेल अशाच रीतीनें मजल करण्याचें त्यांनीं ठरविलें होतें. ग्यानबांचें अभंगांचें वगैरे पाठांतर चांगलें होतें. त्यामुळें वाटेनें चालतांना त्यांचें अभंगांचें सारखें पठण चाले; व मधून मधून त्यांवर आपल्या बुद्धीप्रमाणें विवरण करून ते आपल्या सोबत्यास सांगत. घराची व संसाराची आठवण घर सोडल्यापासून जणूं कांहीं त्यांनीं सोडलीच होती. घरून निघतांना त्यांच्या बायकोनें, सुनेनें आणि लेकानें डोळयाला पाणी आणलें; पहिल्या दोघी तर ओक्सा-बोक्शी रडूं लागल्या; कारण ग्यानबा इतक्या लांबच्या प्रवासाला निघा-

ल्याचा त्यांच्या सर्वांच्या आयुष्यांत तो पहिलाच प्रसंग होता. लहानग्या नानींनें गळ्याला मिठी मारिली ती सोडवितांना ग्यानबांच्याही डोळ्यांत पाणी आलें. त्यांनीं आपल्या मुलाला घरच्या व्यवस्थेबद्दल इतकेंच म्हटलें कीं, " तुक्या, तूं आतां मोठा झाला आहेस, तुला सगळी माहिती आहेच. तेव्हां आणखी मी तुला काय सांगणार ? मी आतां देवदर्शनाला चाललों आहे खरा; मी आतां मागली कांहींच काळजी करीत नाहीं. " इतकें मुलाला व सुनेला सांगून त्यांनीं बायकोस म्हटलें, " देवाच्या दयेनं मी सुखरूप परत येईन; कांहीं काळजी करूं नकोस. तुक्या अन् त्याची बायको तुझी चांगली काळजी घेतील. " इतकें बायकोस बोलून त्यानें लहानग्या नानीचा मुका घेतला आणि " तुला मी छानदार खाऊ आणीन आं " असें म्हणून ते लागलीच घराबाहेर पडले.

पण सोनबांचें आवरासावरीचें काम चांगलें चारपांच दिवस चाललें होतें. कोणत्या तुकडीची नांगरणी केव्हां करावयाची; कोणत्या जमिनींत काय पेरायचें; कोणत्या नांगराला कोणते बैल लावायचे; भांगलणीला कोठल्या बाया लावायच्या; या प्रत्येक बारीकसारीक गोष्टीबद्दल त्यांनीं घरच्या माणसांस अगदीं तपशीलवार हुकूम देऊन ठेविले. घराचें काम अपुरेंच राहिलें होतें. त्याबद्दलही त्यांनीं आपल्या मुलास खुलासेवार सूचना दिल्या. पांचसहा महिन्यांस पुरेल इतकी रक्कम बायकोच्या हवालीं करून बाकीची शिल्लक गांवच्या सावकाराच्या पेढीवर नेऊन ठेविली. अगदीं निघते वेळीं सुद्धां त्यांचा पाय घराबाहेर लवकर निघेना. ग्यानबा त्यांच्या ओटीवर केव्हांचे येऊन बसले होते; पण सोनबा बायकोस, मुलास, नोकरास त्याच त्या गोष्टी पुनःपुनः बजावून, "नीट संभाळून रहा बरं. मी परत आल्यावर मला सगळी व्यवस्था सांगितल्याप्रमाणं दिसली पाहिजे, " असें सांगत बाहेर आल्यावर पुन्हा कांहीं तरी विसरलेलें आठवून ते बायकोस म्हणाले, " अग, ए, लक्षांत आहेना;ती बोरली म्हैस आटल्याबरोबर तिला मळ्यांत पाठवून दे बरं का. मी जातों

आहें खरा; पण तुम्ही सगळीजणं कसं संभाळतां याची काळजीच आहे मला."

शेवटीं एकदांचे ते दोघेजण बाहेर पडले. तरीसुद्धा वाटेनें सोनबांचें बोलणें घरच्या व्यवस्थेबद्दलच चाललें होतें. वाटेंत एकादें शेत नांगरलें जात असतांना दृष्टीस पडलें कीं, सोनबा म्हणत, "मधल्या पट्टीला रावबानं नांगर घातला कीं नाहीं कोण जाणे. काय लेकाचा करील, का बसेल जाऊन तमाशाला कुणास ठाऊक!" एखाद्या गांवांत घरकाम चाललेलें पाहतांच आपल्या अपुऱ्या घराची आठवण होऊन तें काम कोठवर आलें असेल याची त्यांना चिंता लागून राही.

अशा रीतीनें आरामानें मजल दरमजल करीत ते दोघेजण नगर जिल्ह्यां-तल्या संगमनेर तालुक्यांत येऊन पोंचले. येथपर्यंतचा त्यांचा प्रवास सुखानें झाला. रोज २०।२५ मैलांची मजल करावी, रात्रीं एखाद्या गांवांत वस्तीला रहावें; आणि आतांपर्यंत त्यांना गांवेंही चांगलीं लागलीं. पण नगर जिल्ह्याची हद्द सुरू होतांच देशाचें रूप पालटलें. महामारी आणि दुष्काळ या दोहोंचा एकाच वेळीं जोराचा हल्ला झाल्यामुळें वाटेनें बहुतेक खेडींगांवें ओस पडलेलीं त्यांना आढळून आलीं. कित्येक गांवीं तर विकत शिधा मिळण्याचीसुद्धां त्यांना मारामार पडली. बहुतेक ठिकाणीं कुटुंबेंच्या कुटुंबें अन्नासाठीं परागंदा झालेलीं दिसलीं. भर दुपारीं गांवच्या पेठा ओसाड व भयाण दिसत होत्या. ईश्वरी क्षोभाचें हें प्रखर स्वरूप पाहून त्यांनासुद्धां फार आश्चर्य वाटलें. या प्रदेशांतून वाट चालतां चालतां ते दुपारीं एका गांवीं वस्तीस आले. त्या गांवची स्थितीही अशीच होती. पण तेथें दुपारचें स्वयंपाकपाणी करून त्यांनीं विश्रांति घेतली, आणि पुढलें गांव सहा मैलांच्या टप्प्यावर आहे असें कळल्यावर रात्रीचा मुक्काम त्या गांवीं करण्याचें ठरवून उन्ह खालीं झाल्यावर ते निघाले. गांवाबाहेर येऊन अर्धा मैल चालून झाल्यावर ग्यानबा म्हणाले, "सोनबा, जरा तहान लागलीशी वाटते. पाणी कुठं बरं मिळेल?"

" या उजाड मुलुखांत आतां कुठलं पाणी ? वाटेनं एका ओढ्याला टांक दिसेल तर शपथ ! पाणी हवंच असलं तर पुन्हा गांवांत गेलं पाहिजे. "

पण इतक्यांत थोड्याशा अंतरावरच्या शेतांत एक झोंपडें ग्यानबाच्या दृष्टीस पडलें. तेव्हां ते म्हणाले, " तें बघा तिथें एक झोपडं दिसतंय्. तिथं जाऊन मी पाणी पिऊन येतों. सोनबा, तुम्ही व्हा हळूहळूं पुढ; मी मागून येऊन गांठतोंच तुम्हांला. "

—३—

ग्यानबांनीं त्या झोंपडीजवळ जाऊन पाहिलें तों सुमारें तीस पस्तीस वर्षांचा एक माणूस बाहेर पडला होता. त्याच्या अंगावर एका लंगोटी-शिवाय कांहींही वस्त्र नव्हतें. तो निजला आहे असें वाटून ग्यानबांनीं त्याला हांक मारून जरा पाणी मागितलें; पण त्यांच्या हांकेस उत्तर मिळालें नाहीं. म्हणून त्यांनीं जवळ जाऊन पाहिलें तों त्याचा चेहेरा इतका भेसूर व कृश दिसला कीं, त्यांना तो जिवंत आहे का मेलेला आहे हेंच समजेना ! पण त्याची छाती श्वासोच्छ्वासानें हळूहळू हलत होती; त्यावरून तो जिवंत असल्याचें त्यांनीं अनुमान काढलें. पुन्हा हांक मारल्यावर त्यानें आपले डोळे उघडले; पण तेही श्रम फार होऊन ते पुनः लागलीच मिटले गेले. ग्यानबांनीं मग झोंपडींत जाऊन पाहिलें तों तेथला देखावा त्यांना फारच भयानक व हृदयद्रावक दिसला. झोंप-डीच्या आंतल्या एका कोंपऱ्यांत एक २०।२५ वर्षांची बाई अस्ताव्यस्त बेशुद्ध स्थितींत पडली असून तिच्या बाजूनें अत्यंत दुर्गंधि येत होती. मधून मधून ती आंचके दिल्यासारखेंही करी. दुसऱ्या बाजूस एक म्हातारी रकट्यावर थकून पडली होती. तिच्याजवळ एक लहान चार-पांच वर्षांचा मुलगा केवळ अस्थिपंजर असा झोंपी गेला होता. आणि एक नऊ दहा वर्षांची मुलगी " आजी भूक लागली ग, " असें म्हणत बसली होती.

या सर्व देखाव्यावरून त्या झोंपडींत उपासमार आणि सांथ या दोघींनींहि आपलें वास्तव्य केल्याची साक्ष पटत होती. झोंपडींत प्यावयास पाणी मिळण्याची ग्यानबाची आशा केव्हांच नाहींशी झाली होती. पण विपत्तीनें व क्षुधेनें मरणाच्या द्वारीं पडलेल्या त्या विपन्न कुटुंबाची अंगावर शहारे आणणारी स्थिति पाहून ग्यानबाचें हृदय पिळवटून गेलें. तो आपली तहान विसरला. केवळ भूतदयेच्या रज्जूंनीं ओढल्याप्रमाणें तो आणखी आंत गेला. त्याला पहातांच ती लहान मुलगी घाबरून आजीला म्हणाली, “ आजी अ, तो बघ कोण बुवा आलाय्. ”

“ काय रे बाबा, इथं येऊन काय मिळायचंय् तुला ? चोराला चोरी करायलासुद्धां आमच्याजवळ कांहीं एक राह्यलं नाहीं. ” त्या म्हातारीनें कष्टानें कसे तरी ते शब्द उच्चारले.

“ आजीबाई, ” ग्यानबा म्हणाला, “ मी एक पंढरीला जाणारा वारकरी आहें. वाटेनें जातांना तहान लागली, तेव्हां तुमची झोंपडी दृष्टीस पडली म्हणून पाणी मिळण्याच्या आशेनं इथं आलों. ”

“ भल्या बाबा ! आम्हांलाच आज दोन दिवसांत पाणी प्यायला मिळालं नाहीं, तर तुला आम्ही काय देणार ? ”

इतक्या बोलण्याच्या श्रमानेंच म्हातारी पुन्हां थकून पडली. ग्यानबा त्या हृदयद्रावक परिस्थितीचें निरीक्षण करीत कांहीं वेळ तसाच उभा राहिला, व कांहीं वेळानें म्हणाला, “ आजीबाई, मला पाणी कुठं जवळ आहे हें सांगाल तर मी घेऊन येईन. मजजवळ थोडंसं खाण्याचं आहे तेंही आणून सर्वांना देईन. ”

खाण्याचें नांव काढतांच ती म्हातारी व मुलगी या दोघींच्याही चेहेऱ्यावर थोडासा तजेला चढला. ती म्हणाली, “ जा बाबा, झोंपडीच्या उजव्या बाजूच्या पायवाटेनं; थोड्या अंतरावर आड आहे, त्यांत पाणी सांपडेल थोडंसं.”

ग्यानबानें आपल्या पडशींतून मोठा तांब्या काढून पाणी आणलें. त्यानें आपली स्वतःची तहान आडावरच शमन केली होती. घरांत येतांच त्यानें पडशी उघडली; व संध्याकाळच्या फराळासाठीं दशम्या व झुणका करून घेतलेला बाहेर काढला. तो पाहतांच त्या मुलीनें आपल्या भावाला उठविलें व तीं दोनही लहान मुलें आशेनें त्याच्याजवळ येऊन बसलीं. त्यानें मुलांच्या पुढें थोडी दशमी व झुणका ठेवतांच त्यांनीं अधाशा-प्रमाणें तो तोंडांत कोंबण्यास सुरवात केली; कारण आज तीन दिवसांत त्यांच्या पोटांत खरोखरीच अन्नाचा एक लेशही गेला नव्हता. पोरें खात आहेत हें पाहूनच म्हातारीला समाधान वाटलें, व तिची शक्ति थोडीबहुत जागृत होऊन ती कष्टानें उठून बसली. तिच्या डोळ्यांतून अश्रु आले. " बाबा, तूं आम्हांला खरोखरीचा देव भेटलास. आज किती दिवस झाले, माझी सून सांथींत आजारी पडून मरायला टेंकली आहे. घरांत अन्नाचा कणही नाहीं. लेक उभा होता; तोही उपासमारीनें कालपासून निपचित पडला आहे. आज सकाळीं बाहेर जायला म्हणून उठला, तो बाहेर अंगणांत जो घेरी येऊन पडला तो अजून उठलाच नाहीं. मीच म्हातारी काय ती जरा हिंडतीफिरती; पण मी तरी काय करूं. हीं दोन पोरें आसपास कुठेंतरी भीक मागून आणतात; पण या दिवसांत भीक घालायला तरी कुणाजवळ काय उरलं आहे? त्यांनाही तीन दिवसांत कांहीं मिळालं नाहीं." म्हातारी इतकें अडखळत अडखळत बोलली; पण पुढें तिला हुंदका आवरेना, तिनें एकदम गळा काढला, आणि ती म्हणाली, " कसाहो देवानं आमचा अंत पाहिला. गेल्या वर्षींच आम्हीं कशीं स्वतःची शेतवाडी करून सुखांत होतों, पण या दुष्काळानं अन् सांथीनं या एका वर्षांत आमचं घरदार सगळं मातीला मिळवलंन्."

" नका, नका रडूं, आजीबाई," ग्यानबा कळवळयानें म्हणाला. " दैवानंच मला इथं धाडून दिलं आहे. तुमची सगळयांची व्यवस्था आतां लावतों बघा." ग्यानबानें बाहेर जाऊन त्या तरुण मनुष्यास

उठवून धरून आणलें; व त्याच्यापुढें व त्या म्हातारीपुढें उरलेली दशमी व पाण्याचा तांब्या ठेविला. अन्न पहातांच त्या मनुष्याच्या डोळ्यांतून घळघळा पाणी वहावयास लागलें. त्यानें कृतज्ञतेनें ग्यानबाकडे पाहिलें; समोर मुलें खात बसलीं होतीं त्यांच्याकडे पाहिलें. त्याला कांहीं बोलवेना, त्यानें हातांत दशमी घेऊन मानेनें नको असें म्हणून ती मुलांसच आणखी द्या असें सुचविण्यासाठीं हात मुलांच्याकडे केला.

"मुलांना तर पहिल्यांदाच दिलं आहे," ग्यानबानें उत्तर केलें. "तुम्ही न् आजीबाईच घ्या खाऊन आतां. हें सगळं संपलं तरी हरकत नाहीं. तुमचं खाणं झाल्यावर मी गांवांत जाऊन सामानसुमान घेऊन येतों; तोंपर्यंत तुम्ही सर्वजण मिळून झोंपडी स्वच्छ करा. तुमच्या बायकोला हवं असलं तर हे आहेत तांदूळ थोडेसे, त्यांची पेज करून द्या. मी गांवांतून परत आल्यावर मग पुढली व्यवस्था करूं."

ग्यानबा आपल्या सोबत्याला विसरला; आपण पंढरीला विठोबाच्या दर्शनाला जायला निघालों होतों हेंही तो विसरून गेला. त्या अज्ञात व मरणाच्या द्वारीं पडलेल्या माणसांपलीकडे त्याला कांहींच दिसेना. गांवांत सामानसुमान आणण्यासाठीं जातांना त्याच्या डोक्यांत त्या माणसांबद्दलच सर्व विचार चालले होते. आपण एक दिवस उशीरां आलों असतों तर त्या मुलांचें कसें झालें असतें; अन्नावांचून भुकेनें तीं लहान पोरें व त्यांची म्हातारी आजी कशीं तडफडलीं असतीं याची कल्पना मनांत येऊन तें कल्पनाचित्रच त्याला इतकें दुःसह झालें कीं, त्याचें हृदय अगदीं भरून येऊन त्याच्या दुःखानें तो दुःखित झाला, आणखी एका दगडावर बसून ढळढळा रडला. तो मनांत म्हणाला, "पांडुरंगा, तूं कां रे या गरीब कुटुंबावर इतका कोपलास? तूं असा निर्घृण कसा झालास? छेः! पण तुला निर्घृण कसं म्हणावं? त्यांच्या ऐन संकटांच्या वेळीं मला इथं पाठवून तूंच ना मदत करविलीस? तं निर्घृण असतास तर ही कशी करविली असतीस? छे, छे,

तूं दीनदयाघन आहेस. रंजल्यागांजल्यांचा आपंगिता आहेस." रडून मनांतील उद्वेग हलका झाल्यावर व परमेश्वराच्या कृपेचा विचार मनांत आल्यावर ग्यानबाचें मन पुन्हा पूर्ववत् समाधानी झालें. आपल्या येण्यामुळें आणि आपण दिलेल्या अन्नामुळें या कुटुंबांत क्षणमात्र जो आनंद चमकला त्याची आठवण होऊन त्याची वृत्ति उल्हासित झाली आणि त्या कुटुंबाला शक्य ती मदत करण्याच्या ईर्षेनें तो गांवांत सामानशिधा वगैरे आणण्यासाठीं उत्साहानें चालूं लागला.

—४—

ग्यानबाची आकस्मिक मदत मिळाल्यानें ती म्हातारी चांगलीच तरतरीत झाली. ग्यानबा गांवांतून सामानसुमान घेऊन परत येण्याच्या आंत तिनें झोंपडी स्वच्छ करून मुलीच्या मदतीनें आपल्या आजारी सुनेची सर्व व्यवस्था लावली. मुलगा थोडीशी भाकरी खाऊन पुन्हा ग्लानि येऊन पडला होता त्याला नीट निजविलें. ग्यानबा परत येऊन पाहतो तों झोंपडींत पुष्कळच स्थित्यंतर झालें होतें. ग्यानबा येतांना एका वैद्यालाही घेऊन आले. वैद्यानें नवराबायकोची प्रकृति पाहून दोघांचीही स्थिति काळजी करण्यासारखी असल्याचें सांगितलें. त्यामुळें ग्यानबांना मग तेथें राहणें भागच पडलें.

त्या रात्रीं सर्वांची व्यवस्था झाल्यावर ग्यानबा निजण्यासाठीं म्हणून बाहेर अंगणांतच आपला प्रवासी बिछाना पसरून पडले. बिछान्यावर पडल्यानंतर नित्याप्रमाणें तुकारामाचे अभंग म्हणून नामस्मरण करितांना त्यांना आपल्या मित्राची आठवण झाली, व आपण निघालों कोणत्या हेतूनें, व वाटेंत थांबलों कशासाठीं याबद्दलचे विचार त्यांच्या मनांत सुरू झाले. प्रथम या लोकांची व्यवस्था लावून एकदोन दिवसांत आपण निघून सोनबांस गांठूं अशी त्यांची कल्पना होती. पण त्या तरुण मनुष्याचा आजार मुदतीचा असून त्याला बरें होण्यास कमींत कमी दहा पंधरा दिवस तरी लागतील; व त्याची फार काळजी घेतली पाहिजे असें वैद्यानें सांगितल्यामुळें तो बरा होईपर्यंत निघणें

ग्यानबांस अर्थातच अशक्य होतें. कारण त्या कुटुंबाच्या आजच्या परिस्थितींत त्या एका मनुष्याशिवाय त्यांना कोणाचाच आधार नव्हता. मुलें लहान; आजी अशी म्हातारी; आणि आई, तीही ·सांथीनें पछाड· लेली ! यावरून एकदा त्यांत आपलें बोट ‘ घावल्या ’ नंतर आतां हात मागें काढून घेणें शक्य नाहीं; आतां तड लावलीच पाहिजे हें ग्यानबांनीं ओळखलें. पंढरीला कधीं नव्हत जाण्याची तयारी करून आपण निघालों असतां त्यांतही पांडुरंगानें असें विघ्न आणावें; आणि हीही वारी पुरी होऊं देऊं नये याबद्दल त्यांना अतिशय वाईट वाटलें; व पंढरी—तुकोबाची पंढरी—डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहण्याइतकें पुण्यही आपल्या नशीबीं असूं नये ना असा विचार मनांत येऊन त्यांचे डोळे पाण्यानें भरून आले. तुकाराम महाराजांची एक वारी अशीच अंतरली असतां त्याप्रसंगीं त्यांनीं म्हटलेला एक अभंग त्याच आतुरतेनें ग्यानबाही म्हणूं लागले :

“ कां माझे पंढरी न देखतां डोळे ।
काय हें न कळे पाप यांचे ॥
पापपंथें कां हे न चलती वाट ।
कोण हें अदृष्ट कर्म बळी ॥
कां हे पायावरी न पडे मस्तक ।
क्षेम कां हस्तक न पावती ॥ ”

पण हा अभंग म्हणता म्हणताच ग्यानबांच्या मनांत आणखी विचार आला. ते म्हणाले, “ जें कां रंजले गांजले । त्यासि म्हणे जो आपुलें ॥ तोचि साधु ओळखावा । देव तेथेंची जाणावा ॥ ” असें ज्या परमेश्वराचें ब्रीद त्यानेंच जर ही योजना करून आपल्याला या गरीबांची व अनाथांची सेवा करायला लावलें असेल तर या सेवेनेंच त्या पांडुरंगाचीही सेवा कां नाहीं होणार ? मग हेंच आपलें खरें पंढरपूर. त्याच्या इच्छेनेंच जर आपली पंढरीची वारी चुकणार असेल तर आपल्याला कांहींच वाईट वाटून घेण्याचें कारण नाहीं. कारण पांडुरंग सर्वसाक्षी आहे; तो आपला भाव ओळखील; आणि आपल्याला

कदापि अंतर देणार नाहीं. या विचारानें त्यांना समाधान वाटलें; आणि त्या समाधानाच्या भरांत त्यांनीं पुढील अभंग म्हटला:—

“ परी तो आहे कृपेचा सागर ।
तोंवरी अंतर पडों नेदी ॥
बहु कान दृष्टी आइके देखणा ।
पुरोनिया जना उरलासे ॥
सांगितल्याविणें जाणे अंतरींचें ।
पुरवावें ज्याचें तैसें कोड ॥
बहु मुखें कीर्ति आइकली कानीं ।
विश्वासही मनीं आहे माझ्या ॥
तुका म्हणे नाहीं जात वायावीण ।
पाळितों वचन बोललों तें ॥ ”

या विचारानें ग्यानबांच्या मनास फारच आनंद झाला; आणि नामस्मरणाच्या नादांत तल्लीन होऊन त्यांना लवकरच गाढ झोंप लागली.

याप्रमाणें एकामागून एक दिवस गेले. ग्यानबांच्या प्रेमळ शुश्रूषेनें तुकाराम व त्याची बायको विठाई हीं दोघेंही लवकरच बरीं होऊन आपलें कामधाम थोडेंबहुत पाहूं लागलीं. त्यांच्या दोघां मुलांनाही ग्यानबांचा फार लळा लागला. छोटा भिवा तर नेहमीं ग्यानबांच्याजवळ बसे. त्याची बहीण हौशी ही तर ‘आजोबांची’ सगळी व्यवस्था पाहण्याचें काम आपल्याशिवाय कोणासच करूं देईनाशी झाली. त्यांना पाहून ग्यानबांना स्वतःच्या लहानग्या नातवंडांची आठवण होई; आणि त्यामुळें त्यांचाही जीव त्या मुलांवर लागला. त्या दोघांना त्यांनीं अभंग शिकवावे व संध्याकाळीं त्यांना घेऊन प्रेमळ भजन करावें. त्यांनीं तुकारामाची सर्व व्यवस्था लावून दिली. त्याच्या घरांत पुढल्या हंगामा-पर्यंतची बेगमी करून दिली; पोटासाठीं त्यानें आउतकाठी गहाण टाकली होती ती सोडवून दिली; व पुन्हा पाऊस चांगला पडला तर

मधल्या विपत्तींमुळें त्यांची कोणतीही अडचण न होईल अशी तजवीज करून ठेविली.

हें सर्व होत असतांना ग्यानबांनीं आपली निजायची जागा बाहेर अंगणांत ठेवली होती तीच कायम ठेवली. तुकारामानें, त्याच्या आईनें व बायकोनें त्यांना घरांत येण्यास पुष्कळ आग्रह केला; पण त्यांनीं आपली जागा मुळींच सोडली नाहीं. याप्रमाणें एके दिवशीं रात्रीं भजन करतांना त्यांनीं मनांत विचार केला कीं, आपलें येथलें काम संपलें, आतां आपण येथून पाय काढावा. हिशेब करतांना त्यांना दिसून आलें कीं, आपल्याला येथें महिन्यावर दिवस होऊन गेले. आषाढी एकदोन दिवसांवर आली होती. आतां पुढें पंढरीस जाणें अशक्यच. जवळचे पैसे मोजून पाहतां, घरून निघतेवेळीं घेतलेल्या १०० रुपयांपैकीं सर्व खर्च होऊन अवघे १५।१६ रुपयेच शिल्लक राहिलेले आढळून आले. तेव्हां आतां आपला थेट घरचा मार्ग सुधारावा हेंच उत्तम, असा त्यांनीं निश्चय केला. या लोकांस सांगितलें तर ते आग्रह करून आपणांस आणखी ठेवून घेतील; मुलें सोडणार नाहींत; निघतांना दोघांसही वाईट वाटेल; यापेक्षां आपणच मोठ्या पहांटेस उठून मुकाट्यानें चालूं लागावें हें उत्तम, असा त्यांनीं विचार ठरविला. त्याप्रमाणें पहांटे उठून त्यांनीं आपली पडशी आवरली; मुखप्रक्षालन केलें, आणि " पांडुरंगा, तूं सोंपविलेली कामगिरी मीं यथाशक्ति केली ती मानून घे " असें देवाला म्हणून त्यांनीं घराबाहेर पाय टाकला. अंगणाच्या दाराशीं येतांच ते पुन्हां थांबले; व झोंपडीचा व आंतील मंडळींचा निरोप घेण्यासाठीं त्यांनीं मागें वळून पाहिलें. ती मंडळी व तें ठिकाण सोडतांना ग्यानबांचा ऊर खरोखरीच दाटून आला. त्या लहानग्या मुलांचा, त्यांच्या प्रेमळ आईबापांचा आणि त्या म्हातारीचा वियोग त्यांना दुःखकारक वाटला. पण त्यांनीं निश्चयानें आपले डोळे पुसले; झोंपडीला व आंत विश्रब्धपणानें झोंपी गेलेल्या माणसांना शेवटचा निरोप म्हणून त्यांनीं एक साष्टांग नमस्कार घातला; आणि—

सर्वांच्या चरणीं मस्तक ठेवितों ।
आम्हीं आतां जातों निजधामा ॥
सर्वत्र मिळोनि विनंति हे ऐका ।
भजनीं करू नका आळस कोणी ॥
पोटाचियेसाठीं चिंता न करावी ।
देईल गोसावी अलबेले ॥

हा अभंग म्हणून त्यांनीं घराच्या बाहेर पाऊल टाकलें.

ग्यानबांचा परतीचा प्रवास फारच सुखकर झाला. बरोबर बोलणारें कोणी नसल्यामुळें एकतानतेनें नामस्मरण करीत आणि तुकोबाचे अनेक अभंग म्हणत मार्ग कसा सरला हें त्यांना कळलेंच नाहीं. तुकाराम व त्याची मंडळी सोडल्यापासून सुमारें तीन वारांतच ग्यानबा आपल्या घरीं सुखरूप पोंचले. वेळेपेक्षां आधीं आणि तेही एकटे आल्यामुळें गांवांत सर्वांसच फार आश्चर्य वाटलें. पण ग्यानबा म्हणाले कीं, "वाटेंत माझे पैसे एका मुक्कामावर हरवले; म्हणून मी परत फिरलों. सोनबांना चांगली सोबत मिळाली, व ते पुढें गेले. वारी करून सुखरूप परत येतील. कांहीं काळजी करूं नका." या खुलाशानें सर्वांचें समाधान झालें; आणि ग्यानबाही आपल्या नित्यक्रमांत मग्न झाले.

—५—

ग्यानबा पाणी पिण्यासाठीं म्हणून निघून गेल्यावर सोनबांनीं तीनचार मैल हळूहळू मजल मारली; पण ग्यानबांचा अद्यापही पत्ता नाहीं असें पाहून त्यांच्यासाठीं थोडावेळ थांबण्याचा त्यांनीं विचार केला. म्हणून एका झाडाखालीं सावलींत ते कांहीं वेळ बसले. समोरच एक कुळव चालला होता तो पाहून त्यांच्या मनांत आपल्या शेताचे विचार येऊन आपल्याकडे कुळव सुरू झाला असेल कीं नाहीं, थोरला पोरगा कामाकडे नीट लक्ष देत असेल कीं ख्यालीखुशालींतच वेळ घालवीत असेल, असे विचार त्यांना त्रास देऊं लागले. विचार करतांना त्यांनीं पडशी

मागें ठेवून त्याजवर डोकें ठेविलें आणि उन्हाचा त्रास होऊं नये म्हणून तोंडावरून उपरणें घेतलें; व त्याच स्थितींत त्यांचा डोळा लागला तो चांगला दीड दोन तास. सोनबांनीं जागें होऊन पाहिलें तों दिवस बराच खालीं गेलेला ! आपल्याला बराच वेळ झोंप लागली, त्या अवधींत ग्यानबा खास पुढें गेले असले पाहिजेत, व आपण बाजूला झाडाखालीं सावलींत निजल्यामुळें त्यांचें आपल्याकडे लक्ष गेलें नाहीं असा कयास बांधून सोनबांनीं पुढला मार्ग चालण्यास सुरवात केली. मुक्कामाच्या गांवीं संध्याकाळीं येऊन तपास करतां ग्यानबा तेथें कोठें दिसेना, परंतु कांहीं वारकरी अस्तमानापूर्वींच पुढील मुक्कामाला रवाना झाल्याचें समजलें. तेव्हां त्यांना वाटलें कीं, आपण ज्याअर्थीं येथें नाहीं त्याअर्थीं आपण येथें न थांबतां कदाचित् पुढील मुक्कामाला गेलों असूं अशा विचारानें ग्यानबाही सोबत मिळून पुढें गेले असतील. सोनबांना रात्रीं लागलीच एकट्यानें पुढें जाणें शक्य नव्हतें. त्यांना रात्रीचा मुक्काम तेथें करणें भागच पडलें; व ग्यानबा पुढें गेले असतील तर ही मुक्कामाची चूक शेवटपर्यंत तशीच राहणार हें उघडच होतें. म्हणून आतां शेवटीं पंढरीसच आपली दोघांची गांठ एकदम पडेल असा विचार त्यांनीं केला. पंढरपूर आतां थोड्या दिवसांच्या मजलेवर राहिलें असल्यामुळें, आसपासच्या प्रांतांतील वारकरीही त्या वाटेनें जाणारे पुष्कळ भेटले; त्यामुळें सोबतीची विशेष अडचण नव्हती. पण सोनबांना ग्यानबांची चुकामूक झाल्याबद्दल वाईट वाटण्याचें मुख्य कारण असें कीं, आपला एक विश्वासूक व खात्रीचा सोबती नाहींसा झाला. वाटेनें एकमेकांच्या सुखदुःखाच्या गोष्टी बोलत मार्ग लवकर संपे. शिवाय जवळच्या सामानसुमानाची कोठें मुक्कामाला उतरलें तर दोघे असल्यामुळें काळजी नव्हती. घरून निघतांना बरोबर घेतलेल्या शंभर रुपयांपैकीं फारच थोडा खर्च आतांपर्यंत झाला होता. शिवाय अडीअडचणीला उपयोगी पडावें म्हणून त्यांनीं वीस तोळ्यांचें एक सोन्याचें कडेंही पडशींत तळाशीं कोणाला न कळत ठेवून दिलें होतें. यामुळें हा सर्व ऐवज

एकट्याजवळ सुरक्षित राहण्याची त्यांना काळजी वाटूं लागली. कोणी माणूस आपल्या जवळ उतरला कीं, त्यांना तो कदाचित् चोर तर नसेलना म्हणून शंका येऊन मनाची स्वस्थता नाहींशी होई. तरी पण इतर वारकऱ्यांबरोबर मजल दरमजल करीत ते एकदाचे आषाढीच्या आधीं दोन दिवस पंढरपुरास सुखरूप येऊन पोंचले.

पंढरीस शोध करतात तों तेथेंही ग्यानबा नाहीं! सोनबांनीं वारकरी उतरण्याचीं सगळीं ठिकाणें शोधून पाहिलीं, पण कोठेंच ग्यानबांचा शोध लागेना. त्यांच्या वर्णनाचा कोणी वारकरी आल्याचेंही कोठें त्यांना ऐकूं येईना. याप्रमाणें एक सबंध दिवस त्यांनीं आपल्या मित्राच्या शोधांत, आपली पडशी खांद्यावर टाकून, घालविला. हेतु हा कीं, ग्यानबांची गांठ पडतांच त्यांच्या मुक्कावर आपलें बिऱ्हाड टाकावयाचें; किंवा त्यांची जागा सुरक्षित नसेल तर त्याला आपल्या जागीं आणावयाचें. पण व्यर्थ! दुसऱ्या दिवशीं दशमी असल्यामुळें कीर्तनास व भजनी दिंड्यांस खरी सुरवात होती. तिकडे जाण्यांत आणि क्षेत्रांतील देवांचीं दर्शनें घेण्यांत सगळा वेळ जाणार असल्यामुळें त्या दिवशीं ग्यानबांचा शोध करणें शक्यच नव्हतें.

दशमीच्या दिवशीं सोनबांनीं लवकर उठून चंद्रभागेचें स्नान केलें व पैशाचा कसा हळूच कमरेला बांधून व सोन्याचें कडें पोटीशीं नेसत्या धोतरांत बांधून ते घाईघाईनें विठोबाच्या देवळांत आले. तेथें भजनी दिंड्यांची एकच गर्दी उसळली होती. ठिकठिकाणच्या दिंड्या दूरदूरच्या गांवांवरून दरसालाप्रमाणें आल्या होत्या, त्यांच्या पाळया लागल्या होत्या. मंडपांत व बाहेर गर्दी तर मनस्वी झाली होती. त्या वेळीं देवळांत जाण्याची व दर्शनाची हल्लींच्यासारखी व्यवस्था व सोय नव्हती. 'बळी तो कान पिळी' या न्यायानें जो स्वतःच्या बळावर सर्वांस मागें रेटून आधीं पुढें घुसेल त्याला दर्शन आधीं मिळावयाचें. रंगूबुवांची दिंडी त्या वेळीं फार श्रेष्ठ मानली जात असे; कारण ते बुवा म्हणजे

तुकारामबुवांच्या खास शिष्यांपैकीं समजले जात. म्हणून त्या दिंडीच्या वेळीं, आणि बुवांच्या कीर्तनाच्या वेळीं, लोकांचा म्हणजे नुसता तोबा उडे. सोनबांनीं मोठ्या प्रयासानें त्या दिंडींत वाट मिळविली. दिंडीच्या मध्यभागीं खुद्द बुवा उभे राहून भजन करीत. त्यांच्या पायां पडण्या-बद्दल प्रत्येकाची विलक्षण धडपड चाले. त्या गर्दींत सोनबाही शिरले. पण त्यांना बुवांपर्यंत पोंचतां आलें नाहीं. बुवांचें दुरून दर्शन मात्र झालें. पण तेथें एक चमत्कार सोनबांच्या दृष्टीस पडला! सोनबांचा प्रथम आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. त्यांनीं डोळे ताणून पुन्हा बुवांकडे पाहिलें, तरी तेंच! आपण स्वप्नांत तर नाहींना म्हणून त्यांनीं स्वतःस चिमटाही घेतला. पण छेः! अगदीं ग्यानबाच! तोच अंगरखा, तेंच पागोटें, कमरेला उपरणें बांधण्याची तीच तऱ्हा, मुळींच शंका नाहीं. खास ग्यानबाच! ग्यानबा बुवांच्या अगदीं जवळ उभा राहून भजनानंदांत तल्लीन झाला होता!

ग्यानबा येथें कसा व केव्हां आला याचा अचंबा वाटून सोनबा विचार करीत आहेत, तोंच गर्दीचा एक धक्का बसून ते जोरानें मागें सारले गेले. गर्दीचा जोर खूपच झाल्यामुळें त्यांना पुन्हा पुढें जाणें अशक्य झालें. इतक्यांत भजन संपून देवळांत दर्शनाला जाण्याची वेळ झाली म्हणून सगळी गर्दी देवळाच्या गाभाऱ्याकडे लोटली. त्याबरोबर सोनबा तिकडे खेंचले गेले. या गर्दींत ते वारंवार आपली कमर चांचपून पैसे वगैरे सर्व बरोबर आहेत अशी खात्री करून घेत. बरेच धक्केबुक्के खाल्ल्यावर सोनबांचा एकदाचा देवळांत प्रवेश झाला. त्या गर्दींतच ते कसेबसे विठोबाच्या मूर्तीपर्यंत पोंचले. ज्या मूर्तीचें दर्शन घेण्यासाठीं आपण इतका प्रवास केला, इतके कष्ट केले, ती मूर्ति, तो पांडुरंग, आज दृष्टीस पडला म्हणून सोनबांस आनंद झाला. त्यांनीं मूर्तीच्या पायांवर डोकें ठेवून पायांना घट्ट मिठी मारली, मूर्तीकडे डोळे भरून निरखून पाहिलें व ते म्हणाले, "पुंडलिक वरदा हरि विठ्ठल." पण इतका वेळ त्यांना तेथें कोण थांबूं देणार? मागून गर्दी रेटतच होती.

मागल्या वारकऱ्यानें त्यांना पुढें रेटलेंच. त्या रेटारटींत त्यांनीं मूर्तीकडे पुन्हा एकवार पाहिलें तों काय आश्चर्य ! ग्यानबा ! तेंच पागोटें, तोच अंगरखा घालून मूर्तीच्या उजव्या बाजूस तल्लीन होऊन भजन करीत उभा आहे ! पण नुसता दृष्टीस पडून काय उपयोग ? ग्यानबा येथेंही इतक्या गर्दीतून आणि तोही इतक्या अग्रस्थानीं कसा आला याचें सोनबा आश्चर्य करतात न करतात, तोंच मागून येणाऱ्या गर्दीनें ते आपोआप बाहेर रेटले गेले.

—६—

ग्यानबा पंढरींत आहे हें तर खास. कारण सोनबा ज्या ज्या वेळीं देवळांत कीर्तनाला, भजनाला किंवा दर्शनाला जात त्या त्या वेळीं ग्यानबा तेथें कोठें तरी अग्रस्थानीं बसून नामस्मरणांत रंगून गेलेला दृष्टीस पडे. त्याची गांठ घेण्याचे सोनबांनीं पुष्कळ प्रयत्न केले; पण त्याची भेट मात्र झाली नाहीं. एकदां तर देवळांत कथा संपून सर्व लोक जाईपर्यंत ते बाहेर उभे राहिले. प्रत्येकजण बाहेर पडतांना सोनबा त्याजकडे निरखून पहात. शेवटीं त्यांनीं देवळांत जाऊनही खात्री करून घेतली; पण त्या वेळीं ग्यानबा आंत मुळींच नव्हता ! त्यांनीं वारकऱ्यांच्या सर्व जागा पुन्हा शोधल्या तरी ग्यानबाचा पत्ता नाहीं ! मग मात्र त्याला ग्यानबाचा राग आला; व त्यांनीं शोध करणें सोडून दिलें. कारण आपण ग्यानबाचा इतका तपास करीत असतां, त्यानें मात्र पंढरीस आधीं येऊन व देवळांत हरएक वेळीं इतकी चांगली जागा मिळवून आपली वास्तपुस्तही करूं नये ही गोष्ट त्यांना साहजिकच लागण्यासारखी होती.

शेवटीं काला झाला; आणि वारकरी परत फिरूं लागले. ग्यानबा अजूनही आपला तपास करील अशी सोनबांना आशा होती. पण नाहींच! देवळांत दृष्टीस पडण्यापलीकडे ग्यानबाचा त्यांना थांगच लागेना. तेव्हां सोनबांनींही आपली निघण्याची तयारी केली; आणि थेट आपल्या गांवींच येण्याचें ठरविलें. ग्यानबाचा राग आल्यामुळें, व त्याची सोबत नस-

त्यामुळें आळंदी, देहू वगैरे क्षेत्रीं जाण्याचा बेत त्यांनीं रद्द केला. शिवाय घरच्या काळजीमुळें घरीं परत जाण्याचीही त्यांना उत्तरोत्तर जास्त ओढ लागली. म्हणून ते काला झाल्याच्या दुसरे दिवशींच निघाले; आणि आपल्या वाटेस लागले.

याप्रमाणें वाट चालतां चालतां एके दिवशीं संध्याकाळीं ज्या गांवीं ग्यानबाची व त्यांची, पाणी पिण्याच्या निमित्तानें सोबत सुटली, त्या गांवाजवळ सोनबा आले. तेथें रात्रीचा मुक्काम करून सकाळीं सोनबा पुढें जाणार होते. गांव जवळ आलें होतें; व सोनबा आपली वारकऱ्याची पताक खांद्यावर घेऊन हळूहळू मार्ग चालत होते. जवळच्या एका शेतांत एक मुलगा व मुलगी गुरांच्या मागें शेणी वेंचत होती. त्यांचें लक्ष सोनबांकडे जातांच तो लहान मुलगा आपल्या बहिणीस हांक मारून म्हणाला, "हौशे, हौशे, ते बघ आजोबा चालले आहेत. चल, चल, घेऊन येऊं त्यांना." हौशीनें ते शद्ब ऐकतांच हातांतली पाटी टाकून दिली व म्हटलें, "खरंच रे भिवा; चल लौकर." तीं मुलें एकदम पुढें झटकलीं आणि मागून येऊन सोनबांना बिलगलींच. भिवा आपल्या बोबड्या शब्दांत म्हणाला, " आँ, आजोबा, पळून गेलां व्हतांत नाहीं कां ? पण पकडलं कीं नाहीं तुम्हांला. आतां नाहीं सोडणार तुम्हांला आम्ही. "

सोनबा एकदम आश्चर्यचकित झाले. कारण इतक्या दूर देशांत आपलें कोणी आप्त असल्याचें त्यांना कधींच ठाऊक नव्हतें. मग आपल्यास ' आजोबा ' म्हणून हांक मारणारीं नातवंडें असणें तर लांबच ! म्हणून ते मागें वळून कांहीं म्हणणार तों हौशीनें त्यांच्या चेहऱ्याकडे पाहून म्हटलें, " अरे भिवा, नव्हेरे, हे नव्हेत आजोबा; पण हे त्यांच्या-प्रमाणेंच वारकरीच दिसतात; कारण खांद्यावर पताक आहे पहा. चल, यांनाही आपण घेऊन जाऊं घरीं. आजीनं न् आईनं सांगितलंय् आपल्याला, कीं वाटेनं कोणीही वारकरी दिसला तर त्याला पायां पडून घरीं आणा म्हणून. "

सोनबांना या सगळ्याच प्रकारचा चमत्कार वाटला व हीं मुलें आहेत तरी कोण, हें पाहण्याच्या कुतूहलानें ते त्यांच्या आग्रहास्तव त्यांच्याबरोबर घरीं जाऊन त्यांच्या आजीस व आईस भेटण्यास तयार झाले. त्यांच्या झोंपडींत जातांच त्यांचें जें स्वागत झालें त्यामुळें तर सोनबा चकितच झाले. त्या मुलांची आई व आजी यांनीं अगदीं एकादा मोठा सत्पुरुष आल्याप्रमाणें त्यांना वंदन करून त्यांचें स्वागत केलें. सोनबा म्हणाले, " बाई, हें काय ? मी वारकरी आहें खरा; पण मी आपला गांवांत धर्मशाळेंत उतरतों. "

" न्हाई रे बाबा ! " म्हातारी म्हणाली, " आमच्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत आम्ही वारकऱ्याला दुसरीकडे कधीं जाऊं देऊं कां ? पांडुरंग काय म्हणेल आम्हांला ? "

" खरंच, वारकऱ्यांची तुम्ही इतकी भक्ति करतां हें पाहून मला फार बरं वाटलं. पण माझी तशी कांहीं गैरसोय नाहीं. "

" वारकऱ्यांची भक्ति नाहीं करायची तर काय कृतघ्न म्हणून आम्हीं नरकांत जावं, होय ? " म्हातारीनें अभिमानानें उत्तर दिलें. " बाबा, दोनच महिन्यांपूर्वीची गोष्ट; आम्ही उपासमारींत अन् आजारानें सगळीं-जणं मरायला लागलों होतों. तेव्हां विठोबाच वारकऱ्याचा वेष घेऊन प्यायला पाणी मागायला म्हणून घरांत आला, अन् आमच्यावर दया करून त्यानं आम्हां सगळ्यांना वांचवलंन्. "

' पाणी प्यायला म्हणून एक वारकरी दोन महिन्यांपूर्वी घरांत आला' हे त्या म्हातारीचे शब्द ऐकून सोनबांची जिज्ञासा एकदम जागृत झाली; आणि त्यांनीं त्या वारकऱ्याबद्दल अधिक माहिती विचारली. इतक्यांत तिचा मुलगा तुकारामही तेथें आला; आणि त्या सर्वांनीं मिळून आपापल्यापरी तीच हकीगत सोनबांस पुनः पुनः उत्साहानें सांगितली. ही हकीगत ग्यानबाबद्दलच आहे याविषयीं सोनबांस शंका उरली नाहीं. पण आषाढीच्या दशमीस व एकादशीस ग्यानबाला पंढरपुरास पाहि-

त्याचा संशय त्यांना फेडून घ्यावयाचा होता. म्हणून त्यांनीं तुकारामास विचारलें, "तो पाहुणा येथून गेला तो नक्की दिवस तुम्हांला ठाऊक आहे ?"

"हो, ठाऊक आहे तर. आषाढी एकादशीच्या आदल्याच दिवशीं बघा. ते गेले अन् दुसऱ्याच दिवशीं आम्ही एकादशीचा उपास केला."

"अन् काय हो बघा, ते गेले तर आम्हांला आपलं नांवगांवसुद्धां सांगून गेले नाहींत. माणूस नव्हतच ते, देवच बघा! माणूस असता तर महिनाभर आमच्या इथं राहून आम्हांला आपलं नांवसुद्धां सांगितलं नसतं ? अक्शी देवच तो! गप्कन् आला अन् तसाच गप्-कन् गडप् झाला!" म्हातारी म्हणाली.

—७—

"काय, गजाबाई, ग्यानबा आहेत कां घरांत ?"

ग्यानबांची बायको गजाबाई सकाळच्या वेळीं अंगणांत सडा टाकीत उभी असतांना तिनें वरील शब्द ऐकून मागें पाहिलें तों सोनबा पाटील दारांत उभे राहून चौकशी करीत असलेले दिसले. तिनें लागलीच हातां-तलें भांडें खालीं ठेवलें; आणि हास्यमुखानें पुढें होऊन म्हटलें, "या पाटील, या. केव्हां आलांत परत ?"

सोनबा आंत आले आणि म्हणाले, "मी होय, काल संध्याकाळीं परत आलों."

"बरं झालं; सुखरूप परत आलात लांबची वारी करून. तुमची निम्या वाटेपर्यंतची खुशाली कळलीच होती आम्हांला घरधन्याकडून; पण पुढें तुम्ही एकटेच गेलां म्हणून जरा काळजी वाटत होती."

"होय, ग्यानबा मधूनच परत आले खरे. ते आहेत कां घरांत ?"

"आहेत कीं," गजाबाईनें उत्तर दिलें. "बसले आहेत सूत कातीत मागल्या पडवींत. आतां त्यांच्यानं शेतांतल काम कांहीं होत नाहीं. तेव्हां बसतात घरांतच कांहीं तरी करीत. पण पाटील, कांहीं

म्हणा; घरांतलं माणूस घरांत असल्याशिवाय कांहीं शोभा नाहीं घराला. आतां घरधनी नव्हते ना कांहीं दिवस घरांत, तर कसं सगळ्यांना चुकल्या चुकल्यासारखं व्हायचं. लहान पोरांचं एक असो; पण आमचा गणपू तर एवढा बाप्या आहे ना ? पण तो सुद्धां वारंवार म्हणायचा— आई, दादा घरांत नाहींत तर भाकरी कांहीं गोड लागत नाहीं. कांहींतरी चुकल्यासारखं वाटतं. "

गजाबाईचें हें बोलणें ऐकून सोनबांच्या मुखावर क्षणमात्र खिन्नतेची छाया पसरली; व ती तिजपासून लपविण्यासाठीं ते आंत ग्यानबाला भेटण्याकरितां शिरले. आंत ग्यानबा तोंडानें कांहीं तरी भजन गुणगुणत चरक्यावर सूत काढण्यांत निमग्न झाले होते; इतके कीं सोनबांनीं हांक मारीपर्यंत त्यांच्याकडे त्यांचें लक्षच गेलें नाहीं. पण सोनबांची हांक ऐकतांच ग्यानबा एकदम उठले व सोनबांच्या पायांवर त्यांनीं एकदम डोकें ठेविलें.

" ग्यानबा, हें काय ? " त्यांना वर उचलून घेत सोनबा म्हणाले.

" वा पाटील, आपण पंढरीची वारी करून आलां; विठोबाचं प्रत्यक्ष दर्शन तुम्हीं घेतलं. तुमचं पुण्य थोर ! आमची तितकी पुण्याई नाहीं. आम्ही तुमच्या पायां पडणंच योग्य. " ग्यानबांनीं उत्तर दिलें.

" छे, छे. ग्यानबा, तुमची चूक आहे. आम्ही प्रपंचांत गुरफटलेलीं माणसं. आम्हीं वारी केली तरी ती शरीरानं. आमचं शरीर पंढरीला गेलं तरी मन घरींच; आणि तेंही घर कसं हें तुम्ही जाणतांच. तुम्ही घरीं आलांत तर प्रत्येकाला आनंद; मी घरीं आलों तर त्रास म्हणून सगळ्यांच्या कपाळाला आंठ्या. तरी पण असल्या संसारांत सुद्धां आमचा जीव गुंततोच. आणि तुम्ही शरीरानं कुठंही असलां तरी तुमचं मन मात्र पंढरीस, नव्हे, अगदीं विठोबाच्या चरणीं. खरी वारी तुमची; आमची नुसती मजुरी. "

सोनबांचा कंठ दाटून आला, आणि त्यांनीं खऱ्या भक्तीनें ग्यानबांच्या पायांवर मस्तक ठेविलें.

"हें काय बोलतां पाटील; असं कधीं झालंय्. पंढरीला जाऊन विठोबाच्या पायांवर लोटांगण घालण्याचं भाग्य आमच्या नशिबीं नाहीं."

"असला युक्तिवाद मी तरी आतां ऐकायचा नाहीं. ग्यानबा, आषाढी एकादशीच्या आदल्याच दिवशीं तुम्हीं तुकारामाची झोंपडी सोडली; आणखी त्याच दिवशीं पंढरीस मी तुमची मूर्ति —"

"जाऊं द्या पाटील" ग्यानबांनीं घाईघाईनें मध्येंच बोलून त्यांना थांबविलें. "जाऊं द्या पाटील, आपण काय कुणाचं करतों. तुकोबांनीं सांगितलंच आहे कीं, 'करविता धणी वेगळाची' आपण कसला अभिमान वाहावा. बरं झालं तुम्हीं वारी करून सुखरूप परत आला."

"माझं शरीर जसं गेलं तसं परत आलं. शरिराची वारी शरिराबरोबर; पण मनाची खरी वारी कशी करायची हें ग्यानबा, तुम्हीं मला शिकविलं. तुमच्यांत एकट्या तुकारामाला व त्याच्या घरच्या मंडळींनाच देव दिसला असं नाहीं; तर मलाही तुमच्यांतच देव दिसला. कारण तुकोबांनीं सांगितल्याप्रमाणें—

जे कां रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले ॥
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥
ज्यासी आपंगिता नाहीं । त्यासी धरी जो हृदयीं ॥
तुका म्हणे सांगूं किती । तोचि भगवंताची मूर्ति ॥

# लेखक परिचय

## केशवसुत ( १८६६-१९०५ )

यांचें सबंध नांव कृष्णाजी केशव दामले. त्यांचें शिक्षण पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूलमध्यें प्रवेशपरीक्षेपर्यंत झालें. त्यानंतर त्यांचें सर्व आयुष्य खानदेशांत शाळामास्तरची नोकरी करण्यांत गेलें. १९०५ सालीं हुबळी येथें प्लेगनें ते वारले. अर्वाचीन मराठी काव्याला नवीन जोमदार व स्वतंत्र वळण लावणाऱ्या कवींमध्यें केशवसुतांना अग्रस्थान द्यावें लागेल. १८८५ ते १९०५ पर्यंतच्या वीस वर्षांच्या काळांत त्यांनीं सुमारें १५० भावगीतें लिहिलीं. यांपैकीं थोडीं भाषांतरात्मक असून बाकी सर्व स्वतंत्र आहेत. त्यांच्या कवितेंत नादमाधुर्य कमी असलें तरी ओजस्विता व स्फूर्तिदायकता हे गुण भरपूर आहेत. नव्या कल्पना व जोरकस भाषा यांमुळें केशवसुतांच्या कवितेंत जिवंतपणा वाटतो; व त्यांतील भावनांची उत्कटता वाचकांच्या हृदयाला जाऊन भिडते.

## राजाराम परशुराम सबनीस ( १८९३ )

शिक्षणप्रसारक मंडळी, पुणें, या संस्थेचे हे आजीव सेवक असून सर परशुरामभाऊ कॉलेजांत अर्थशास्त्र, गणित, इतिहास हे विषय ते शिकवितात. महाराष्ट्राचा इतिहास व संस्कृति यांबद्दल त्यांना विशेष अभिमान वाटतो. यांनीं फार लिहिलेलें नाहीं, परंतु जें लिहिलें आहे तेंच विचारपूर्वक लिहिलें असल्यामुळें त्याला एक प्रकारचें महत्त्व आहे. स्वाभिमान व परगुणग्रहण या इष्ट प्रवृत्तींचें मिश्रण यांच्या ठायीं दिसून येतें. ' जगाचें वाङ्मय ' या नांवाचीं दोन पुस्तकें यांनीं प्रसिद्ध केलीं असून त्यांमध्यें निरनिराळ्या देशांतील लेखकांचे उत्कृष्ट उतारे संग्रहित केले आहेत.

## एकनाथ ( १५४८-१६०९ )

एकनाथांचा जन्म पैठणास झाला. लहानपणींच वैराग्य उत्पन्न झाल्यामुळें जनार्दनस्वामीकडे ते गेले आणि त्यांचें शिष्यत्व त्यांनीं पत्करिलें. गुरूपदेश झाल्यावर परत पैठणास येऊन त्यांनीं गृहस्थाश्रम स्वीकारला. त्यांची सर्व ग्रंथरचना पैठणासच झाली. कवि आणि संत या दोन्ही नात्यांनें एकनाथाची योग्यता फार मोठी आहे. त्यांना मराठीचा अभिमान फार वाटत असे आणि पंडितांच्या विरोधाला न जुमानतां त्यांनीं

मराठींत ग्रंथरचना केली. एकनाथी भागवत, भावार्थ रामायण, व रुक्मिणीस्वयंवर हे त्यांचे ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत. वेदान्त, तत्त्वज्ञान आणि भक्ति यांचें यथायोग्य प्रमाणांत मिश्रण एकनाथी वाङ्मयांत पहावयास सांपडतें.

## नरसिंह चिंतामण केळकर ( १८७२ )

एल्‌एल्. बी. झाल्यानंतर केळकरांनीं साताऱ्याला वकिलीला सुरुवात केली होती. परंतु लिहिण्याची हौस; त्यामुळें 'केसरी' व 'मराठा' या वर्तमानपत्रांकडे टिळकांनीं मुद्दाम बोलावून घेतलें. टिळकांच्या हयातींत आणि नंतर हीं पत्रें त्यांनीं उत्कृष्ट-पणें चालविलीं. वर्तमानपत्री लेखनाचा दर्जा केळकरांनीं आपल्या व्यासंगानें वाढ-विला. मराठी गद्याचें ऐश्वर्य वाढविण्यास त्यांचें विपुल लेखन सर्वस्वी कारणीभूत झालें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. केसरी व मराठा या पत्रांतून वेळोवेळीं नानाविध विषयांवर त्यांनीं लेख लिहिले आहेत. त्याखेरीज 'मराठे व इंग्रज,' 'राज्य-शास्त्र,' 'टिळकांचें चरित्र,' 'आयर्लंडचा इतिहास,' 'ग्यारिबाल्डीचें चरित्र' इत्यादि पुस्तकें व 'तोतयाचें बंड' वगैरे सात आठ नाटकें त्यांनीं लिहिलीं आहेत. त्यांच्या-इतकें विपुल व विविध लेखन फारच थोड्या लेखकांचें असेल.

## भास्कर रामचंद्र तांबे ( १८७४ )

हे ग्वालेरकडील असून त्यांचें शिक्षण व नौकरी तिकडेच झाली आहे. तांबे यांच्या कवितांचे दोन भाग प्रसिद्ध झाले आहेत. पहिल्या भागांतील बऱ्याचशा कविता कौटुंबिक वातावरणासंबंधीं आहेत. त्यांचीं नाट्यगीतें बहारीचीं आहेत व मुलांसंबंधीं लिहिलेल्या कवितांवरून त्यांचा प्रेमळपणा दिसून येतो. उच्च तऱ्हेची गूढ गुंजनात्मक कविता लिहिण्याची प्रथा तांबे यांनींच पाडली. अर्वाचीन मराठी कवींमध्यें पहिल्या-प्रतीचे जे कवि आहेत त्यांच्यांत तांबे यांची गणना होते.

## श्रीपाद रामचंद्र पारसनीस ( १९०१ )

हे मुंबई विश्वविद्यालयाचे एम्. ए. असून डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सभासद आहेत. सांगली येथील विलिंग्डन कॉलेजांत संस्कृत व मराठी या विषयांचे ते अध्यापक होते. सध्यां सोसायटीनें चालविलेल्या सातारा येथील न्यू इंग्लिश स्कूलचे सुपरिंटेंडेंट आहेत. 'न्यूटनचें चरित्र,' 'ना. गोखले यांचें चरित्र' हीं पुस्तकें व कांहीं वाङ्मयटीकात्मक लेख यांनीं लिहिले आहेत.

## गिरीश ( १८९३ )

श्री. शंकर केशव कानेटकर हे आपला कविता 'गिरीश' या टोपण नांवानें प्रसिद्ध करतात. यांचें मूळ गांव सातारा जिल्ह्यांतील रहिमतपूर. हे एम्. ए. असून 'अभागी कमल,' 'कला,' 'आम्बराई' हीं खण्डकाव्यें यांनीं लिहिलीं आहेत. यांच्या स्फुट गीतांचा संग्रह 'काञ्चनगङ्गा' या नांवानें प्रसिद्ध झाला आहे. गिरीशांना कुणबाऊ भाषा चांगली साधते. त्यांचा सामाजिक विषयाकडे कल असून स्त्रियांचीं गाऱ्हाणीं त्यांनीं आपल्या काव्यांतून जनतेपुढें मांडलीं आहेत. रचना रेखीव असून भाषा प्रसादपूर्ण आहे. अपरिचित शब्द किंवा कर्णकटु शब्दप्रयोग सहसा आढळत नाहींत. त्यांचीं कांहीं भावगीतें गेय असल्यामुळें बरींच लोकप्रिय झालीं आहेत.

## हरि नारायण आपटे ( १८६४-१९१९ )

मराठींतील आद्य कादंबरीकार म्हणून हरिभाऊंचें नांव विश्रुत आहे. कॉलेज-मध्यें असल्यापासूनच त्यांच्या वाङ्मयसेवेला सुरुवात झाली आणि परीक्षेच्या अभ्या-सापेक्षां इतर वाचनाकडे त्यांचा विशेष ओढा असल्यामुळें कॉलेजचें शिक्षण अर्धेंच राहिलें. हरिभाऊंनीं सामाजिक व ऐतिहासिक मिळून २०।२१ कादंबऱ्या लिहिल्या त्याखेरीज स्वतःच काढलेल्या 'करमणूक' नांवाच्या साप्ताहिकांत किती तरी लहान मोठ्या गोष्टी त्यांनीं लिहिल्या आहेत.

हरिभाऊंच्या कादंबऱ्यांनीं मराठी भाषेंत क्रांति घडवून आणली. निबंधमालेनें मराठी भाषेचें ओज जसें सर्वांच्या प्रत्ययास आणिलें तसेंच इंग्लिशमधील कादंब-ऱ्यांच्या तोडीच्या कादंबऱ्या मराठींत लिहिणें कसें शक्य आहे हें हरिभाऊंनीं दाख-विलें. मराठी वाङ्मयाचा दर्जा वाढण्यास त्यांच्या कादंबऱ्या बऱ्याच अंशानें कार-णीभूत झाल्या. टिळक-आगरकरांनीं वर्तमानपत्रांच्या द्वारां लोकजागृति केली. हरिभाऊंनीं ललित वाङ्मयाच्या साहाय्यानें नवीन कालाला अनुरूप अशीं देशहिताचीं अनेक ध्येयें समाजापुढें मांडलीं, समाजांतील दुष्ट चालीरीती वेशीवर टांगल्या व समाजाला सर्वांगीण उन्नतीचा मार्ग दाखविला. मराठी भाषेचें साधें, शुद्ध परंतु रमणीय स्वरूप हरिभाऊंच्या वाङ्मयकृतींत पाहावयास सांपडेल. पुष्कळ नवीन शब्दांची भर त्यांनीं घातली, तसेंच खासगी बोलींतील कित्येक शब्दांना वाङ्मयाच्या क्षेत्रांत पावन करून घेतलें.

## माधव ज्युलिअन् ( १८९४ )

यांचें सबंध नांव माधव त्रिंबक पटवर्धन. शिक्षण बॅडोयास झालें. १९१८ ते १९२३ पर्यंत ते फर्ग्युसन कॉलेजांत फार्सी भाषेचे अध्यापक होते. सध्यां कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजांत फार्सी व इंग्लिश या भाषांचे अध्यापक आहेत. ' फार्सी-मराठी-कोश, ' ' छंदोरचना ' अशीं भाषाशास्त्रविषयक पुस्तकें त्यांनीं लिहिलीं असलीं तरी कवि म्हणून ते विशेष प्रसिद्ध आहेत. ' विरहतरंग, ' ' सुधारक, ' व ' द्राक्षकन्या ' हीं खंडकाव्यें त्यांनीं लिहिलीं असून त्यांची स्फुट कविताहि बरीच आहे. फार्सी व जुने मराठी शब्द कवितेंत आणल्यामुळें क्वचित् स्थळीं कविता क्लिष्ट झाली आहे. परंतु त्यांच्या काव्यांत जिवंतपणा आहे. कल्पना आणि विचार या दोहांच नावीन्य इतक्या मोठ्या प्रमाणांत इतरत्र क्वचितच आढळून येतें.

## करमणूक

हें साप्ताहिक पत्र प्रसिद्ध कादंबरीकार हरि नारायण आपटे हे लिहीत असत. त्यांनीं आपल्या बऱ्याच कादंबऱ्या या पत्रांतून प्रथम प्रसिद्ध केल्या. करमणूक, ज्ञान व उपदेश यांचें योग्य संमिश्रण या पत्रांत असल्याकारणानें तें आबालवृद्धांस प्रिय असे. हें साप्ताहिक पत्र इ. स. १८९० पासून १९१७ पर्यंत प्रसिद्ध होत असे.

## नारायण वामन टिळक ( १८६४-१९१९ )

टिळक मुळचे नासिकचे राहणारे. ख्रिश्चन धर्माचीं तत्त्वें पटल्यामुळें त्यांनीं तो धर्म स्वीकारला. प्रसाद हा यांच्या कवितेचा विशेष आहे. मुलें आणि फुलें यासंबंधीं मनोरम काव्यें यांनीं केलीं असल्यामुळें यांना ' मुलांफुलांचे कवि ' असें म्हणतात. शृंगार किंवा वीर या रसांपेक्षां करुण, वत्सल, व शांत या रसांकडे कवीचा विशेष ओढा. यांची ' अभंगाञ्जलि ' भक्तिरसपूर्ण आहे. रचना करतांना त्यांनीं नव्याप्रमाणें जुन्या वृत्तांचाहि स्वीकार केला आहे. यांची भाषा साधी, सरळ व गोड आहे. सोप्या शब्दांत तत्त्वज्ञानप्रचुर विचार मांडण्याचें चांगलेंच कौशल्य या कवीमध्यें दिसून येतें.

## सगनभाऊ

हे जातीनें शिकलगार मुसलमान. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीतील प्रसंगावर यांनीं पोवाडे व लावण्या केल्या आहेत. पेशवाई नष्ट झाल्यावर ते सातारच्या राजांच्या आश्रयाला होते; आणि सातारला असतांनाच त्यांनीं पानपतच्या प्रसंगावर एक पोवाडा रचिला. पोवाड्यापेक्षां शृंगाररसप्रधान लावण्यांबद्दलच सगनभाऊंची विशेष प्रसिद्धी आहे.

**विनायक** ( १८७२–१९०९ )

यांचें सबंध नांव विनायक जनार्दन करंदीकर. जन्म व शिक्षण धुळें येथें झालें. केशवसुत व टिळक यांचेबरोबर विनायकांनीं अर्वाचीन मराठी कवितेला नवीन वळण लाविलें. विनायकांना आधुनिक, राष्ट्रीय व ऐतिहासिक कवितेचे जनक म्हणण्यांत येतें तें अगदीं सार्थ आहे. देशाची दुरवस्था पाहून त्यांचें हृदय पिळवटून निघत असे; ऐतिहासिक कालांत ज्या शूर स्त्रियांनीं अतुल पराक्रम किंवा स्वार्थ-त्याग दाखविला अशा स्त्रियांचीं चरित्रें त्यांनीं आदरपूर्वक गायिलीं आहेत. सोपी परंतु उत्कट भावनांनीं ओथंबलेली कविता लिहिण्याचें त्यांचें कौशल्य इतरांना क्वचितच साधलें आहे.

**वासुदेव बळवंत पटवर्धन** ( १८७०–१९११ )

जन्म साताऱ्यास पण सर्व शिक्षण नागपुरास झालें. १८९५ मध्यें ते डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सभासद झाले. आगरकरांच्या मागून 'सुधारका'च्या दुय्यम संपादकाचें काम कित्येक वर्षें यानीं केलें. प्रि. परांजपे यांची शिक्षण-मंत्री म्हणून नेमणूक झाल्यानंतर फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपाल या नात्यानें त्यांनीं काम केलें. त्यांनीं प्राचीन मराठी वाङ्मयाचा आस्थापूर्वक अभ्यास केला होता आणि मुंबई विश्वविद्यालयातर्फे या विषयावर दिलेलीं यांचीं व्याख्यानें प्रसिद्ध आहेत. यांनीं कांहीं स्फुट कविताही केल्या आहेत आणि मासिकमनोरंजनांतून वेळोवेळीं लेख लिहिले आहेत. यांची भाषा थोडी इंग्रजी वळणावर असून काव्य-मय, ओजस्वी व प्रसंगीं प्रखर अशी असते.

**महादेव शिवराम गोळे** ( १८९८–१९०७ )

डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सेवक असून आगरकरांच्या मागून फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपाल झाले. 'हिंदुधर्म व सुधारणा' व 'ब्राह्मण आणि त्यांची विद्या' हीं त्यांचीं दोन पुस्तकें विशेष प्रसिद्ध आहेत. भाषा आवेशयुक्त असून प्रतिपाद्य विषय मनोरंजक करण्याची हातोटी यांना उत्तम साधली होती. 'कर्तव्याचा आनंद' हा धडा प्रि. गोळे यांनीं विद्यार्थ्यांना उद्देशून निरनिराळ्या प्रसंगीं व्याख्यानें दिलीं आहेत अशा एका व्याख्यानांतून घेतला आहे.

**विष्णु मोरेश्वर महाजनि** ( १८५१–१९२३ )

हे जुन्या पिढींतील विद्वान् गृहस्थ. एम्. ए. झाल्यावर वऱ्हाड शाळाखात्यांत त्यांनीं नोकरी धरली व शिक्षक म्हणून चांगला लौकिक कमावला. 'विविधज्ञानविस्तार'

'ज्ञानसंग्रह' वगैरे मासिकांतून यांनीं पुष्कळ लेख लिहिले आहेत. यांचे वाङ्मयात्मक लेख माहितीनें भरलेले असत. यांनीं कांहीं स्फुट कविताही लिहिली आहे; परंतु त्यांतील बहुतेक इंग्रजी कवितांचीं भाषांतरें आहेत. 'कालमहिमा' ही कविता इंग्रजी व संस्कृत कवितांचें भाषांतर आहे. परंतु भाषा इतकी प्रासादिक आहे कीं ही कविता भाषांतरात्मक आहे असें वाटत नाहीं.

## श्रीपाद कृष्ण कोल्हटकर ( १८७१–१९३४ )

प्रतिभावंत नाटककार, मार्मिक टीकाकार व विनोदी लेखक म्हणून हे प्रसिद्ध होते. यांनीं कांहीं लघुकथा व दोन कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत. विनोदी लेख लिहिण्याची नवीन प्रथा त्यांनीं पाडली. यांच्या विनोदी लेखांत सामाजिक व्यंगांवर प्रच्छन्न हल्ला चढविलेला आहे; परंतु विनोदामुळें तो तितकासा झोंबत नाहीं. हे कट्टे सुधारणावादी होते. यांच्या बहुतेक लिखाणांतून सामाजिक किंवा धार्मिक सुधारणांचा पुरस्कार केलेला आढळतो. यांच्या लिखाणांत कधीं सुंदर कल्पनांनीं नटलेली, तर कधीं साधी व सहज, कधीं विद्वत्ताप्रचुर तर प्रसंगीं रूक्ष सुद्धा, अशी विषयानुरूप भाषा लिहिलेली आढळून येते.

## मोरोपंत ( १७२९–१७९४ )

या कवीचें सबंध नांव मोरेश्वर रामचंद्र पराडकर. यांचें लहानपण कोल्हापूरानजीक पन्हाळगडास गेलें. पाध्ये नांवाच्या गुरुपाशीं मोरोपंत संस्कृत शिकले. त्यांच्या वडिलांनीं बारामती येथील सुप्रसिद्ध सावकार बाबूजी नाईक यांजकडे नोकरी धरली; तेव्हां मोरोपंतही बारामतीस आले आणि त्यांची योग्यता लक्ष्यांत घेऊन बाबूजी नाईकांनीं त्यांना आश्रय दिला. पंतांची बहुतेक सर्व काव्यरचना बारामतीस झाली. त्यांचे मुख्य काव्यग्रंथ म्हटले म्हणजे आर्याभारत, एकशें आठ रामायणें, मंत्रभागवत, हरिवंश वगैरे होत. स्फुट प्रकरणेंहि त्यांनीं पुष्कळच लिहिलीं आहेत.

पंतांच्याइतकी विपुल कविता फारच थोड्या कवींनीं केली आहे. बहुतेक काव्यें आर्यावृत्तांत असल्यामुळें त्यांना आर्यापति असें कौतुकानें लोक म्हणत. त्यांची भाषा व्याकरणशुद्ध व विविध प्रकारच्या शब्दार्थालंकारांनीं युक्त अशी आहे. संस्कृत शब्दांचा विशेष भरणा असल्यामुळें त्यांची कविता प्रायः दुर्बोध आहे. परंतु मराठी भाषेला समृद्ध करून तिचें वैभव वाढविणारांमध्यें पंतांची प्रमुखत्वानें गणना केली पाहिजे यांत शंका नाहीं.

## वेणूताई पानसे ( १९०१ )

यांचें एम्. ए. पर्यंतचें शिक्षण फर्ग्युसन कॉलेजमधून झालें. शिक्षणशास्त्राची बी. टी. पदवीहि यांनीं संपादन केली आहे. सध्यां या पुणें येथील हुजूरपागेंत अध्यापिका आहेत. 'हरि नारायण आपटे' यांचें विस्तृत चरित्र हा एकच ग्रंथ त्यांनीं लिहिला असला तरी त्यावरून त्यांचें भाषाप्रभुत्व व हातीं घेतलेल्या विषयाचें सांगोपांग अध्ययन करण्याची तयारी हे गुण दिसून येतात. हिंदु कुटुंबांतील निरनिराळ्या व्यक्तींचे परस्पर संबंध जिव्हाळ्याच्या घरगुती भाषेंत वर्णन करण्याचें अप्रतिम कौशल्य त्यांच्यामध्यें दिसून येतें.

## वामनपंडित

यांच्या जन्मकाळाविषयीं निश्चित माहिती नाहीं. तथापि तुकाराम–रामदासांचे हे समकालीन होते यांत शंका नाहीं. वामनपंडित या नांवाचे एकापेक्षां अधिक कवि होऊन गेले असें कांहीं टीकाकारांचें मत आहे. यथार्थदीपिका नांवाची गीतेवर विस्तृत टीका यांनीं लिहिली आहे. रामचरित्र व कृष्णचरित्र यांतील कित्येक प्रसंगांवर लहान लहान रसपूर्ण आख्यानें यांनीं रचिलीं आहेत. भाषाशुद्धीकडे वामनपंडितांचें फारसें लक्ष असल्याचें दिसत नाहीं. संस्कृत शब्दांचा बराच भरणा यांच्या काव्यांत सांपडतो. पण शब्दालंकार व प्रासयुक्त भाषा यांमुळें वामनी श्लोक कानाला गोड लागतो. संस्कृतामधील वृत्तें मराठींत आणण्याचें श्रेय वामनपंडितांकडे आहे.

## धोंडो केशव कर्वे ( १८५६ )

फर्ग्युसन कॉलेजमधील गणिताचे प्रोफेसर. कर्वे सुधारक म्हणून विशेष प्रसिद्ध. स्त्रियांमध्यें शिक्षणाचा फैलाव होऊन त्यांची उन्नति व्हावी म्हणून हिंगणें येथें १९०० सालीं अनाथबालिकाश्रमाची त्यांनीं स्थापना केली. १९१६ सालीं स्त्रियांकरितां स्वतंत्र विद्यापीठ स्थापन केलें. त्यांचा 'आत्मवृत्त' हा एक मराठींतील अप्रतिम ग्रंथ आहे. कर्वे यांचें चरित्र बोधपर व स्फूर्तिदायक आहेच परंतु भाषेच्या दृष्टीनेंहि सदर पुस्तक उत्कृष्ट वठलें आहे.

## श्रीनिवास नारायण बनहट्टी ( १९०१ )

यांचें सर्व शिक्षण डेक्कन कॉलेजांतून झालें. मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांत ते मराठीचे प्रोफेसर होते. सध्या नागपूरच्या मॉरिस कॉलेजमध्यें मराठीचे अध्यापक आहेत. यांनीं बरेच वाङ्मयविषयक लेख लिहिले आहेत व 'मयूरकाव्यविवेचन'

आणि ' ज्ञानोपासना ' हीं त्यांचीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. मराठींत उत्कृष्ट पुस्तकांची भर पडावी म्हणून यांनीं नवभारत ग्रंथमाला सुरू केली असून त्या मालेतर्फें विविध विषयावर अधिकारी लेखकांचीं पांच सहा पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. यांची भाषा प्रौढ व भारदस्त असून यांची सूक्ष्म विवेचन शैली यांच्या दीर्घकालीन व्यासंगाची निवेदक आहे.

## वासुदेव गोविंद मायदेव ( १८९४ )

हे मुंबई विश्वविद्यालयाचे एम्. ए. असून प्रो. धों. के. कर्वे यांच्या महिलाविद्यालयांत अध्यापक आहेत. कांहीं किरकोळ लेख त्यांनीं लिहिले असून ' गरिबांची गोष्ट, ' ' अभिनयगीत ' आणि ' भावतरंग ' अशीं कवितांचीं पुस्तकें त्यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत. नित्याच्या जीवनांतील साधेसुधे प्रसंग घेऊन त्यांवर रचिलेलीं त्यांचीं कवनें हृदयंगम व बालमनाचें यथार्थ आविष्करण करणारीं अशीं उतरलीं आहेत. कल्पनेच्या उत्तुंग भराऱ्या किंवा नवविचारांचा प्रवाह नसला तरी हें साधें स्वरूपच आल्हाददायक वाटतें. यांच्या कांहीं विनोदी कविताहि आहेत.

## शंकर काशिनाथ गर्गे ( १८८९–१९३१ )

पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयांतील एक नाणावलेले शिक्षक. नाट्यछटा हा नवीन वाङ्मयप्रकार मराठींत रूढ करण्याचा यांनीं प्रयत्न केला. ' दिवाकर ' या नांवाखालीं ते लिहीत असत. सुमारें ६० नाट्यछटा व एक दोन प्रहसनें एवढीच यांची वाङ्मय निष्पत्ति असली तरी थोडें परंतु चांगलें व टिकाऊ असें वाङ्मय, त्यांनीं लिहिलें आहे. कलेच्या दृष्टीनें यांच्या नाट्यछटा निर्दोष आहेत. ' कारकून ' हें प्रहसन मासिक मनोरंजनांत प्रसिद्ध झालें होतें.

## रघुनाथपंडित

या कवीसंबंधीं निश्चित माहिती मिळत नाहीं. परंतु हा रामदास–शिवाजीचा समकालीन असावा एवढें मात्र नक्की. ' नलदमयंतीस्वयंवराख्यान, ' ' गजेंद्रमोक्ष, ' व ' रामदास वर्णन ' एवढीं तीन काव्यें याचीं उपलब्ध आहेत. त्यापैकीं नलदमयंतीस्वयंवराख्यान हें फारच सरस उतरलें आहे. संस्कृत मधील नैषध काव्याच्या आधारानें हें लिहिलें आहे. प्राचीन मराठी कविता बहुतेक धार्मिक स्वरूपाची आहे, पण जीं कांहीं थोडीं अपवादस्थळें आहेत त्यांपैकींच या कवीची कृति आहे. शिवाजीच्या अष्टप्रधानांपैकीं जो रघुनाथ पंडित त्यानेंच हीं काव्यें केलीं आहेत असें

अलिकडे कांहीं विद्वान् संशोधक म्हणतात. रघुनाथपंडिताची भाषा प्रौढ व संस्कृत-प्रचुर आहे; शब्दालंकार व अर्थालंकार यांचीं उदाहरणें ठिकठिकाणीं सांपडतात. रचनेचें शैथिल्य बिलकुल नाहीं, तथापि जुनी भाषा व जुने वाक्प्रचार यामुळें क्वचित् ठिकाणीं दुर्बोधता आली आहे.

## वासुदेव गोविंद आपटे ( १८७१-१९३० )

आपटे यांचा वाङ्मय संसार बहुविध प्रकारचा होता. चरित्रें, कादंबऱ्या, टीकात्मक लेख व पुस्तकें, कोश इत्यादि प्रकारचे ग्रंथ त्यांनीं लिहिले असले तरी बालवाङ्मयांत त्यांनीं जी उत्कृष्ट भर घातली आहे तीमुळें त्यांचें नांव चिरस्मरणीय झालें आहे. मुलांकरितां त्यांनीं ' आनंद ' मासिक काढलें आणि ' बालभारत, ' ' बालरामायण, ' ' मनी व मोत्या ' अशीं सुमारें २५।३० पुस्तकें लिहिलीं. त्यांची लेखनशैली विशेष आकर्षक नसली तरी सुबोध आहे.

## राम गणेश गडकरी ( १८८५-१९१९ )

हे आपली कविता ' गोविन्दाग्रज ' या नांवानें आणि आपले विनोदी लेख ' बाळकराम ' या नांवानें प्रसिद्ध करीत. कवि, विनोदी लेखक व नाटककार या तिन्ही नात्यांनीं गडकऱ्यांचें नांव मराठी वाङ्मयांत स्थिरपद पावलें आहे. यांची सर्व स्फुट कविता ' वाग्वैजयंती ' या पुस्तकांत संकलित केली आहे. त्याखेरीज ' प्रेमसंन्यास ' ' पुण्यप्रभाव, ' ' भावबंधन, ' ' एकच प्याला ' इत्यादि नाटकें यांनीं लिहलीं आहेत. त्यांच्या काव्यांत कल्पनेच्या भराऱ्या पुष्कळ असतात. भाषा सजविण्याकडे लक्ष फार. जुन्या शब्दांचा उद्धार जसा त्यांनीं केला आहे तसेच कांहीं नवीन शब्दप्रयोगहि त्यांनीं भाषेंत रूढ केले.

## उद्धव चिद्घन

जुन्या मराठी वाङ्मयांत ज्या कवींनीं चरित्रपर रचना केली त्यांपैकीं उद्धव चिद्घन हा एक आहे. हा सतराव्या शतकाच्या अखेरीस झाला. उद्धव हें कवीचें स्वतःचें नांव आणि चिद्घन हें त्याच्या गुरूचें. तथापि उद्धवचिद्घन याच नांवानें त्याचा उल्लेख करण्याचा संप्रदाय पडला आहे. ' संतमाला ' नांवाचा एक चरित्रपर ग्रंथ यानें लिहिला आहे. ध्रुवाख्यान चिंतामणी नामक कवीच्या नांवावर मोडतें परंतु अलीकडील संशोधनावरून तें या कवीचें आहे असें सिद्ध झालें आहे. रचना बरीच शिथिल आहे. वृत्तदोषहि बरेच आहेत. तथापि आख्यान रसपूर्ण उतरलें आहे.

**म. वि. काथवटे** ( १८५५ )

नगर जिल्ह्यांत सबजज्जाच्या नोकरीवर होते. सध्यां वाईस असतात. ‘ प्राचीन हिंदुस्तानचा इतिहास ’ व ‘ पारशांचा इतिहास ’ हीं त्यांचीं मुख्य पुस्तकें असून त्याशिवाय कांहीं लहान पुस्तकें व लेख यांनीं लिहिले आहेत.

**दत्त** ( १८७५-१८९९ )

दत्तात्रय कोंडो घाटे हें यांचें सबंध नांव. यांचें शिक्षण अहमदनगरास झालें. नोकरीनिमित्त ते बडोद्यास गेले व तेथेंच प्लेगला बळी पडले. त्यांनीं निसर्गवर्णनपर व देशभक्तिपर काव्यें लिहिलीं असलीं तरी त्यांचें वैशिष्ट्य शिशुगीतांत आहे. त्यांची कविता सुबोध व करुण आहे. भाषा नादमधुर आहे. ते आणखी कांहीं वर्षें जगले असते तर या उत्कृष्ट गुणांचा परिपाक झालेला दृष्टीस पडला असता.

**शंकर बाळकृष्ण दीक्षित** ( १८५३-१८९८ )

यांनीं ‘ भारतीयज्योतिषशास्त्राचा इतिहास ’ नांवाचा विद्वत्ताप्रचुर ग्रंथ लिहिला आहे. वैदिक वाङ्मयाचा काल ठरविण्यास त्याचा फार उपयोग होतो. हे मराठी शाळेंतील शिक्षक होते, परंतु अविरत परिश्रम करून वैदिक वाङ्मय, ज्योतिषशास्त्र व गणित यांचा अभ्यास करून त्यांनीं वरील ग्रंथ लिहिला. ‘ ज्योतिर्विलास ’ नांवाचें एक पुस्तक सामान्य वाचकांकरितां त्यांनीं लिहिलें आहे. अवघड विषय सोपा करून काव्यमय व आकर्षक भाषेंत मांडण्याची कला त्यांना साधली होती.

**तुकाराम** ( १६०८-१६४९ )

प्राचीन संतकवींपैकीं साधुवर्य तुकाराम हे प्रमुख होत पुण्यापासून १८ मैलांवर देहू नांवाचें गांव आहे तेथील हे रहिवासी; आणि तेथेंच वाण्याचा धंदा हे करीत. तुकाराम महाराज सदेह वैकुंठाला गेले अशी भाविक भक्तांची समजूत आहे. ज्ञानेश्वरानंतर महाराष्ट्रांत भक्तिप्रधान वारकरी संप्रदाय बराच फोफावला. तुकाराम महाराज स्वतः वारकरी पंथाचे असल्यामुळें अज्ञजनांत त्याचा प्रसार करण्याचें कार्य त्यांनीं केलें. त्यांनीं सुमारें ५००० अभंग रचिले आहेत. त्यांची अभंग-वाणी सहजस्फूर्त आहे. रचनेच्या ठाकठिकीकडे त्यांचें फारसें लक्ष नसे, पण अंत-रींचा उमाळा अभंगांत प्रतिबिंबित झाल्यामुळें त्यांच्या भाषेंत जिवंतपणा ओतप्रोत भरला आहे. व्यवहारांतील दाखले देऊन नीतिपर तत्त्वें अभंगांत गोंवण्याची कला तुकारामांना चांगली साधली होती. त्यांच्या अभंगांतील पुष्कळ चरण मराठीमध्यें म्हणीवजा होऊन बसले आहेत.

## विनायक सदाशिव वाकसकर ( १८९२ )

बडोद्याकडील जे लेखक मराठी वाङ्मयाची सेवा करीत आहेत त्यांत वाकसकर हे प्रमुख आहेत. यांचा इतिहासाचा व्यासंग जबर आहे; आणि ऐतिहासिक संशोधनपर कित्येक लेख व प्रबंध यांनीं लिहिले आहेत. 'अप्रसिद्ध ऐतिहासिक व्यक्तींचीं चरित्रें' व 'शिवाजी आणि शिवकाल' हीं यांचीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. 'शिवाजी आणि शिवकाल' हा ग्रंथ मूळ सर यदुनाथ सरकारच्या पुस्तकाचा अनुवाद असला तरी तो सरस व मनोरम उतरला आहे. महाराष्ट्राच्या इतिहासाबद्दल योग्य अभिमान हा त्यांच्या लेखनाचा एक विशेष आहे.

## गजानन त्र्यंबक माडखोलकर ( १९०० )

श्री. माडखोलकर यांचें शिक्षण फारसें झालें नाहीं. तथापि त्यांचा व्यासंग दांडगा आहे. उत्कृष्ट लेखक म्हणून त्यांनीं अल्पवयांतच लौकिक संपादला. 'महाराष्ट्र' पत्राच्या संपादकमंडळांत सध्या ते आहेत. 'विष्णु कृष्ण चिपळूणकर,' 'आधुनिक कविपंचक,' 'विलापिका' इत्यादि वाङ्मयविषयक पुस्तकें यांनीं लिहिलीं असून यांचे स्फुट लेखहि विपुल आहेत. शब्दार्थालंकाराचें लेणें सढळ हातानें भाषेवर चढविलें असल्यामुळें त्यांची भाषाशैली मोहक असते.

## दु. आ. तिवारी

हे कवि खानदेशाकडील आहेत. यांचा व्यासंग दांडगा आहे. ऐतिहासिक प्रसंगावर वीररसपरिप्लुत अशी रचना करण्याकडे या कवींचा विशेष ओढा आहे. आधुनिक मराठी वाङ्मयामध्यें राष्ट्रीय व ऐतिहासिक कविता लिहण्याची विनायकांनीं जी प्रथा पाडली तिचा पुरस्कार तिवारी यांनीं केला आहे. 'मराठ्यांचीं संग्रामगीतें' या त्यांच्या काव्यसंग्रहांत त्यांची ऐतिहासिक कविता संकलित केली आहे.

## वाग्भट नारायण देशपांडे ( १८९२ )

हे साताऱ्यास वकिली करतात. सातारा येथें गेलीं ८१९ वर्षे प्रसिद्ध होत असलेल्या 'ऐक्य' साप्ताहिकाचे हे संपादक आहेत. तथापि यांचा विशेष ओढा वाङ्मयाकडे. हरिभाऊ आपटे यांच्या कादंबऱ्यांचा यांनीं किती सूक्ष्म अभ्यास केला आहे हें त्यांच्या " हरिभाऊंच्या आठवणी व सामाजिक कादंबऱ्या " या पुस्तकावरून दिसून येतें. लघुकथा लेखक म्हणून यांनीं चांगलाच लौकिक संपादन केला आहे. 'सुखस्वप्नें' व 'दीपावली' अशा लघुकथांचे दोन संग्रह त्यांनीं प्रसिद्ध केले आहेत. सदभिरुचि व सौजन्य हे गुण यांच्या लघुकथांमध्यें प्रमखत्वानें निदर्शनास येतात.

# अर्थबोधक टीपा

## विद्यार्थ्यांप्रत

महती–मोठेपणा. वक्त्र–मुख, तोंड.

शब्दांची शक्ति सर्व जगासी उलथील असें कवि म्हणतो त्याचा अर्थ काय ?

## मराठीचा अभिमान

निवृत्तिप्रमुख–निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपानदेव आणि मुक्ताबाई हीं चार भावंडें.

चांगदेव वटेश्वर–चांगदेवाच्या गुरूचें नांव वटेश्वर. चांगदेवालाच ' चांगदेव वटेश्वर ' असें म्हणतात. चांगदेव हा ज्ञानेश्वरसमकालीन एक योगी.

निजात्मता–एकनिष्ठपणें. मा – मग. कपिला–काळी गाय. वर्णस्वाद–रंग आणि चव. साचार–खरोखर. निरंजनीं–अरण्यांत. न वचता – न जाता. पावन–पूज्य. भृत्य–सेवक, चाकर.

रायें हात घातले–लग्न केलें. समसाम्य होत–दोघींची बरोबरी होते. भुली–भ्रम.

प्रपंचपदार्थी–व्यवहारांत. परवडी–प्रकार. वांकुडी–वाईट. भाखा–भाषा.

स्वानंद–आत्मबोध, परमार्थज्ञान. एका–एकनाथ स्वतःला ' एका ' म्हणत.

## रसिकांप्रत

आपल्या कविता रसिकांना अर्पण करितांना कवि ही विनंति त्यांना करीत आहे. सुमनें–१ फुलें. २ चांगल्या मनानें. सौवर्ण–सुवर्णाचा, सोन्याचा, पिंवळा.

शीर्ण–सुकलेलीं. क्षणाभीतरीं–क्षणांत. वन्य–रानटी. सजणें–जीवित.

वत्सलें–' लोचनें ' या शब्दाचें विशेषण. वत्सलें लोचनें–प्रेमळ दृष्टीनें.

## गोपाळ कृष्ण गोखले

त्वन्मानव्य–तुझें मानव जातीवरील प्रेम. यादवी--आपसांतील भांडण.

कलेवर--मृत देह.

इंग्रजीमध्यें ' सॉनेट ' म्हणून एक कवितेचा प्रकार आहे. त्या धर्तीवर केलेल्या या कवितेला सुनीत म्हणतात. सुनीतामध्यें चौदा ओळी असतात. इंग्रजीच्या धर्तीवर अन्त्ययमक योजिलें आहे तें पहा.

## आमुची मायबोली

मातब्बरी–मोठेपणा. उदेलें–उदयोन्मुख. दिल- मन. करंटी–अभागी.

( येथें मराठा शब्द जातिवाचक नाहीं. मराठी भाषा बोलणारा तो मराठा. )

## माझ्या जन्मभूमीच नांव

निस्तुला–अतुलनीय, जिची तुलना करतां येत नाहीं अशी

श्रेणी–ओळ, रांग. महोदार ( महा+उदार )–अफाट. सारस्वत–वाङ्मय.

सुधा–अमृत. स्कंध–खांदा. अंक–मांडी. किरीट–मुकुट.

## पानिपताचा पोवाडा

सदर–राजसभा, न्यायकचेरी. एकच तार–एका फर्म्याची, एका मजकुराची.

सार–सारे, सर्व. कतार-उंटांची रांग. सुमार–अंदाजें, अजमासें.

कुलअकत्यार-सर्व सत्ताधारी. मिसलीवर–दर्जाप्रमाणें. अर्बुज–आडदांड.

खंदी–कडवी. सडक–सरळ व लांब (तलवार). नौबद–नगारा.

जरी पटक्याचे हत्ती–जरीपटका व निशाण असलेला आघाडीचा हत्ती.

जमाबंदी-जमवाजमव. पतक-पथक, सैन्याची तुकडी. झाकोळला–झाकला गेला.

गलिम–शत्रू. गार-गारा. हामी–स्वतः. फितवा-फितुर.

धर–धीर. शाही–पातशाही राज्य. सुरई–कट्यारीसारखें एक शस्त्र.

जिरेटोप–शिरस्त्राण. दस्त–अंमल, अधिकार. सुने–रिकामे.

तुंबा–भोपळ्याचें भिक्षापात्र. बेदड–लुटारू. बारी–डोंगराळ मुलुख.

सांडाव देत–गळत गळत. भुली–भ्रम, फसवणूक. भुलले–फसले.

महामूर–पुष्कळ. नेणार–न जाणणारा. मनसुबीदार–अंमलदार, अधिकारी.

अज्ञ-अर्भक. शाहूनगर–सातारा. फत्तेजंग–विख्यात.

## यापुढें

बोध–उपदेश. रामदासस्वामींचा दासबोध प्रसिद्ध आहे. त्याचा उल्लेख जातां जातां कवीनें केला आहे.

निर्वाणीं–आणीबाणीच्या प्रसंगीं. फांकडा–शूर. सांकडें–संकट.

जवें–वेगानें. भरारी · राघोबल्लाळ ऊर्फ रघुनाथराव हा पहिल्या बाजीरावाचा मुलगा. आपल्या सैन्यासह तो लांबलांबच्या मजला थोड्या अवधींत करी म्हणून त्यास ‘ राघो भरारी ’ म्हणत असत.

खनी–खाण. आंसवें–अश्रू. मणी–रत्न.

शिवाजीपासून नाना फडणवीसापर्यंत महाराष्ट्रांत ज्यांनीं ज्यांनीं स्वराज्य स्थापिलें व राखिलें त्या सर्व थोर पुरुषांचा उल्लेख कवीनें केला आहे. थोडक्या शब्दांत प्रत्येकाचें वैशिष्ट्य कसें दाखविलें आहे तें पहा.

## सिंहावलोकन

दृक्–दृष्टि. रुचिर–सुंदर. तटिनी–नदी. धवलिता–पांढऱ्या म्हणजे चांदणें असलेल्या. निशा–रात्रीं. प्रमाद–चुका. अनुचित–अयोग्य कृत्य.

पतित–पापी. बहकुनी–वाटेल तसें बोलून. घन तमिस्र–दाट अंधकार.

धृति–धैर्य. अदय–निष्ठुर. अनिवार–एकसारखें.

## कालमहिमा

असार–अशाश्वत, नश्वर, नष्ट होणारें. मुशल–मुसळ. रति–प्रेम, आवड.

भुज-बाहू. कथामात्र झालीं–मामशेष झालीं, नाश पावलीं.

तिमिर–अंधकार. अंबर–आकाश. क्षणभंगुर–नश्वर. तदन्वय–त्याचा वंश.

तगला–जिवंत राहिला. सामंत–मांडलिक राजे. शाला-राजवाडे.

## कर्णाचा थोरपणा

१ विश्रुत–विख्यात, प्रसिद्ध. वनद–मेघ. भ्राते–धर्मादि पांच पांडव.

२ अजातारी–अजात शत्रु, धर्मराज. अभ्रात्या–( अ+भ्राता ) जो बंधु नाहीं त्यालासुद्धां. अभ्र–मेघ. धर्मवायु–धर्माचरणरूपी वारा.

३ गुर्वनादर ( गुरु+अनादर )–वडीलांचा अपमान. मीनमन–माशाचें मन.

४ दरानें–शंखनादासहित. क्षिप्र–लौकर; पृथ्वी तुझें भाषण ( तव तांबूल ) तत्काल मान्य करील म्हणजे सर्व जग तुझी आज्ञा पाळील.

५ सितच्छद–पांढऱ्या पंखाचे ( राजहंस ). सुखग–चांगला पक्षी ( राजहंस ).

६ भट+कर+ग – योद्धयांच्या हातांतील ( शस्त्रें ). स्पर्शमणी–परिस.

७ परिहृत + सर्व + नत + नर + आधि – सकल शरणागत जनांची काळजी ज्यानें दूर केली अशा कृष्णा !

राधा–कुंतीनें टाकल्यावर कर्णाचें संगोपन करणारी अधिरथाची बायको.

८ नरकवि–नरपंडित, ज्ञाते लोक.

९ सूत–अधिरथ नांवाचा सारथी त्यानें कर्णाचें बालपणापासून संगोपन केलें. रक्तपट–रंगविलेलें वस्त्र.

१० समरमख–युद्धरूपी यज्ञ. तल्प–शय्या. गद–रोग.
रणमरणदानीं–रणांत मरण देण्यांत. कल्प + नग + दानीं–कल्पवृक्षाचें दान करण्यांत. नग–न हलणारा ( वृक्ष ). ११ अवसानीं–शेवटीं.

१२ त्या प्रतिज्ञा–पूर्वी केलेल्या अर्जुनवधाच्या प्रतिज्ञा. ज्ञात्या–हें ( सर्व ) जाणणाऱ्या कृष्णा ! अरिप्रति नच सोडवेल–शत्रूलाहि सोडणें उचित नाहीं, मग मित्राला कसें सोडतां येईल ?

१३ हें ना तें–हेंहि नाहीं आणि तेंहि नाहीं ( अशी तुमची अवस्था होईल ). धर्मानें दिलेलें राज्य मी सुयोधनाला देईन; अर्थात् तुम्हांला कर्णप्राप्ति नाहीं आणि राज्यप्राप्ति नाहीं असें होईल.

१४ धारातीर्थी–शस्त्रधारारूपी पवित्र क्षेत्रांत म्हणजे समरांगणीं.

१५ क्षत्र–क्षत्रिय. काळरुद्रदृष्टिसि–कल्पांत काळच्या महारुद्राच्या दृष्टीस.

१६ स्वाश्रित प्रतिज्ञा–आपले आश्रित जे पांडव त्यांच्या प्रतिज्ञा.
सत्यागा ( सती + आगस् )–सती द्रौपदीचा अपराध.

१७ हे उपदेश ( तुझ्या ) महिम्या अयोग्य काय–मी केलेला उपदेश तुझ्या मोठेपणास अयोग्य आहे काय ?

१८ वासव–इन्द्र. रणाजिर–समरांगण. हरिलंघन–सिंहलंघन, सिंहाचा पराभव वारण–हत्ती. बळिगजसहवास–बलिष्ठ हत्तीचा समागम.

१९ धनद–कुबेर. स्वर्+अग–कल्पवृक्ष. ( कल्पवृक्षाला सर्व इच्छा पूर्ण करतां येतात. मग मरणाची इच्छा तरी त्यानें कां पूर्ण करूं नये ? )

२० उद्युक्त–तयार. भीमार्जुन तुम्हांस ( व ) रायास सम वरद ( आहेत )– भीम व अर्जुन तुमची व इतर राजांची इच्छा सारखीच पूर्ण करतील.

२१ निधनदानें–मरणरूप दानें. धनदानें–द्रव्यांचीं दानें. येणें–या धर्मराजानें.
२२ वध्य–वध करण्यास योग्य. २३ भव्यहेतु–कल्याणकारक. लावे–खेळ.
२४ शांतवन–शंतनूचा मुलगा, भीष्म. उष्ट्र्यांनीं–उंटाच्या वाहनावर. हा–मी कर्ण.
२५ श्वेतगर्जीं–पांढऱ्या हत्तीवर.
२६ सु+पद+ईश–चांगल्या राज्याचे स्वामी. २७ पाद्–चरण ( श्रीकृष्णाचे ).
२८ मुग्ध–मूढ, भोळा मनुष्य. नग–अलंकार. मरकत–पाच. रुचिर–सुंदर.
२९ मंत्र–सल्लामसलत, विचारविनिमय. पर–शत्रु. पर तो आंत न कोप–कृष्ण बाहेरून पूर्ण रागावला होता; परंतु त्याला अंतर्यामीं कोप आला नव्हता.

## जयद्रथवध

१ सौभद्र–सुभद्रेचा मुलगा, अभिमन्यु. तव–जनमेजयाच्या.
२ होमिन–त्याग करीन. हुतवह–अग्नि.
३ जथुनि–एकत्र होऊन. अवनि–पृथ्वी. क्षम–समर्थ. वारणाला–निवारण्यास.
४ सैंधव–सिंधुदेशाचा राजा ( जयद्रथ ). कृतांत–यम. आचार्य–द्रोणाचार्य. तुंबळें–आवेशानें. ५ नरा–अर्जुना. वेत्ता-जाणणारा. शरव्रात–बाणांचा समुदाय.
६ पंचाशीति–पंचाऐशीं. हत्ती जसा मस्त कीं–जसा कांहीं माजलेला हत्ती. नाटोपतो–आवरला जात नाहीं.
७ सव्यसाची–कोणत्याहि हातानें शरसंधान करणारा ( अर्जुन ). पृथा–कुंती.
८ सव्यापसव्यकृतसायकतांडवानें–उजव्या व डाव्या हातानें बाणांची वृष्टि करणाऱ्या अर्जुनानें. ९ वाह–घोडे. पिपासा–तहान. आधोरण–महात.
१० वापी–विहीर. अपार्थें (अप्+अर्थ)–पाण्याकारितां. युग–जूं. घोटक–घोडा.
११ हय–घोडा. नीरजपाणी–कमलपाणी ( कृष्ण ).
१२ संयोजिले–जोडले. हयचतुष्टय–अर्जुनाच्या रथाचे चार घोडे.
१३ कैटभारी–कैटभ राक्षसाचा शत्रू (श्रीकृष्ण). १४ क्लिष्टवाक्य–दुःखकारक वाक्य.
१५ शतक्रतु–इंद्र. शतक्रतु सुत–( अर्जुन ). धाकलास–भ्यालास.
१६ खिजावें–खिन्न व्हावें.
१७ कामना–इच्छा. मार्तंड–सूर्य. निकाम-पूर्णपणें. प्रमोद–आनंद.
१८ खटाळी–थट्टा. १९ जगच्छेखरें–श्रीकृष्णानें. विशिखा–बाण.

## केका

केका म्हणजे मोराचा शब्द आणि आवली म्हणजे पंक्ति. मोरोपंतानें आपणांस मयूरपक्षी कल्पून आपण ईश्वरास मारलेल्या हाकांना केकावली अशी संज्ञा दिली आहे.

१ शोधिलें-शुद्ध केलें (तारिलें). अघ-पाप. ऐकते बोलते-ऐकणारे व बोलणारे. अनृत-असत्य. प्रमाण-सत्य; ग्राह्य. नीचते-हलकेपणास.

२ तसाचि-मी जसा पापी आहे तसाच. पतित-पापी. कीं-अथवा. विषाद-राग. सुरभि-कामधेनू. विषक्षीर-विषरूप दूध. न वी-प्रसवत (देत) नाहीं.

३ ललाट-कपाळ. किणें-घट्ट्यांनीं युक्त ( कपाळ घासून कपाळाला घट्टे पडले तरी ). तारिता-तारणारा. भवत्पदाब्जाविणें-आपल्या ( भवत् ) पदकमलांवांचून. रिणें-ऋणें. नतां-शरण आलेल्यास. जिणें-जीवित.

४ भवमहानदी-संसाररूपी मोठी नदी. नाविका-अहो नावाडी ! ( ईश्वरा ! ) तुम्हीच मग......विका,-संसाररूपी महानदीच्या पैलतीरीं मला न्या व तेथें मला विकून जें येईल तें मला उतरण्याबद्दलचें द्रव्य घ्या.

सुदीन-अत्यंत गरीब. विदित-माहित. सदाश्रमींच्या-साधुजनांच्या आश्रमांतील. सवे-संवय.

५ दाते-दान करणारे ( भक्तांच्या इच्छा पूर्ण करणारे ). स्तव-स्तुति. सकललोकराया-सर्व विश्वाचा राजा.

६ समागम-संगति. जाहले लाकडें-तपस्व्यांनीं तुझ्यासाठीं आपले देह लांकडाप्रमाणें शुष्क केले. जोडिलीं माकडें-( त्या तपस्व्यांना ) टाकून तुम्हीं रामावतारीं माकडांची संगति धरिली.

अयुक्त बहू-सीतेच्या वचनांमुळें घोर संकट ओढवलें; त्यापेक्षां आमचें बोलणें वाईट आहे काय ? तें जर तूं ऐकलेंस, ' तर माझा उद्धार कर ' हें माझें वचनहि ऐकिलें पाहिजे. सांकडें-संकट.

७ स्वतोक-आपलें मूल. कर्दमीं-चिखलांत. रजोमलिनकाय-धुळीनें मळलें आहे अंग ( काया ) ज्याचें. अंबर-वस्त्र.

८ उमज-समजूत. रुचि-आवड. शुक्र-शुक्राचार्य. अधन्य-अभागी.

९ केवळा-एकट्याला. असिला-तलवारीला. भागवत-भक्त.

१० सदंघ्रिकमळीं–संताच्या ( सत् ) चरण ( अंघ्रि ) कमळीं. दडो–सक्त होवो. मुरडितां–माघारें फिरविण्याचा प्रयत्न कोणी करूं लागले तर (हट्टानें संताच्या चरणीं अडून बसो).

११ दयामृतघना–दयारूपी अमृत वर्षणाऱ्या मेघा. भवार्णव–संसाररूपी सागर. धार्मिकस्तुतपद–संतजन स्तवन करतात असें तुझें पद.
दासां भवार्णवीं उतरितां तुम्हां जड न पडे–भक्तांना भवसागरांतून पार पाडण्यांत तुम्हांला जड असें कांहीं नाहीं. हें तुम्ही सहज कराल.

## भास

मुलाच्या मृत्यूला फार दिवस झालेले नसल्यामुळें तें जिवंत आहे आणि पूर्ववत् खोड्या करीत आहे असा वरचेवर भास एका आईला कसा होत आहे याचें कारुण्यपूर्ण वर्णन कवीनें येथें केलें आहे.

चिमणें–चिमुकलें बालक. वाहतें–बोलावतें. सायंतनिं–संध्याकाळीं.

## नळराजा आणि हंस

१ कलहंस–राजहंस, ( हंसाची एक जात ). भागला–दमला.

२ उपानह–पादत्राण, जोडा. डौर–झगा. वलय–कडें.

३ भेणें–भयानें. केली–क्रीडा. ४ पक्षपातें–पंख उडवून.

५ कनकरूप–सोन्याची. कटक–कडें.

६ नवप्रसव–नुकतीच बाळंत झालेली. पाता–पालन करणारा.
मज विधी...... – दुर्दैवाच्या मनांत माझा घात करण्याचें आलें आहे.

८ हेलावणें–उचंबळणें. यथानिजमनोरथ–आपल्या इच्छेप्रमाणें.

९ शालशाखे–शालवृक्षाच्या फांदीवर. चाखे–अनुभव घेई. कवळिती–आलिंगती.

१० लवलाहीं–लगेच. मणिबंध–मणगट. क्षोणी–पृथ्वी.

११ पूरितलोककामा–लोकांचे मनोरथ पूर्ण करणाऱ्या ( राजा ).
मोल–किंमत. व्यजन–पंखा. तपन–सूर्य. दीप्ति–प्रकाश.

१२ वरनृपति–उत्तम राजा, नृपतिश्रेष्ठ. वरसुत–ज्येष्ठ मुलगा. नंदिनी–मुलगी.

१३ तेजोनिधि–सूर्य; सूर्याला संज्ञानामक पत्नीपासून यमुना ही मुलगी झाली अशी पौराणिक कथा आहे. सुजनका–विख्यात जो जनक राजा त्यास ( जशी सीता तशी ) जनका–पित्याला ( दमयंती ). ते–ती दमयंती.

## राजहंस माझा निजला

एका विधवा स्त्रीवर एकुलत्या एक मुलाच्या मृत्यूचा प्रसंग आला. त्यावेळीं तिच्या मनांत भावनांची जी गर्दी उसळली ती चित्रित करण्याचा प्रयत्न कवीनें या ठिकाणीं केला आहे.

नग–पर्वत. मलूल–सुकलेलें. भूल–भ्रांति, भ्रम. नाथनिधन–पतीचा मृत्यु. हतभागि–अभागी, दुर्दैवी. वेल्हाळा–लाडक्याला. तो हिरा–तिचा पति.

अमंगळ–अशुभ. राजस–सुंदर, नाजूक. मानस सरसीं–( १ ) मानस-सरोवरांत. ( २ ) मन हेंच कोणी सरोवर त्यांत. राजहंसपक्षी मानससरोवरांत राहतात आणि मोत्यांचा चारा खाऊन जगतात असा कविसंकेत आहे.

वैजयंती–विष्णूच्या गळ्यांतील माळेचें नांव. कौस्तुभ–माळेच्या मध्यभागीं असलेला मुख्य मणि, चौदा रत्नांपैकीं एक. कावा–कट, दुष्ट हेतु. लाहो–इच्छा. काळा–मृत्यूला. कल्पवर–कल्पांतापर्यंत. तीहि निजुनी गेली–शोकभारानें तिनें प्राण सोडला.

## ध्रुवाख्यान

सूर्यवंशीं–सूर्यवंश आणि चंद्रवंश अशीं प्राचीन कालीं दोन राजघराणीं होतीं त्यांपैकीं एका कुलांत. भाजा–भार्या, पत्नी. कनिष्ठा–धाकटी. पट्टराणी–थोरली बायको. वैकुंठपाळ–विष्णु. ठाण–स्थान. मान–प्रमाण. ठाणमाण–योग्य स्थानीं व योग्य प्रमाणांत रेखलेल्या चित्राप्रमाणें त्याचे अवयव होते.

धराधीश–( धरा + अधीश )–पृथ्वीपति, राजा. येरु–तो.

सन्मूख–समोर. मोह झळंबला–पुत्रप्रेम जागृत झालें. तनुज–मुलगा.
शिखा–ज्वाला. अंक–मांडी. राव–राजा. सापत्न–सावत्र.
क्षिति–पृथ्वी, जमीन. लवलाहे–तत्काल, लौकर. दरुषण–दर्शन.
सान–लहान. त्यागीन–टाकून देईन. मोहसंगें–पुत्रप्रेमामुळें. रमारंगें–विष्णूनें.
काळतोंडा जाहलों–दुर्लौकिक झाला, तोंड दाखविण्यास जागा नाहीं.
अनुताप–पश्चात्ताप. निरंजन–आकाश, अन्तराल. अष्टाक्ष–ब्रह्मदेव.
अष्टाक्षसुत–नारद. मंत्रांमाझारिं–मंत्रांमध्यें. यान–वाहन.

मंत्र-राज द्वादश अक्षरांचा–"ॐ नमो भगवते वासुदेवाय" हा बारा अक्षरीं मंत्र.

## निज नीज माझ्या बाळा

दारिद्र्यानें गांजलेली एक स्त्री मुलाला निजवितांना गाणें म्हणत आहे. या गाण्यांत तिनें आपल्या विपन्न अवस्थेचें कारुण्यपूर्ण वर्णन केलें आहे.

दिग्वसन–दिशारूपी वस्त्र, म्हणजे वस्त्र नसणें.

## स्फुट अभंग

३ पिसा–वेडा. छंद–नाद. शीण–श्रम. पाव–पाय. आतुडणें–सांपडणें.

४ भिंगुळवाणें–भयानक, उदासवाणें. श्वापद–क्रूर पशु. निःसंग–कोणतीही आशा न ठेवतां. मारग–मार्ग.

६ पद्मनाभ–विष्णु. संपुष्ट–देवाच्या पूजेच्या भांड्यांपैकीं एक लहान पात्र.

८ धालें–समाधान पावलें. बरळ–असंबद्ध भाषण.

९ न भ्यों–भिणार नाहीं. रविकला–सूर्याची कांति. वाउगें–व्यर्थ.

१० सोहळा–समारंभ. आथिला–व्यापलों होतों, युक्त होतों.

आपुलें मरण ... – मीपणा नष्ट झाला व अद्वैत बाणलें हा भावार्थ.

सुकाळ ... – अद्वैतानंदाचा सुदिन उगवला.

## कचोपाख्यान

१ जनमेजय–अर्जुनाचा पणतु; वैशंपायन ऋषीनें याला भारतीय युद्धाची कथा सांगितली. मी–मोरोपंत; 'वैशंपायनानें विस्तारपूर्वक जी कथा सांगितली आहे ती मी थोडक्यांत सांगतों.'

२ काविचा–शुक्राचार्यांचा. जामाता–जांवई. हरिसा–आनंद पावा.

३ असु–प्राण. असुर + हित–असुरांचें कल्याण.

संजीवनी–मृत मनुष्याला पुनः जिवंत करतां येणारी विद्या.

४ अवगत–ज्ञात, माहीत. अमर–देव. सुरगुरु–देवांचा गुरु बृहस्पति.

६ गुरुदास्यकाम–गुरूची सेवा करण्याची इच्छा असलेला. प्रणत–शरण आलेला.

७ या–कचाला. ८ विद्येनें प्रबळ करावयास–संजीवनी विद्या शिकून देवांना प्रबळ करण्याकरितां. ९ मृगासि–वन्य पशूस.

१० धृतिनग–धैर्यरूपी पर्वत, शुक्रसुताबुद्धिभूमिला–देवयानीची बुद्धि हीच पृथ्वी हिला सोडून ढळला म्हणजे देवयानीचें धैर्य सुटलें.

११ उरःस्थळ–वक्षःस्थळ. गुणमणिमय केलिमंदिर श्रुतिचें–सद्गुण हींच रत्नें त्यांनीं खचित असें श्रुतीचें म्हणजे वेदांचें क्रीडास्थान ( असा कच ).

१३ अघ–पाप. करिती खल अघा–बहुधा असुरांनीं त्याला मारलें असलें पाहिजे. कुशलिजनविरह–सुरक्षित असलेल्या जनांचा वियोग ( या प्रकारें घाबरवीत नाहीं ). १४ आण–शपथ. लटिका खोटा.

१५ सुधाधारा–अमृताची धार. बुधाधारा ( बुध+आधार )– शहाण्या लोकांचा आश्रय. १६ वृकोदरें–लांडग्यांचीं पोटें. पल–मांस.

१८ त्यावरि–त्यानंतर एकदां. वत्स–गाईचें वासरूं.

१९ सद्विप्रकुमार–उत्तम ब्राह्मण जो बृहस्पति त्याचा मुलगा. महागिरी–महापर्वत.

२० खंड–तुकडे. खळधींत–दुष्टांच्या मनांत.

२१ कन्याप्रियकाम–कन्येचें प्रिय करण्याची इच्छा असलेला. रज–बारीक कण. वोतारी–ओतीव काम करणारा. २२ रुष्ट–रागावलेला. सुरा–दारू, मद्य.

२३ सुरयानी–देवयानी. २४ त्यज–टाकून दे. दाटुनि–मुद्दाम, जाणून-बुजून. दुर्वह–वाहण्यास कठीण. अद्रि–पर्वत.

२५ जळ सोडिलें–पाणी सोडिलें, त्याग केला. आर्यकर– ( आर्य–थोर, सन्माननीय )– आर्य जो शुक्राचार्य त्याचा हात.

२६ ब्रह्मघ्न–ब्राह्मणांची हत्या करणारे असुर. मोकलिला–गमावला; घालवून दिला. कलि–दुष्ट पुरुष. कचापासून आपलें हित होत नाहीं असें दुष्ट पुरुषाला वाटलें तर वाटो, परंतु आपल्याला तसें तें न वाटो.

२७ हाणी- हानि. नय–नीति. २८ प्रियपुत्र–पुत्रवत् मानलेला आवडता शिष्य. भसित–भस्म, राख. मधु–मद्य, दारू.

२९ नेणा–जाणत नाहीं काय ? मत्तपा–माझ्या तपश्चर्येस. ज्वलन–अग्नि.

३० अवध्य–वध करण्यास अयोग्य. श्रुति–वेद. लात–लाथ. ब्राह्मणांची हत्या करूं नये अशी वेदांची आज्ञा आहे.

३१ अमृतमयवचा–अमृतासारख्या गोड वाणीचा तो ( शुक्राचार्य ).

३२ एहि–ये. वो–ओ. ( हांक मारल्याबरोबर ओ म्हणाला. )

३३ म्हणे–कच म्हणे. ३४ गुरूदरदारण–गुरूचें पोट फोडणें.

३५ कुव्यसनीं–घोर संकटांत. ३६ चिंतामणि–इच्छिलेलें देणारा मणि.

३७ कन्यकान्या–या कन्येहून इतर ( या वरासि पात्र नोहे ). नोहे–नाहीं. सुज्ञनायका–सुज्ञ म्हणजे शहाणे लोक त्यांतील मुख्य.

३९ कुलज–कुलवान. ४० दापी–दटावून सांगे. कदापि–कधींहि.

४२ मर्यादावचन–नियम सांगणारें वचन.

## संताजीची घोडदौड

तळहातीं शिर घेउनियां–जिवावर उदार होऊन. नामोहरम होणें–पराभूत होणें. सरसेनापति–मुख्य सेनापति ( संताजी ). शहाजणें–रणवाद्यें. गिरसप्पा–गिरसप्पा येथील धबधबा. हिमशैलखंड–हिमालयावरील मोटा शिलाखंड.

तंग–खोगीर आवळण्याचा पट्टा. हय–तुरग, घोडा. नौरंग–औरंगझेब.

रसद–सैन्याच्या उपयोगासाठीं पाठविलेलें धान्य, दारुगोळा वगैरे.

बागलाण–प्रांताचें नांव. जरब–धाक, दरारा. वाजी–घोडा. गाजी–शूर.

